# नाडी ज्योतिष दिवाळी विशेषांक

# 2012



## Table of Contents


1. महर्षि अत्री अनसूया आश्रम कथा ........ 5
2. अतिथी संपादकांचे मनोगत ........ 6
3. नाडीग्रंथांबद्दल सामान्य महिती ........ 9
4. डॉ. विजय भटकरांच्या नाडी ग्रंथ भविष्यावरील इंग्रजीतील मुलाखतीचा मराठी अनुवाद ........ 11
5. श्री चंद्रकात शेवाळे यांची नाडी ग्रंथांच्या अनुभवावर आधारित मुलाखत ........ 14

एडव्होकेट राजेंद्र पाठकांनी घेतलेली विंग कमांडर शशिकांत ओक यांची मुलाखत. ........ 19

6. साद रामेश्वरमची .... – ........ 26
7. अलदान कोण ? ........ 28
8. श्री. रमणी गुरुजी सांगतायत त्यांच्या हाती जीव नाडीपट्टाया कशा आल्या याची अदभूत कथा... 36
9. अरुळ कुडीर - कोऱ्या ताडपट्टीतून अदभूत कथन करणारे तंजावरमधील जीव नाडी केंद्र ........ 39
10. चमत्कारी ईरटै नाडीची पुणे यात्रा ........ 42
11. कै. हनुमत दासन यांची अगत्यार जीव नाडी ........ 48
12. एड. राजेंद्र पाठकचा नाडीग्रंथांचा प्रथमानुभव ........ 50
13. कै. कॅप्टन आनंद राव सांगतात नाडीमहर्षींची महती... ........ 52
14. डॉ. आर एन. शुक्ल नाडीग्रंथांतील संकल्पनाचे विश्लेषण करतात ........ 54
15. ग्रुप कॅप्टन राकेश नंदांची प्रेरणा । अगस्त्य महर्षींच्या मुर्तीची स्थापना ........ 57
16. प्राचार्य विलास चिपळूणकर आपले अदभूत अनुभव कथन करताना. ........ 60
17. ॲडव्होकेट शंकर निकम मंत्र शास्6ची महती व नाडी गर्थांच्याबाबतउपयुक्तता विषद करताना... 62
18. विक्रम फडके सांगतात आपले नाडीग्रंथांचे अनुभव ........ 63
19. श्री. अशोक लचके यांची मुलाखत ........ 64
20. श्री.गणेश भक्त व नाडी प्रेमी श्री. प्रदीप रास्ते यांच्या हिंदी भाषेमधील मुलाखतीवर आधारित... 65
21. प्रखर नाडी ग्रंथप्रेमी श्री. प्रकाश पेंडसे ........ 68
23. श्री. व सौ सुनीता पडवळ आपले अदभूत अनुभव कथन करतात... ........ 69

24. ज्ञान तपस्वी प्राचार्य अद्वयानंद गळतगे सरांविषयी माहिती सांगतायत शशिकांत ओक ............ 70

25. महर्षी अत्री जीव नाडी आणि पुज्य इंद्रदेव महाराज ........................................................ 71

25. अत्री जीव नाडीचे श्री. नवनाथ कुंभारांना आलेले दिव्य अनुभव - ........................................ 77

**भाग 1 :-- अत्री जीवनाडीतील ग्रामदेवतेबद्दल आलेला दिव्य अनुभव** ........................................ 77

भाग 2 :-- अत्री जीवनाडीतील ग्रामदेवतेबद्दल आलेला दिव्य अनुभव .............................................. 80

26. नाडी ग्रंथ प्रेमींचे त्रिशूल ................................................................................................. 84

24 . नाडीग्रंथांवरील अभिनव विलक्षण किस्से १ - १७ डिसेंबर २००९ ........................................ 86

25. ब्रह्मर्षींची कहाणी महर्षींच्या मुखानी ................................................................................. 88

27. अगत्यार जीव नाडीचे अनुभव मधुसूदन घाणेकरांनी सादर केलेले नाट्यरुपांतर ........................ 89

28. ऋषी नेसन - फिरोज मिस्त्रीच्या घरी नाडीमहर्षींचे आगमन .................................................. 96

29. नाडीग्रंथांवरील अभिनव विलक्षण किस्से - किस्सा श्रीनगरच्या ............................................ 102

30. किस्सा ३१ मार्चचा 2007चा - दक्षिण भारतातल्या नाडी केंद्रवाल्यावर कोर्टात फिर्याद ............ 106

32. तमिळमधे नाडीग्रंथ पुस्तकाची निर्मिती तमिळ संगम ......................................................... 113

33. प्रेरणा डॉ. विजय बेडेकरांची- बोध अंधश्रद्धेचा ................................................................ 117

34. नावडतीचे मीठ अळणी! ...................................................................................................... 124

35. फलज्योतिष – एक पंच बॅग - बडवणे – .............................................................................. 125

36. मुकाबला ए कव्वाली ......................................................................................................... 126

39. काय लावलय हे ओकांनी नाडीपुराण? ................................................................................. 132

40. हैयोंच्या नाडीवरील लेखनावरील विरोधकांची प्रतिक्रिया - नसती उठाठेव कशाला? .................. 136

41. असा काव्यप्रकार मराठी भाषेत आहे? ................................................................................ 139

42. नाडीग्रंथांतील काव्य रसग्रहण ........................................................................................... 146

नाडी ग्रंथांना नावे ठेवणाऱ्यांसाठी अभ्यासकार्य (चौकट) ........................................................ 149

43. 'नाडीग्रंथ - एक अभ्यास' पुस्तकात वर्णित केंद्रांची व व्यक्तींची सद्यस्थिती .......................... 151

श्री. एम आर आजगावकर ...................................................................................................... 151

पंडित हवेलीराम ................................................................................................................. 152

पंडित नारायण शास्त्री नंदी .................................................................................................. 152

घाणेकरशास्त्री ..................................................................................................................... 153

46. न्यायमुर्ती कै. रामचंद्र शंकर वझे - आद्य मराठी ऩाडीग्रंथ शोधक ..... 154

44. सूर्यसंहिता कथनातील एक प्रस्थ– श्री. अनिलभाई आचार्य - छायाशास्त्री, लॅमिंग्टनरोड, मुंबई. ... 160

45. झेक प्रजासत्ताक राष्ट्रातील भारतवेडी कमला ..... 164

46. गुरु आले शिष्याच्या भेटीला ..... 166

47. बहुरूपी व्यक्तिमत्वाचा मनस्वी पॉवेल क्रेची ..... 168

48. सौ मृणालिनी ठकार लेख ..... 173

49. डॉ. अविनाश परुळेकर लेख ..... 173

50. अभिजित देसाई - लेख ..... 173

51. संजय कुलकर्णी – लेख ..... 173

52. शामसुंदर मुले – लेख व सत्यसत्यतेचे निकष ..... 173

53. डॉ. अरसे कुलरत्ने व डॉ. संबंधम यांचे शोधनिबंध ..... 173

54. नाडीग्रंथांवरील विदेशीलोकांची पुस्तके ..... 175

55. ग्रंथ परिचय – विज्ञान अणि चमत्कार ..... 176

नवग्रहमंदिरातील आराध्य मुर्ती ..... 180

१) सुर्यनार कोईलमधील मंदिरात सुर्य भवगान उषा व छाया पत्नींसमावेत ..... 181

२) तिगंलूर मधील मंदिरात सोम उर्फ चंद्र भगवान ..... 181

३) वैदीश्वरन कोईल मंदिरातील अंगारक वा मंगल भगवान ..... 182

४) तिरुवेंकाडू मंदिरातील बुध भगवान ..... 182

५) अलंगुडीमधील मंदिरातील गुरू किंवा बृहस्पती भगवान ..... 183

६) कंजनूर मंदिरातील शुक्र भगवान ..... 183

७) तिरुनल्लारमधील मंदिरातील शनिभगवान ..... 184

८) तिरुनागेश्वरनच्या मंदिगरातील राहू भगवान नागवल्ली व नागकन्नी पत्नींसमावेत ..... 184

९) कीळपेरुमपल्लम मंदिरातील केतु भगवान ..... 185



**महर्षी अत्री व माता अनसूया गुरुकुलामध्ये जीवनाडीद्वारे मार्गदर्शन करताना**

---

### 1. महर्षि अत्री अनसूया आश्रम कथा

सोबतच्या चित्रामध्ये पिंपळाच्या पारावर विराजमान होऊन महर्षी अत्री जातकांना मार्गदर्शन असतांना दिसत आहेत... तिथेच त्यांच्या शेजारी माता अनसूया फुलांचा हार गुंफताना जातकाच्या प्रश्नाच्या अनुषंगाने महर्षींचे मार्गदर्शन ऐकत आहेत. गुरुकुलातील रम्य आणि शांत वातावरणात मागील बाजूस महर्षींचे शिष्यगणांपैकी काहीजण नाडिग्रंथलेखनाचे कार्य करत आहेत, तर इतर काही शिष्य ग्रंथांची वर्गवारी करून रचून ठेवण्याचे कार्य करत आहेत. चित्रातील हरिणांची जोडी जातकांची धारणा दर्शवते. बहुधा ज्यास प्रश्न पडलेला असतो, तो प्रश्नाचे उत्तर श्रद्धापूर्वक ऐकतो, आणि त्यासोबत आलेला साक्षीदार विचलित मनाने ऐकत असतो. त्याचप्रमाणे इथे एक हरिण श्रद्धापुर्वक ऐकतेय तर दुसरे विचारात पडलेय. ती गोमाता लक्ष देऊन पहातेय! ईश्वरी ज्ञानाचा साठा पाण्याच्या हौदाच्या रूपाने दर्शवलाय, तर महर्षींचे मार्गदर्शन हे ईश्वरी प्रेरणेनेच असल्याचे दर्शवण्यासाठी ज्ञानरूपी पाण्याने भरलेला कमंडलू दिसतोय. शुभकार्यामध्ये विघ्न आणण्यात संतोष मानणारे सशांच्या रूपाने दिसत आहेत. त्या सशांचे लक्ष समोर ठेवलेल्या केळ्याकडे (स्वत:च्या तृप्तीकडे) आहे, तर "याद राख, शुभकार्यात विघ्न आणशील तर" असे दर्शवणारा एक करदंड सशांमध्ये आणि केळ्यांमध्ये ठेवला आहे.

कुठलेही शुभकार्य ईश्वराच्या आशीर्वादाशिवाय शक्य नाहीच - झाडावर बसून हे सारे बघणारे राघू-मैना म्हणजे शिव-शक्ती, आणि श्री दत्तात्रेय नाडीग्रंथजागृती करणाऱ्या आम्हा स्वयंसेवकांना संपूर्ण आशीर्वाद देत आहेत.

संकल्पना – शशिकांत ओक. शब्दांकन – हैयोहैयैयो... चित्रकार – कुडल हिरेमठ.

सौजन्य – जी.ईश्वरन. नाडीग्रंथ केंद्र, डांगेचौक, थेरगाव. चित्रनिर्मिती काल – जानेवारी ते जून २०१०

## 2. अतिथी संपादकांचे मनोगत




यंदाचा 'ज्योतिष तंत्र आणि मंत्र' दिवाळी अंक नाडी ज्योतिष विशेषांक महर्षि अगस्त्य व माता लोपामुद्रा यांना आदरपुर्वक श्रद्धांजली म्हणून त्यांच्या गुरूकुलास समर्पित करत आहे.

नाडीग्रंथांवर श्रद्धा असलेल्या अभ्यासकांचे विचार व अनुभव सादर करत आहे. नाडीग्रंथांवर आतापर्यंत ओकांनी लिहिलेले इतके वाचले आहे की आता त्यावर त्यांनी लिहायचे काही उरलेले असेल असे वाटत नाही असे अनेकांना वाटले तर नवल नाही! मग आता पूर्ण अंकभर तेच तेच वाचायला मिळणार की काय असे साशंक मनाने पाने चाळणाऱ्यांना त्यात अनेक अद्याप न विचारात घेतलेल्या नाडीग्रंथांच्या पैलूंवर प्रकाश टाकल्याचे निदर्शनास येईल.

वैयक्तिक अनुभव कथन करताना होणारी काही प्रमाणातील अनिवार्य वारंवारिता सोडता वाचकांना काहीतरी नवे वैचारिक खाद्य मिळावे. नाडीग्रंथांकडे दुर्लक्ष करणाऱ्यांना, आपल्याकरिता नाडीमहर्षींनी काय कथन केले असेल अशी उत्सुकता निर्माण करणे, थोतांड म्हणून हिणवणाऱ्यांना त्यांच्या झापडबंद वैचारिक पठडीतून बाहेर काढून निष्पक्षपणे या ग्रंथसंपदेचा अभ्यास करायला भाग पाडणे आणि विशेषतः पारंपरिक ज्योतिषांनी या ग्रंथांतून मिळणाऱ्या कुंडलीतील ग्रहस्थिती व भाकिते यांचा परस्पर मेळ कसा बसतो किंवा नाही यावर अभ्यासपूर्ण लेखन

करायला उद्युक्त करणे हे या अंकाचे हेतू आहे. हा अंक प्रदीर्घकाल जतन करून वाचकांच्या स्मरणात राहावा असा प्रयास केला गेला आहे. अर्थात असे अनेक विषय, लेख व अदभूत अनुभव पानांच्या निर्बंधामुळे सादर करता आलेले नाहीत. जर वाचकांनी ग्रहांकितच्या मुख्य संपादकांना लेखी आग्रह केला तर नाडीग्रथांवरील उरलेली साधनसामुग्री त्या मासिकात "नाडीग्रंथ सदर" म्हणून नियमित प्रसिद्ध करता येतील.

या अंकात काही लेखन निरीश्वरवादी संस्था व व्यक्तींना उद्देशून केले गेले आहेत. तो त्यांना डिवचण्याचा प्रयत्न नाही. नाडीमहर्षींनी जे कार्य केले आहे ते सादर करणे हे माझे उद्दिष्ट आहे. त्यामुळे नाडीग्रंथांचे अस्तित्व मान्य नसणाऱ्यांशी मला खरे तर काही कर्तव्य नाही. परंतु अनुभव असा आहे की अनेकदा अशा विरोधकांच्या बाजूने केले गेलेले लेखन प्रसिद्धी माध्यमे तत्परतेने सादर करतात. त्यावर प्रतिक्रिया व्यक्त न करणे हा एक उपाय आहे

. पण त्यामुळे नाडीविरोधकांना त्यांचे मुद्दे बिनतोड आहेत असा कांगावा करायला संधी मिळते. परिपत्रके काढली जातात. पुस्तके छापली जातात. त्यांच्या मुद्यांना दिली गेलेली सडेतोड उत्तरे, निवेदने वा खुलासे वाचकांपर्यंत पोहोचत नाहीत. त्यामुळे नाडीग्रंथ प्रेमींचा संभ्रम होतो की खरे काय? यासाठी या ठिकाणी अनेक खुलासे केले गेले आहेत. यानंतर अशांकडून यापुढे आणखी चिखलफेक झाली तर त्यांचाशी कसे वागावे – दुर्लक्ष करावे की त्यांना सडेतोड उत्तर द्यावे यासंबंधी नाडीग्रंथप्रेमींनी आपले मत पत्राने व्यक्त करावे ही विनंती.

दिवाळी अंक वाचक रंजक ललित लेखनाची अपेक्षा करतो. मुलाखती व अनुभव या शिवाय वैविध्य म्हणून काही लेखनाशी समर्पक व्यंगचित्रे, माहितीपूर्ण चौकटी आणि नाडी भाकितांच्या सत्यघटनांचे नाट्यरुपांतर वाचकांना कसे वाटले ते त्यांनी आवर्जून कळवावे. त्यांच्या सूचनांचे स्वागत केले जाईल. नाट्यस्पर्धेत नवनवीन कल्पना सादर करायला उत्सुक मंडळींना यातून प्रेरणा मिळावी.

नाडीग्रंथांवर आधारित अनेक चर्चा व व्हीडिओ क्लिप्स नेटवर पहायला मिळतात. अद्याप पुर्णलांबीचा चित्रपट निर्माण झालेला नाही. विविध देशातील लघुपटांच्या स्पर्धात भाग घ्यायला डॉक्यु-ड्रामा तयार करता येणे शक्य आहे. यापुढे लेखनकले शिवाय विविध कलाद्वारे नाडी ग्रंथांचे सादरीकरण करायचा प्रयत्न करावा असे नाडीमहर्षींनी सुचवले आहे. याबाबत काही तयारीही केली गेली आहे. सिने- नाट्य कार्यक्षेत्राशी संलग्न व्यक्तींनी अधिक मार्गदर्शनासाठी संपर्क करावा.

अनेक पालकांना आपल्या मुलाबाळांच्या आरोग्यपुर्ण संपन्न जीवनासाठी शांतीदीक्षा करायच्या निमित्ताने दक्षिणेतील नवग्रहमंदिरांना, अन्य धार्मिक पर्यटनाच्या स्थळांना भेटी देऊन व दानधर्म करावेत असे वाटते. तरुणांच्या व्यस्ततेमुळे जी कर्मकांडे त्यांना शक्य होत नाहीत ती वरिष्ठ सदस्य आनंदाने करायला तत्पर असतात. पण दूरवरचा प्रवास, भाषेची अडचण व सुयोग्य सोबत न मिळणे यामुळे अनेकांचे मनोरथ पूर्ण होत नाही आणि नाडी ग्रंथांतील कथने संपन्न न व्हायला आपणच जबाबदार आहोत अशी खंत वाटते. विविध यात्रा कंपन्यांनी यावर विशेष लक्ष केंद्रित केले तर त्यांना अशा दर्शन सहली काढून व्यवसाय वाढवता येईल. याबाबत  यात्रा कंपन्यांना काही मार्गदर्शन हवे असेल तर मी करू शकेन.

हा विशेषांक सादर करायला निमंत्रण दिल्याने श्री चंद्रकांतदादा शेवाळे यांचे मनःपुर्वक आभार. तसेच आपले विचार, अनुभव व्यक्त केलेल्या सर्व लेखकांचे, चित्रकलाकारांचे शतशः आभार. त्यांच्या सहकार्याशिवाय असा अंक तयार होणे शक्य नव्हते.

आपला अतिथी संपादक,

शशिकांत ओक पत्ता - ए-4 - 404 गंगा हॅमलेट हौ सोसायटी विमाननगर, पुणे 411014
मो - 9881901049 (प्रत्यक्ष भेट सहसा टाळतो. फोनसंपर्क कृपया रात्री 9 नंतर करावा)

### 3. नाडीग्रंथांबद्दल सामान्य महिती

नाडी ग्रंथ भविष्य ही संज्ञा आता मराठी लोकांना गेल्या 15-20 वर्षांच्या काळात थोडीफार परिचित झालेली आहे. दक्षिण भारतात तमिळ भाषेत ताडपत्रावर कूट लिपितून कोरलेले भविष्य आता महाराष्ट्रातील अनेक शहरात पहायला उपलब्ध आहे. रामायण, महाभारत, भागवत या धार्मिक ग्रंथांतून सामान्यपणे उल्लेखलेल्या अनेक महर्षींच्या नावाने या नाडी ग्रंथ भविष्य ताडपट्या उपलब्ध आहेत. त्यापैकी अगस्त्य, महाशिव, कौशिक म्हणजेच विश्वामित्र, वसिष्ठ, शुक, भृगु, काक भुजंदर (भुशुंडी) आदि महर्षींची नावे असलेल्या नाड्या सध्या जास्त प्रचलित आहेत.

ज्यांना नाडी ग्रंथ भविष्याची काहीच माहिती नाही त्यांच्या सोईसाठी थोडक्यात असे सांगता येईल की या महर्षींनी आपल्या प्रज्ञाचक्षूंच्या सामर्थ्यावर अनेकांचे जीवनपट पाहिले व आपल्या निर्देशनाखाली शिष्यगणांकडून त्याची काटेकोरपणे नोंद केली व अनंत काळपर्यंत मानवाला उपयोगी पडणाऱ्या नाडी ग्रंथ भविष्याची निर्मिती केली.

नाडी ग्रंथ भविष्य पहाण्यासाठी पुरुषांना उजव्या व स्रियांना डाव्या हाताच्या अंगठ्याचा ठसा त्यावरील सर्व रेषा ठळक व व्यवस्थित दिसतील अशा बेताने उमटवून द्यावा लागतो. त्या रेषांच्या ठेवणीवरून महर्षींनी १०८ विभाग पाडलेले आहेत. नाडीकेंद्रात त्यापैकी उपलब्ध पट्यांशी त्या ठशांना पडताळून त्यांच्याशी जुळणाऱ्या पट्यांचे पॅकेट आणले जाते. नंतर त्यातील एकएक पट्टीतील थोडा थोडा मजकूर वाचून तो जातकाच्या माहितीशी जुळतो का, ते पाहिले जाते. बऱ्याच न जुळणाऱ्या पट्या बादकरून शेवटी एक अशी पट्टी येते की त्यातील सर्व माहिती जातकाशी तंतोतंत जुळते. उदाहरणार्थ स्वतःचे नाव, आई-वडिलांचे, जोडीदाराचे नाव, जन्मतारीख, वार, महिना, साल, व त्यावेळची आकाशस्थ ग्रहांची स्थिती, शिक्षण. नोकरी-व्यवसाय, भावाबहिणींची, मुलाबाळांची संख्या व अशी काही माहिती जी केवळ त्याच व्यक्तीला ताडता येऊ शकते. त्यानंतर जेंव्हा व्यक्ती आपणहून मान्य करते की पट्टीतील सर्व माहिती १००टक्के जुळते आहे. तेंव्हाच त्या पट्टीतील कूट तमिळ लिपितील मजकूर एका ४० पानी वहीत सध्याच्या तमिल भाषेत उतरवला जातो. त्यावरून भाषांतरकाराच्या मदतीने एकएक वाक्याचा सावकाश अर्थ लाऊन ते सर्व एका ऑडिओ कॅसेटमधे किंवा आजकाल सीडीवर रेकॉर्ड करून मग ती वही व कॅसेट वा सीडी ग्राहकाला सुपुर्त केली जाते व मग मेहनताना पूजारुम मधील शिव-पार्वतीच्या, महर्षींच्या फोटो समोर ठेवायला सुचवले जाते.

कुंडलीतील बारा स्थाने व्यक्तीच्या जीवनातील महत्वाच्या अंगांचा विचार करतात. त्याच धर्तीवर लग्न स्थानाच्या भविष्याला जनरल किंवा पहिल्या नंबरचे कांडम असे म्हटले जाते. त्यात सर्व स्थानांचे त्रोटक भविष्य कथन केले जाते. एखाद्याला कोणा एका विशिष्ठ स्थानाचे जास्त भविष्य जाणून घ्यायचे असेल तर उदा. विवाह विषयक ७ नंबरचे, नोकरीसाठी १० नंबरचे कांड काढून त्यातून विशेष माहिती मिळवता येते. नाडी ग्रंथ भविष्याचा पाया पुनर्जन्म व कर्मविपाक सिद्धांतावर आधारित आहे. त्यामुळे पुर्वजन्मातील पाप-पुण्यांच्या कमीजास्त प्रमाणात व्यक्तीला विविध मंदिरांना भेटी तेथे पुजा-अर्चना, अन्न-वस्त्र-जलदान, अपंगांना मदत करण्याला सुचवलेले असते. शिवाय जपसाधनाही सुचवली जाते. सध्याच्या धामधुमीच्या जीवनरहाटीत तो जप करण्याचा भार आपण नाडी केंद्राला सांगून करवून घेता येतो. त्याच्यासाठी वेगळा मेहनताना घेतला जातो.



Figure 1 **मा. चंद्रकांत शेवाळे नाडीग्रंथ अधिवेशनात शशिकांत ओकांकडून नावेच्या प्रतिकाचे मानचिन्ह स्वीकारताना**

## 4. डॉ. विजय भटकरांच्या नाडी ग्रंथ भविष्यावरील इंग्रजीतील मुलाखतीचा मराठी अनुवाद



**Figure 1 डॉ. डोळे, डॉ. विजय भटकरांसमावेत शशिकांत ओक व ग्रुप कॅप्टन राकेश नंदा त्यांची ताडपट्टी दाखवताना.**

*... मी अशा सुपर कॉम्प्युटर बद्दल बोलतोय की जो आजच्या 10 वर्षांनी पुढे, त्यावेळी प्रगत झालेल्या, त्या सुपरकॉम्प्युटरला एका व्यक्तीचे नाव व अन्य माहिती शोधायसाठी इतक्या प्रचंड गणिती आकडेमोड केल्यावर नंतर ते सापडायची शक्यता आहे. म्हणजेच ती सापडायची शक्यता नाही. यालाच गणिती भाषेत सांगायचे तर 'इट इज अन सॉल्व्हेबल प्रॉब्लेम मॅथेमॅटिकली'. (हे वाक्य ते दोनदा म्हणून त्याची महत्ता अधोरेखित करतात.) कॉम्प्युटरच्या परिभाषेत तो "NP-complete problem" नावाने म्हटला जातो...*

**मुलाखत दि . 7 नोव्हेंबर 2011. पुण्यातील डॉ. डोळे यांच्या घोले मार्गावरील क्लिनिक.**

ओक – सर, आपण आमच्या नाडीग्रंथावरील कार्यशाळेच्या तिसऱ्या दिवसाच्या सत्रातील कार्यक्रमाची सांगता आपल्या मुलाखतीने होणार आहे. आपली नाडीग्रंथांची प्रथम ओळख कशी व केंव्हा झाली?

डॉ. विजय भटकर – विंग कमांडर ओक आणि या कार्यशाळेला उपस्थित नाडीग्रंथ प्रेमींनो, माझी नाडी ग्रंथ भविष्याची ओळख फार आश्चर्यकारकपणे झाली. त्याचे असे झाले की पुण्यातील वेकफील्ड कंपनीचे मालक श्री. बाहरी मल्होत्रांनी एकदा नाडीच्या त्यांच्या अनुभवाने प्रभावित होऊन मला अशी विनंती केली की आपण एक शास्त्रज्ञ म्हणून या विषयाकडे पहावे व नाडी ग्रंथ काय आहेत, याची फोडकरून सांगावेत. या विषयी आपले विचार आम्हाला समजून घ्यायला आवडेल.

त्याप्रमाणे मला निमंत्रण आले म्हणून आम्ही (त्यावेळच्या) कल्याणीनगरच्या केंद्रात पोहोचलो. माझ्यासाठी तो अनुभव अगदी नवा होता. माझ्यासाठी उजव्याहाताच्या अंगठ्याचा ठसा घेऊन ताडपत्र शोधायला सुरवात झाली.

बराच वेळ शोधल्यानंतर त्यांना माझी पट्टी सापडली. त्यातील माहितीने मला थक्क व्हायला झाले(I was taken aback). मी कॉम्प्युटर क्षेत्रातील अधिकारी असल्याने मला फक्त अंगठ्याच्या ठशांच्या डेटाबेसवरून व्यक्तीची नाडी शोधण्याची तऱ्हा म्हणजे एखाद्या पुस्तकालयात जाऊन आपले (आयुष्याचे)पुस्तक वाचायला सुरवात करावे असे इतके सोपे व सरळ होते असे वाटले. प्रथम धक्का होता तो माझे नाव कसे आले याचा. त्यापुढे जाऊन मी म्हणेल की माझ्या आईच्या संदर्भात ताडपट्टीतून तिचे लग्नाआधीचे व नंतरचे अनुक्रमे शकुंतला व निर्मला अशी नावे कशा आली. नंतर अर्थात वडिलांचे नाव ही त्यात आले. याशिवाय मला माझ्या जन्मवेळेची खात्रीलायक माहिती तोवर नव्हती. 11 ऑक्टोबर हा जन्म दिनांक माहित होता. तोपर्यंत मी अनेकांना विचारून साधारण मध्यरात्र असावी अशी माहिती गोळा केली होती. नाडी ग्रंथामधून सांगुन आलेल्या कुंडलीतील ग्रहस्थितीवरून ती बरोबर असल्याचे मला ध्यानात आले. अशी माझी नाडीग्रथांची प्रथम ओळख झाली.

ओक – सर या, अनुभवामुळे आपल्याला लोक विचारत असतील की आपले नाडीग्रंथावरील विचार काय आहेत?

डॉ. विजय भटकर - हो. अनेकांना मी म्हणतो कि जरी त्यात भूत व भविष्यकाळाची कल्पना दिली जाते. परिहार वगैरे सागितले जातात. तरीही एक संगणक क्षेत्रातील शास्त्रज्ञ म्हणून मला पडलेला यक्षप्रश्न की या नाडीताडपट्ट्यात त्या व्यक्तीच्यासंदर्भातील नावे, जन्मदिनांकाच्या वेळची ग्रहस्थिती शिक्षण, नोकरी-व्यवसाय व अन्य माहिती इतक्या प्राचीन काळात कशी ज्ञात करता आली असेल?

प्रत्येकाच्या बद्दल जसे, माझ्या मुलांच्याबद्दलची माहिती त्यांच्या त्यांच्या पट्टीतून कशी आली. शिवाय मला हे ही जाणून घ्यायचे होते कि महर्षींनी फक्त हिंदूंच्या साठीच ही ताडपत्रे लिहिलेली आहेत की काय? त्याच सुमारास तुमची ओळख होऊन आपल्यापुस्तकामुळे माझी नाडीग्रंथाबाबतची उत्सुकता वाढत गेली. म्हणून मी अनेक माझ्या विदेशी - जपानी, जर्मनी, आफ्रिकेतील मित्रांना, औरंगाबादच्या काही मुस्लिम कुटुंबियांना नाडी ग्रंथ पहायला पाठवले आणि यावरून आपल्या भारतीय ऋषी-मुनींनी निर्माण केलेले ज्ञान जगातील सर्व लोकांना समावेशक असे होते याची प्रचिती आली. वसुधैव कुटुंबकम ही कल्पना ही त्यातून प्रकर्षाने प्रकट झाली. अशा अनुभवांनी मला या नाडीग्रंथांकडे आणखी आकर्षित व्हायला झाले. शिवाय आलेल्या अनुभवावरून माझी या विषयावर शास्त्रीय पद्धतीने विचार करायची गरज उत्तरोत्तर वाढत गेली. मला त्यातील भूत व भविष्यकाळातील कथनांबद्दल इतकी उत्सुकता नव्हती. पण नावे व अन्य माहिती ताडपट्टीत कशी नमूद केली जाते किंवा मिळवली जाते याचा गणिती पैलूतून योजनाबद्ध शास्त्रोक्त शोध व्हावा असे मनात होते.

मला असे वाटते की समजा माझ्यावर एक पुस्तक लिहिले गेलेले आहे त्यात माझ्या जीवनावर आधारित 12 प्रकरणे म्हणजे कुंडलीतील 12 स्थानांचे वर्णन केले गेले आहे. आज या पृथ्वीवर साधारण 700 कोटी (7 बिलियन)लोक जीवंत आहेत असे मानले तर इतक्या लोकांचे भविष्य कथन करण्याकरता किती पुस्तके लिहायला लागली असतील? ही देवांची भाषा (लँग्वेज ऑफ गॉड) लिहायला गणिती आकडेमोड वा कॉम्बिनेशन्स करावी लागेल? मी यातील फक्त कॉम्प्युटेशनल आस्पेक्टवर खूप विचार केला व नुकताच या निर्णयाप्रत आलो की असे म्हणता येईल की एक एक्सा (Exa) आपल्याला माहित आहे की 10 लाख (1वर 6 शून्ये) म्हणजे 1 मिलियन, असे 1000 मिलियन म्हणजे 1 बिलियन, असे 1000 बिलियन म्हणजे 1ट्रिलियन, असे 1000 ट्रिलियन म्हणजे 1 पेटा, असे 1000 पेटा म्हणजे 1 एक्झा. म्हणजे सामान्यांच्या भाषेत एकावर 18 शून्ये. हे मी अशा सुपरकॉम्प्युटर बद्दल बोलतोय की जो आजच्या 10 वर्षांनी पुढे, त्यावेळी प्रगत झालेल्या, त्या सुपरकॉम्प्युटरला एका व्यक्तीचे नाव व अन्य माहिती शोधायसाठी इतक्या प्रचंड गणिती आकडेमोड केल्यावर नंतर ते सापडायची शक्यता आहे. म्हणजेच ती सापडायची शक्यता नाही. यालाच गणिती भाषेत सांगायचे तर 'इट इज अन सॉल्व्हेबल प्रॉब्लेम मॅथेमॅटिकली'. (हे

वाक्य ते दोनदा म्हणून त्याची महत्ता अधोरेखित करतात.) कॉम्प्युटरच्या परिभाषेत तो “NP-complete problem” नावाने म्हटला जातो.

डॉ. विजय भटकरांनी मुलाखतीच्या दरम्यान त्यांच्या अध्यात्मिक गुरूंबाबत शांतीदीक्षेने आलेल्या अदभूत पडताळ्याच्या अनुभवाला त्यांनी सविस्तर सांगितले. त्याचे शब्दांकन दुसऱ्या भागात नंतर कधीतरी सादर ...




Figure 3 श्री. बाहरी मल्होत्राजींनी (उजवीकडील कोपऱ्यात पाठमोरे) ओकांच्या ‘ला मेरीडियन’ मधील भाषणात नाडीग्रंथांबद्दल प्रथम ऐकले त्यावेळचे छायाचित्र. या मीटिंगचा परिणाम म्हणून नंतर त्यांनी नाडीग्रंथांचा अनुभव घेऊन, डॉ. विजय भटकरांना नाडीग्रंथांचे गूढ उकलायला विनंती केली.

## 5. श्री चंद्रकात शेवाळे यांची नाडी ग्रंथांच्या अनुभवावर आधारित मुलाखत

**मुलाखतकार एडव्होकेट राजेंद्र पाठक**



Figure 4 श्री. चंद्रकांत दादा व सौ पुष्पा शेवाळे नाडीग्रंथांवरील त्यांच्या अनुभवाची मुलाखत देताना...

पाठक – नमस्कार दादा, यंदाच्या दिवाळी अंकात नाडीग्रंथावर विशेष लेख प्रसिद्ध करायच्या निमित्ताने आपल्या अनुभवांवर आधारित ही मुलाखत घेण्याचे परम भाग्य नाडी ग्रंथ भविष्य कार्यशाळा 2011अंतर्गत मी व ओक सर घेत आहोत. दादा व सौ पुष्पाताई आपण नाडीग्रंथांकडे कसे वळलात?

दादा - शाळेत असल्यापासून मला ज्योतिष व अन्य दैवी शास्त्रांबाबत ओढा होता. अगदी नववी असताना पासून मी या शास्त्राकडे वळलो. कै. शांताराम आठवल्यांच्या 'नाडीग्रंथ - एक अभ्यास' पुस्तक वाचनात आल्यानंतर नाडी शास्त्राबद्दल ही कुतुहल होतेच. त्याप्रमाणे साधारण 1969-70 च्या आसपास माझ्या वडिलांची प्रकृती बिघडली होती. त्याची पत्रिका बनवलेली नव्हती, म्हणून जन्मकुंडलीवरून अंदाज काढता येईना. मग मी पुण्यातील सुप्रसिद्ध घाणेकर शास्त्रींच्याकडे गेलो. त्यांचा मुलगा किशोर माझ्याबरोबरीचा.

पाठक - ते हुजूरपागेच्या मागे दत्त मंदिरात राहात होते तेच का?

दादा – हो. ते दत्त भक्त होते. नाडीवरून भविष्य पहायला त्यांच्याकडे गर्दी होत असे. अगदी आधी अपॉइंटमेट शिवाय भेट होत नसे. त्यांनी मला पट्टीवाचून दाखवली व म्हणाले, 'आलेला जातक हा साक्षात्कारी ज्योतिषी आहे.' नंतर अशा 5-7 गोष्टी सांगितल्या की त्यामुळे मला नाडी ग्रंथ हे चमत्कारी आहेत अशी खात्री झाली. 'नुकतेच घरात ग्रंथीनी निधन झालेले आहे' ते वाचून म्हणाले. माझी आजी काही महिन्यांपुर्वी कॅन्सरने गेली होती व ही घटना कोणालाच फारशी माहित नव्हती. नंतर ते म्हणाले, 'भंग वस्तूंचा व्यापार मोठ्या प्रमाणात करून शेकडो लोकांचा पोशिंदा' असे त्यात माझे वर्णन आलो होते.

पाठक - आपण घाणेकर शास्त्रींबद्दल सांगितलेत त्यानंतर आणखी काही अनुभव आपल्याला आले का

दादा - हो. पण त्यावेळी मला ज्या प्रश्नाची उत्सुकता होती की माझ्या वडिलांच्या तब्बेतीबाबत त्यांनी काहीच सांगितले नाही. पण त्या घाणेकरांनी संक्षिप्त स्वरूपात काही संदर्भ दिले होते. त्यावर त्यांचे स्पष्टीकरण ते देत असत. उदा. आमचा भंग वस्तूंचा व्यापार म्हणजे काय? तर ते म्हणाले की 'ज्या वस्तू पटकन फुटणाऱ्या

असतील, त्या काचेच्या असू शकतात. त्याच्या संदर्भातील काही व्यवसाय आहे काय?' मी 'हो' म्हणालो. कारण आमचा रिकाम्याबाटल्यांच्या व्यापार होता व आज ही आहे. त्यातील बाटल्या ह्या आतील पदार्थ वापरून म्हणजेच त्याचे झाकण भंग करून टाकलेले असते, त्याचा असा ही आहे असा खुलासा केला. ती शब्द योजना अगदी बरोबर होती.

मग मी त्यांना वडिलांच्या आजारासाठी आलोय त्यावर काही लिहिले आहे का? असे विचारले. त्यावर त्यांनी सांगितले की सध्या प्राणघातक काही आजार नाही पण त्यांचे पाय दुखतील. खरे तर त्यांना त्यावेळी पायदुखी नव्हती पण नंतर त्यांना मधुमेहामुळे सतत पायदुखी चालू झाली. ती शेवटपर्यंत होती. असा माझा पहिला नाडी ग्रंथांचा अनुभव होता. पुढे मुंबईत बाबूभाईंचा अनुभव आला. त्यानंतर ही अनेक विस्मयकारक अनुभव नाडीग्रंथांचे आले.

पाठक – दादा आपण जो नुकताच मुंबईच्या नाडीवाचकांचा उल्लेख केलात ते लॅमिंग्टन रोड वरील छाया शास्त्री तर नव्हेत?

दादा - हो तेच ते. त्यांची व्यक्तीच्या शरीरीची छाया मापून ते पट्टी काढायचे म्हणून त्यांना छायाशास्त्री असे नाव पडले. त्यांना मी ग्रहांकितच्या संदर्भात भेटायला गेलो होतो. त्यावेळी त्यांच्या ग्रंथातून ही माझे, माझ्या वडिलांचे नाव, व्यवसाय आदि गोष्टी अगदी अचुक आल्या होत्या. त्यानंतर काही नाडीशास्त्रींच्या भेटी झाल्या पण विशेष लक्षात राहीले असे होते डॉ. ओम उलगनाथन. जे चेन्नईचे नाडीवाचक म्हणून ख्यातकीर्त आहेत. त्यांची भारतातच नव्हे तर परदेशात ही ख्याती आहे. त्यांचा किस्सा फारच मजेशीर आहे. एकदा त्यांच्या पट्टीवाचनात उल्लेख आला की तुम्ही महाराष्ट्रात एक पंचागकर्ते आहेत त्यांची भेट घ्यावी. तसेच औरंगाबादजवळ एक शनिमंदिर आहे. तेथे दर्शन घ्यावे. नंतर एका ज्योतिषशास्त्रावर आधारित मासिकाचे एक संपादक आहेत त्यांना भेटावे. कारण त्यांच्या शारीरिक आरोग्याबद्दल आम्हाला त्यांना धीर द्यावयाचा आहे. मग त्यांनी शोधाशोध केल्यावर कळले की ते पंचागकर्ते म्हणजे श्री. धुंडिराजशास्त्री दाते होत. सुप्रसिद्ध शिंगणापुरचे शनिमंदीर व पुण्यातील ग्रहांकित मासिकाचे संपादक–मालक श्री. चंद्रकांत शेवाळे हे ते व्यक्ती होत. नंतर आमची भेट झाली व नंतर होत राहिली. गेल्या 21 ऑगस्ट 2011च्या ज्योतिष अधिवेशनात ते हजर होते. (त्याचा अदभूत किस्सा आपल्याला अन्यत्र वाचायला मिळेलच.)

पाठक – दादा, आपला अनुभव ऐकून आमची काया रोमांचित झाली व आपल्या ग्रहांकित मासिकाच्या माध्यमातून केली जात असलेल्या ज्योतिषशास्त्राच्या कार्याच्या सेवेला महर्षींकडून पावती मिळाली असे मला वाटते. डॉ. की उलगनाथन सारखे व्यक्ती आपल्याला भेटायला दूरवर आले. हे खरोखरच अभिमानास्पद आहे.

दादा – खरे आहे. मी याचा खुलासा त्यांच्याकडून करून घेतला. म्हणालो की मला शंका आहे मलाच भेटायला आपण कसे आलात? त्यावर ते म्हणाले आम्हाला 'ऋषीज ऑर्डर' – आदेश- वेळोवेळी नाडी पट्ट्यातून येतात व त्यांची आज्ञा शिरसावंद्य मानून बाकीचे काम बाजूला ठेऊन तंतोतंत पालन करावेच लागते. नंतर त्याचा प्रत्यय मला येत राहिला. मलाच ते का भेटायला आले याचे कारण मलाही सांगता येणार नाही असे डॉ. उलगनाथनांनी त्यांच्या भाषणातून ही सांगितले. ते जे म्हणतात ही एक फॅक्ट आहे की असे आदेश येतात. मला इतर अनेकांच्या नाडीपट्टी वाचनाला साक्षी माणून उपस्थित रहा असे आदेश आले व त्याप्रमाणे मी हजर होत राहिलो आणि त्यावेळी आलेले अनुभव विस्मयकारक आहेत. अनेकदा त्यांना असेही आदेश येतात की समोरच्या जातकाला काही अर्थिक मदत कर किंवा काही मेहनताना घेऊ नकोस. त्यावेळी त्या त्या आज्ञा आम्हाला पाळाव्याच लागतात.

आणखी त्यांचे वैशिष्ठ्य असे की आपल्या ध्यानीमनी नसताना व्यक्ती नाडी वाचनाला हजर होतात, त्यांना सुद्धा माहित नसायचे पण असा असा एक माणूस येणार आहे असे वर्णन नाडीतून आधीच यायचे. नंतर तो माणूस हजर व्हायचा.

पाठक - मला एक विचारायचे की अशा घटना होतात तेंव्हा तुम्हाला काय वाटते?

दादा – काय आहे बर का, काही नावे, घटनांचे उल्लेख कधी जेंव्हा येतात तेंव्हा आश्चर्य वाटते कि का ते आले असावेत, कारण त्याचा भविष्यकथनाशी संबंध असतोच असे नाही पण तो इतका विस्मयकारक व बुचकळ्यात टाकणारा असतो की सर्व धक्कादायक वाटते. यात काही वाद नाही.



Figure 5 कृषिरत्न श्री. सोपानराव कांचन

ओक – (संभाषणात भाग घेत) दादा, मी आपल्याला आठवण करून देऊ इच्छितो की आपण म्हणता तसे एकदा पुण्यात नाडीवाचनाला आपल्या समावेत आणखी पाचजण व डॉ. ओम उलगनाथनजींनी बरोबर आणलेले भाषांतरकार वगैरे असताना, पाच या अंकाचे जे चमत्कारजन्य दाखले दिले गेले व शेवटी म्हटले की जर हे सत्य आहेत तर आम्ही जे भविष्य कथन करू, ते ही तितकेच सत्य असेल याची जाणीव करून द्यायला ही उदाहरणे आम्ही दाखवून देतो. त्यांनी एक घटना करवून घेतली. पाठक - ती कोणती होती जरा सविस्तर सांगाना ओक सर,

ओक - सांगतो. श्री. सोपानराव कांचन (प्रख्यात द्राक्ष शेती व निर्यातविषय तज्ज्ञ, कृषिरत्न पुरस्कारप्राप्त व जे नंतर दादांचे व्याही झाले) तेंव्हा साक्षी म्हणून उपस्थित होते. त्यांना उद्धेशून नाडी महर्षी विश्वामित्र म्हणाले, ‘आता पहा, पाच या संख्येच्या मजा दाखवून देतो. त्यांच्या पँटच्या खिशातून जेवढ्या पाचशेच्या नोटा होत्या त्या काढून एक एक करून दादांच्या हाती दिल्या गेल्या व त्या नोटांवरील अंक मोजून सांगा असे म्हटले गेले. एका नोटेच्या अंकाची बेरीज 32 = 5 आली, दुसऱ्यांदा 41= 5 आली. तिसऱ्यांदा म्हटले गेले की या नोटेवरील क्रमांकांची बेरीज आधीच्या संख्येतील वजाबाकी असेल. म्हणजे 41- 32 = 9 असेल. मोजणी केल्यावर ती संख्या भरली 36 म्हणजे एकूण 9. आता शेवटच्या नोटेतून काय काय दर्शवले जाईल ते पहा असे म्हणून महर्षींनी आमची उत्सुकता ताणली. शेवटच्या नोटेवरील संख्येची बेरीज आली 28. म्हणजे 2+8 =10 आली. त्यातून त्या दिवसाचा म्हणजेच 4 ऑक्टोबर 1999 दिवशीचा वार दुसरा (सोमवार), 8 वे नक्षत्र (पुष्य), 10वा महिना (ऑक्टोबर) असे सुचवले गेले व विचारले गेले की इथे जे ज्योतिषतज्ज्ञ उपस्थित आहेत त्यांनी हे कथन सत्य आहे किंवा नाही याचा पडताळा इतरांना सांगावा. अर्थात ते सर्व सत्य होते.

पाठक – अशा विस्मयकारी घटना कथनातून येतात म्हणा की...

ओक – हो, त्या दिवशी आणखी एक महत्वाचे कारण घडले जे डॉ. उलगनाथन नंतर अनेकदा इतरांना आवर्जून उधृत करतात. 4 ऑक्टोबर 1999, दिवस होता लोकसभेच्या निवडणुका होऊन दुसऱ्या दिवशी मतमोजणी होऊन कोण सरकार बनवेल ते ठरणार होते. वाचनाच्या दरम्यान बेडवर पाण्याची बाटली कलंडून गादी ओली झाली. त्या घटनाचा विशेष असा की महर्षी म्हणाले की आम्ही ती गादी ओली होण्याचीच वाट पहात होतो. कारण आत्ता जसे चादर ओली झाल्याने त्याखालील गादीच्या कापडावरील डिझाईन उठून दिसायला लागले, तसे उद्या कोणता पक्ष सरकार बनवेल याची ती चुणुक होती. गादीवरील ते डिझाईन फुलाचे आहे, तेच फुल (कमळाचे चिन्ह) असलेला पक्ष उद्या सरकार बनवेल. आणि तसेच प्रत्यक्षात भाजपने सरकार बनवले. हा इतिहास आहे.

पाठक - थक्क व्हायला होते राव... बर का दादा, मी माझ्याबाबत नुकतीच घडलेली घटना सांगतो. मी कार्यशाळेच्या संदर्भात नाडीपट्टी पाहिली त्यात म्हटले गेले होते की चंद्र नाम के साथ काम करने का अवसर प्राप्त होगा. त्यानंतर शशिकातजींच्या समावेत कार्यशाळेत अनेक थोरामोठ्यांच्या मुलाखती घ्यायचा व आज चंद्रकांत नावाच्या व्यक्तीशी म्हणजे प्रत्यक्ष आपल्याशी नाडीकार्यामुळे संपर्क निर्माण झाला.

दादा – हो खरं आहे.

पाठक – दादा, मला आठवते माझ्या लहानपणापासून ग्रहांकितने आमच्या पिढीला ज्योतिषशास्त्राबद्दल गोडी निर्माण केली.

दादा – खरं आहे पण त्याआधी देखील नियतकालिकं निघत असत. पण उत्तरोत्तर ग्रहांकित हे खऱ्याअर्थाने एक ज्योतिष विषयक व्यावसायिक मराठी मासिक गेल्या कित्येक वर्षांत सर्वाधिक खपाचे व लोकप्रिय मासिक म्हणून मान्यता पावलं आहे हे नक्की. इतकेच नव्हे तर संपुर्ण दिवाळी अंकांमधे विक्रीचे उच्चांक करून अनेक आवृत्या काढण्याचा विक्रम करणारे म्हणून ग्रहांकितकडे पाहिलं जातं.

ओक – दादा होशियारपुरच्या शामाचरणजींच्या बाबत आपला काय अनुभव?

दादा – हो, डॉ. ओम उलगनाथांप्रमाणे त्यांचा ही अनुभव आहे. का ते सांगतो. ओकांनी 2006 साली होशियारपुरच्या पंडित शामाचरण त्रिवेदींना आपल्या जन्मदिवशीच्या अधिवेशनास बोलवावे असे सुचवले. ते मी तात्काळ मान्य केले व निमंत्रण दिले. त्यावर शामाजी म्हणाले की महर्षींच्या परवानगी नंतर सांगतो. तशी त्यांना भृगू महर्षींची 'पुण्याला जाऊन अवश्य आशीर्वाद द्या' म्हणून जायला आज्ञा मिळाली. तसे ते आले. असा हा दुसरा अनुभव, ज्यात नाडी वाचकांना महर्षींचा मला भेटायला जावे असा आदेश आला.

पाठक – दादा, असे साधारण दिसते की नाडीवाचक आपणहून उठून कोणाला भेटायला जायला सहसा तयार होत नाहीत, असे असताना महर्षी त्यांना तुमच्यासाठी भेटायला जायचे आदेश देतात. अन मग नाडीवाचक आनंदाने आपल्याला आशीर्वाद देऊन जातात. हे नवल आहे.

दादा – मला वाटतं ते डेस्टिनी म्हणतात ना, जसं घडायचं असेल तसं घडत, तसे आहे. या ज्योतिषक्षेत्रात काम करायसाठीच माझे आयुष्य हे असे मला वाटते. त्या अनुषंगाने 1977 सालपासून गेली 35 वर्षे हे काम चालू आहे. म्हणून त्यासंदर्भात आशीर्वाद मिळण्याच्या त्या घटना घडल्या असाव्यात असे मला वाटते. आता आणखी एक महत्वाचे मला वाचकांच्या माहितीसाठी नमूद करावेसे वाटते की 90 टक्के नाडीवाचकांना ज्योतिषशास्त्रांच ज्ञान फार जुजबी असते, कारण ते भविष्य सांगत नाहीत तर पट्टीत लिहिलेले फक्त उद्घोषित करत असतात. मात्र याला काही अपवाद आहेत बर का, पैकी एक म्हणजे डॉ. ओमउलगनाथन. ते ज्योतिषशास्त्राच्या अनेक शाखांचे गाढे अभ्यासक आहेत. एकाच वेळी उपस्थितांच्या जन्मनक्षत्रांचे, कुंडलीतील ग्रहमानाचे अतिउत्तम विश्लेषण सांगतात.

पाठक – दादा, ग्रहांकितच्या 98च्या दिवाळीअंकातील नाडीविषयक लेखावरील एक प्रतिक्रिया सांगाविशी वाटते, माझ्या चुलत बहिणाला हे अंक कॅनडात वाचायला मिळतात. तिचा फोन आला की नाडीबद्दल इतकी समग्र व सुंदर माहिती ग्रहांकितमुळे कळाली.

दादा - खरं आहे. जरी मला 70 च्या आसपास नाडी ग्रंथांची माहिती झाली तरी तोवर नाडी म्हणजे काय याची कल्पना फार कमी मराठी वाचकांना होती. त्या अंकामुळे ग्रहांकितच्या लाखो वाचकवर्गाला झाली. त्याचे दूरगामी परिणाम म्हणून आज 50 नाडीकेंद्रे महाराष्ट्रात निर्माण झाली आहेत.

(या दरम्यान सौ. पुष्पा शेवाळे या मुलाखतीत सामिल होतात)

त्यांनी पाठक – नमस्कार, आजच्या या नाडीग्रंथांवरील कार्यशाळेच्या निमित्ताने आपली मुलाखत घेताना ग्रहांकितच्या सरस्वती म्हणून मी तुम्हाला वंदन करताना अत्यंत आनंद होत आहे.

सौ. शेवाळे – नमस्कार.

पाठक - आपला नाडी ग्रंथांचा तोंडओळख कोणामुळे व कशी झाली?

सौ शेवाळे – ओक सरांच्या मुळेच आम्हाला नाडी ग्रंथांची माहिती झाला. त्यावेळी आम्ही आमच्या मोठ्या मुलीसाठी स्थळं पहात होतो. मॅच होणारी काही मिळत नव्हती. उंची, स्टेटस किंवा पत्रिका यामधे दोन वर्षे वाया गेली. एकदा ओक सरांना विचारले की मुलीच्या लग्नासाठी काय करावे? नाडी पहायला कुठे जावे? त्यांनी सुचवले आपल्या घराच्या जवळील त्यावेळच्या कल्याणीनगर भागातील केंद्राचा पत्ता दिला. तिथे मुलीची पट्टी सापडली. त्यात नेहमीप्रमाणे नावे व कुंडली बरोबर तर आलीच शिवाय भावी जावयाच्या घरचे स्टेटस, शिक्षण असे त्रोटक वर्णन आले. त्यानंतर जे स्थळ आले ते नेमके नाडीतील वर्णनाशी हुबेहुब जुळणारे होते. मला स्पष्ट आठवतेय की त्यात एक उल्लेख असा होता की त्यांचे दोन बंगले असतील व त्यांना जोडणारा पुल असेल, जे अगदी तंतोतंत होते. शिवाय

असेही म्हटले गेले की त्याच्या शेजारी एक अर्धवट बांधकाम चालू असलेली इमारत असेल. ते सर्व जुळणारे वर्णन प्रत्यक्षात पाहून मी अवाक झाले. मला मनोमन तेच स्थळ असणार असे वाटले. तिथेच तिला आम्ही दिले.

पाठक – भावी व्यक्तीची रास व कुंडलीतील काही स्थानांचे ग्रहमान मिळते असे म्हणतात, तशा काही हिंट्स मिळाल्या होत्या का?

सौ शेवाळे – हो शिवाय काही शारीरिक – बांधा, उंची व चेहरे पट्टी शिवाय त्यांचा राजकीय दबदबा असेल आदि खाणाखुणा ही जुळणाऱ्या होत्या. त्यामुळे आमचा नाडी कथनावर प्रचंड विश्वास बसला. त्यांनी सांगितलेल्या शांतीदीक्षा आम्ही मनोभावे केल्या. त्यानंतर अनेक जणांना मी नाडी ग्रंथांबद्दल सुचवले. ग्रहांकितमधे पत्ते दिले. मी रोहिणी बुक डेपो चालवते. मासिकांचे वाचनालय चालवते. त्यात लोकांना मी सांगते की नाडीग्रंथ पहा व त्यात सुचवलेल्या गोष्टी मनाने शंका न बाळगता करा. मी तशा केल्यात व फळ मिळवले. ग्रहांकितच्या माध्यमातून शेकडो लोकांना त्याचा अनुभव ही घेता आला.

पाठक – असे म्हणतात की नाडीत काही वेळा, स्थळ आपल्याआपण चालून येईल असे काही तुमच्या बाबत झाले का?

सौ. शेवाळे - अगदी तसे नाही, पण नाडी पाहताच योग्य स्थळ मात्र सांगून आले होते. ते जुळून आले. आजही मी विचार करते की तेंव्हा वाटते की मुलीचे भाग्य तिथेच होते. याबाबत मला शंका नाही.

पाठक – दादा व सौ शेवाळे वहिनी, आपला आभारी आहे की आपण वेळ काढून आपले मन मोकळे केलेत. त्यामुळे अनेकांना आपल्या अनुभवातून नाडीग्रंथ पहायला प्रेरणा मिळेल. धन्यवाद.

------




Figure 6 मुलाखतीबद्दल आभार मानताना राजेंद्र पाठक

---------------------------------------------------

## एडव्होकेट राजेंद्र पाठकांनी घेतलेली विंग कमांडर शशिकांत ओक यांची मुलाखत.

***राजेंद्र पाठक, हे व्यवसायाने एक वकील आहेत. त्यासह ताडपट्ट्यांवर कोरलेल्या नाडीग्रंथविषयक साहित्याचे एक प्रखर प्रेमी अभ्यासक आहेत. विंग कमांडरांसारख्या निराळ्या विषयाच्या अभ्यासकांना सहसा विविध माध्यमांतून नाडीग्रंथाबाबत कोणत्यातरी एका विषयावर लिहा असं म्हटलं जातं आणि त्यामुळे फक्त दिलेल्या विषयालाच धरून लिहावं लागतं. ह्या मुलाखतीत विषयाची काटेकोर बांधिलकी न मानता ढोबळमानाने नाडीग्रंथांच्या संदर्भात काही मोकळीचाकळी चर्चा.***

मी राजेंद्र पाठक - नमस्कार

शशिकांतजी ओक – नमस्कार.

राजेंद्र पाठक - आपल्या नाडीविषयक साहित्याचा एक अभ्यासक, वाचक प्रेमी आहे. या आपल्या नाडी प्रवासामध्ये एका नियतकालिकाच्या संदर्भात आपली मुलाखत घ्यावी अशी माझी तीव्र इच्छा होती. पर्यायाने आपलं बोलणं झाल्या-झाल्या आपण हो म्हटलंत त्यासाठी मी आपले शतशः आभार मानतो...

ओक - राजेंद्रजी आपण एक चांगला प्रकल्प हाती घेतलेला आहे. कारण नियतकालिकामधून वा सभेत माझ्यासारख्याला कोणत्यातरी एका नाडीविषयाबाबत लिहा किंवा बोला असं म्हटलं जातं आणि त्यामुळे माझ्यासारख्या व्यक्तीला ज्याला विविध भागांचे किंवा विविध नाडीग्रंथाचे पैलू उकलून द्यायची इच्छा असते पण त्यात फक्त विषयालाच धरून किंवा बांधून लिहावं लागतं. या तुमच्या मुलाखतीमधून आपण अशा काही प्रकारचे प्रश्न विचारलेत तर त्यामधून मला नाडीग्रंथांच्यासंदर्भात आपले काय काय प्रकल्प चालू आहेत किंवा काय काय कामं करायची इच्छा आहे याबद्दलसुध्दा चर्चा करता येईल आणि म्हणून मी तुमचे धन्यवाद मानतो की आपण ही माझी मुलाखत घेऊन माझी बऱ्याच दिवसांची एक इच्छा पूर्ण करता आहात.



Figure 7 **नाडीवाचनात रंगलो मी। ...अऱ्या, अहो सॉरी, ओकांचे नाडीभविष्य वाचतायत वाटतं. मग असे होणारच....**

राजेंद्र पाठक - आता ही मुलाखत घेताना माझं अंतःकरण भावना उचंबळून आल्यामुळे भरून आलेलं आहे. त्याचं कारण असं की, आपलं एक पन्नास रूपयाचं मासिकवजा पुस्तक आहे आणि पहिली-दुसरी आवृत्ती म्हणून, काहीही माहित नसताना मी जोशी बुक डेपोमध्ये गेलो. ते माझे अनेक वर्षांचे मित्र. अप्पा बळवंत चौकात माझं आयुष्य गेलेलं. मी त्यांना म्हटलं की, माझी नाडीग्रंथ बघण्याची अतिशय तीव्र इच्छा झालेली आले. मला काहीही माहिती नाही. असं म्हटल्या म्हटल्या त्यांनी माझ्याकडे बघुन स्मित केलं आणि माझ्या हातात निळ्या रंगाचं करकरीत ओकांचे मासिक ठेवून म्हणाला,'राजेंद्रजी हे घेऊन जा'.

ओक - साधारण ते कुठलं साल असावं?

राजेंद्र पाठक - ते साल साधारण डिसें. २००७ किंवा २००८ असावे. तर ते हातात आल्यानंतर मला याचंही भान राहिला नाही की मी गाडी कुठे पार्क केली आणि मी जोशीच्या इथुन जे वाचत निघालो ते गाडी पार्क केली होती तिथपर्यंत चक्क डोके खाली घालून तीन-चार पादचाऱ्यांना व सायकलवाल्यांना धडका देत ते मासिक वाचत गेलो. तरी माझं काही समाधान होईना म्हणून परत शनिपारासमोर मारूतीरायांच्या देवळात बसलो. पुनश्चपारायण केलं आणि तरीही तृप्ती होईना. त्या अत्यानंदामध्ये मी नाडीग्रंथांचा शोध घ्यायला सुरूवात केली.आणि आज आपल्याशी मुलाखतीच्या निमित्ताने लेखकाशी प्रत्यक्ष जवळीक साधताना फार आनंद होत आहे. असो.

राजेंद्र पाठक - (ओकांकडे वळून)नमस्कार, आपल्या व्यस्त कामकाजातून आपण खास ग्रहांकितच्या वाचकांसाठी या मुलाखतीच्या निमित्ताने जो वेळ काढला आहे, त्यासाठी मी आपले शतशः आभार मानतो.

ओक - धन्यवाद. आपल्यासारख्या वाचकांच्या प्रेमानं मी भारावून गेलो आहे! सगळी महर्षींचीच कृपा हो! गेल्या १७-१८ वर्षात ह्या विषयाची माहिती करून देण्याचं काम माझ्या हातून घडलं हाच खरंतर मी महर्षींचा आशिर्वाद समजतो. ह्या निमित्ताने देशा-परदेशातील अनेक वाचकांची मला पत्रं, ईमेल येत असतात. त्यातूनच काही घटना घडत गेल्या आणि ह्या विषयाची सखोल माहिती करून देण्यासाठी संमेलनं, अधिवेशनं इत्यादि भरवली गेली आणि विशेष म्हणजे त्यातूनही काही गोष्टी घडत गेल्या, काही प्रकल्प हाती घेतले गेले. विविध विषयांची अभ्यासक मंडळी पुढे आली, त्यांच्या-त्यांच्या परीने नाडीग्रंथांच्या संदर्भातील संशोधनकार्यात हातभार लावू लागली. हे सारे याचि देही अनुभवणे म्हणजे जीवनाचे सार्थक आहे असंच मला वाटतं.

राजेंद्र पाठक - आत्ताच आपण नाडीग्रंथ विषयक काही प्रकल्पांचा उल्लेख केलात. याबाबत जाणून घ्यायला आम्हाला निश्चितच आवडेल. नाडीग्रंथांच्या संदर्भात आतापर्यंत इतके लेखन झाले आहे, अनुभवांविषयी इतकी चर्चा झाली आहे की आता यापुढे काय? असे एक कुतुहल वाचकांच्या मनात असते. त्या अनुषंगाने विचारायचे झाल्यास, या विषयाच्या संदर्भात विंग कमांडरांच्या मनात भविष्यकालासाठी काय विचार असावेत?

ओक - आपण फार सुंदर प्रश्न विचारलात. खरं म्हणजे नाडीग्रंथाच्या संदर्भात कार्य कैंव्हा, किती आणि कुणी करायचं याला काही धरबंध नाहीय. एका शशिकांत ओक नामक व्यक्तीने एक पाऊल पुढे टाकण्याचा फक्त प्रयत्न केलेला आहे. याच्या पुढची सगळी पावलं देशा-विदेशातील विविध भाषा बोलणाऱ्या नाडीग्रंथप्रेमींनी एकत्र येऊन उचलायची आहेत. थोडक्यात सांगायचं झालं तर महर्षींनी केलेल्या जगड्व्याळ कामाचा विविध अंगांनी मागोवा घ्यावा अशी एक संकल्पना आहे - त्या संदर्भातील काम काही वर्षांपूर्वीपासून सुरूही झालेलं आहे. परंतु, त्या कामाचा आवाका, त्या कामाचा पडताळा अजुनपर्यंत कोणाला आलेला नाहीये.

राजेंद्र पाठक - उदाहरणादाखल?

ओक - एक छोटसं उदाहरण सांगायचं असेल तर युरोप खंडामध्ये थॉमस म्हणून एक व्यक्ती आहेत. त्यांनी युरोप खंडामधल्या काही महत्वाच्या शहरांमध्ये अत्याधुनिक तंत्रज्ञानाच्या साहाय्याने दूरस्थ अंतरावरून नाडीवाचन

करता येईल अशी केंद्रे उघडली आहेत. त्यांच्या नाडीग्रंथामध्ये ते युरोप खंडामध्ये नाडीग्रंथांचे, महर्षींचे राजदूत असतील असं सांगण्यात आलंय. म्हणजे त्यांच्याकडून काय काम अपेक्षित आहे? याचा अवाका केवळ अंदाजानेच करावा! दुसरे, झेक रिपब्लिकमध्ये पॉवेल नावाचे माझे एक मित्र आहेत, त्यांनी भारतातून काही नाडीग्रंथ वाचकांना प्रागला झेक रिपब्लिकमध्ये नेलं, तिथं युरोपीय लोकांचं नाडीवाचन झालं. लोकांचा प्रतिसाद अतिशय उत्साहवर्धक होता. तिथेच पहिलं आंतरराष्ट्रीय नाडीग्रंथावरचं संमेलनही पार पडलं.

राजेंद्र पाठक - संमेलनावरून एक आठवलं, नाडीग्रंथावर एक छोटेखानी संमेलन पुण्यातही केलं होतं ना?

ओक - बरोबर. ते पहिलं संमेलन होतं. इथे पुण्यात ऑक्टोबर २००७ ला झालं. त्याच्यानंतर दुसरं अधिवेशन बडोद्याला तिथले उद्योगपती श्री. निलेशभाई त्रिवेदी यांच्या पुढाकाराने 2009 ला झालं आणि २०१०ला तिसरे प्रागला झालं. एका अर्थाने पुणं-बडोद्याची संमेलनं आंतरभारतीय आणि प्रागचं आंतरराष्ट्रीय आहे. याच्यापुढेसुद्धा विविध भागातल्या लोकांनी असंच संमेलन भरविण्याची इच्छा जाहीर केलेली आहे. आता ती इच्छा केव्हा सफल होतेय याची वाट पाहायला पाहिजे.

राजेंद्र पाठक - आपण मघाशी भेटल्यानंतर ज्या गप्पा मारत होतो त्यावेळी आपण एक गोष्ट सांगितलीत की मी रामेश्वरमला जाऊन काही नाडीग्रंथाचे अवलोकन करून आलो आणि हे इतकं ताजं आहे की या मुलाखतीमध्ये तुम्ही त्याबद्दलच्या काही घटना या खूपच रोचक असतील यात मला काही शंका वाटत नाही. तरी कृपया त्याबद्दल थोडं काही सांगावं.

ओक - दि. 21 ऑगस्ट 2011 आमचं विमान मदुराईकडे झेपावलं आणि मदुराईला एक दिवसाचा हॉल्ट घेऊन मी रामेश्वरम याठिकाणी पोहोचलो. रामेश्वरममध्ये त्यादिवशी असेच माझ्यासारखे जवळजवळ चौदा लोकं आम्ही एकत्र झालेले होतो आणि या सगळ्यांना एकत्र आणणारा एकच महत्वाचा दुवा म्हणजे राजन अल्दान एक व्यक्ती. तिथे आमचं विविध लोकांचं नाडीग्रंथाचं वाचन झालं आणि त्यानंतर त्यामध्ये असलेले काही रोमाचंकारी प्रसंग, अनुभव किंवा त्याचे तुषार अंगावर घेत मी ते रामेश्वरम हे गाव सोडलं.

त्याच्यानंतर मी एकटाच मला स्वतःला सांगितलेल्या काही शांतीदिक्षा होत्या त्या करण्याकरता म्हणून मी बाहेर पडलो. बसमधून जवळजवळ साडेपाच तासांचा प्रवास केल्यानंतर तिरूचेंदुर नावाचं गाव आहे तिथे मी पोहोचलो. महर्षिंनी सांगितलेलं होतं की इथे एक मोक्षस्थलम नावाच्या जागेवर लिंबाच्या झाडापाशी तु ध्यान कर. म्हणजे तुला पुढच्या भावी आयुष्यासंदर्भातल्या काही काही गोष्टींचं आकलन होईल.

राजेंद्र पाठक – सर, आपली कथनाची पद्धत अशी आहे की पुढे काय होणार अशी उत्सुकता लागते.

ओक - तिरूचेंदुर हे गाव अगदी समुद्रकिनाऱ्यावर आहे आणि तिथला जो बसस्टॉप आहे तो समुद्राच्या इतका जवळ आहे की तिथून उडी टाकली तर समुद्रात जाईल इतका समुद्राच्या जवळ आहे. समुद्रसपाटीपासून शंभर एक फूट उंच अशा ठिकाणी ते स्थान आहे.

तमिळनाडूमध्ये आल्यावर पहिल्यांदा जो फटका बसतो तो भाषेचा. आपल्याला काय म्हणायचं आहे ते त्यांना कळत नाही आणि ते काय म्हणतात ते आपल्याला कळत नाही! तिथे मी बऱ्याच लोकांना मी विचारलं की, मोक्षस्थळम कुठे आहे? तर सगळी लोकं (त्यात त्या तमिळ लोकांशी बोलणं दुरापास्त), त्यांचं ते टिपिकल हेल काढून तोंड वेंगाडून बोलणं, "आई डोन्टा नो" ऐकत पुढे सरकत होतो. खांद्यावरची जड बॅग वाहवत जात असता कार्तिकेयाचं मंदिर अशी पाटी इंग्रजीत वाचली. त्या मंदिराजवळ मी गेलो. एक म्हटले कि, "देअर इज वन टेम्पल" तिथं जाऊन विचारा. तिथे जाऊन विचारलं तर तिथले मंदिरातले लोक सुध्दा म्हणू लागले की, "आय डोन्ट नो" आता हे मोक्षस्थळम शोधायचं कुठे? असं करत करत मी ती जड बॅग या खांद्यावरून त्या खांद्यावर करण्यात

गुंतलेलो होतो तेवढ्यात एक जागा दिसली, म्हटलं काय आहे म्हणून बघायला गेलो तर तिथे एक वल्ली नावाच्या एका व्यक्तीचं ते मंदिर आहे असं कळलं.

त्या मंदिराच्या आसपास, मंदिर म्हणजे काय? आत गेल्यावर लक्षात आलं की आत एक प्रचंड गुहा आहे. त्या गुहेत आत गेल्यानंतर तिथला जो पुजारी होता त्याला विचारलं की, इथं कुणाचं काय मंदिर आहे? त्यांनी थोडक्यात सांगितलं की ही वल्ली म्हणजेच या कार्तिकेयाची नंतर झालेली पत्नी. कार्तिकेय आपला पती व्हावा म्हणून तिने जे तप केलं ते इथल्या वनांमधल्या या गुहेत. त्यावेळा हत्ती किंवा हिस्त्र श्वापदांनी तिला घाबरवल्यामुळे ती या गुहेत लपून बसली. त्यावेळी कार्तिकेय नावाच्या त्याकाळच्या एका राजाने - जो शूरवीर योद्धा मानला जातो - त्याने तिथे येऊन त्या श्वापदांचा समाचार घेत त्यांना तिथून हाकलून लावलं आणि त्याने या मुलीला सोडवलं. त्यावेळेला तो तिला दिसला, तो तोच जो त्या मुलीला पूर्वीपासून आपला पती व्हावा असं वाटत होतं. अशी ती आख्यायिका आहे. तर त्या वल्लीचं ते रक्षाघर होतं. त्या पुजाऱ्याला विचारलं, "बाबा इथे मोक्षस्थान कुठे आहे?" तो म्हटला, "इथे कुठे?" असं म्हणून मला उलटं विचारलं, "तुम्हाला माहिती नाही? हे काय?" असं म्हणून त्यांनी त्याच एका भागाकडे हात केला. या इकडच्या बाजूने गेलात की तुम्हाला दिसेल. तर मी वल्लीला नमस्कार केला आणि त्या ठिकाणच्या गुहेत असलेले काही पुरातन शिलालेख शोधले, त्याचे काही फोटोग्राफ काढून तिथून मी त्या एका आडबाजूला गेलो. तर तिथे एक सुंदर अष्टकोनी बसायची सोय असलेली जागा केलेली आहे. नवीनच बांधलेली पाच-सहा वर्षातली असेल. तिथे एक यज्ञकुंड ठेवलेले आहे. तिथे मांडी घालून ताबडतोब बसलो, वाटले, अरे हेच ते मोक्षस्थलम! आपल्याला इथेच बसायचय. त्या जागेचं वैशिष्ट्य असं आहे की संपूर्ण समुद्र जवळजवळ तीनही बाजूंनी दिसतो. खूप लांबवरून अशा लाटा येतात. पण आपल्याला समुद्रकिनारा म्हटलं की वाळू असते तशी ती दिसत नाही. कारण आपण जितके ऊंच असतो की तिथून फक्त पाणी दिसतं. तिथे मी ध्यान केलं. ध्यान केल्याचं समाधान मला मिळालं आणि तिथून मी निघालो. तिथेच मंदिर आहे कार्तिकेयाचं. त्या मंदिरात प्रवेश केल्यानंतर प्रसाद वगैरे घेऊन तिथून बाहेर पडलो. त्याच वेळेला तिथे मला एकदम ती 'नीमट्रीज' अशी ती कडुलिंबाची झाडं दिसायला लागली. एके ठिकाणी पार असल्यासारखं होतं त्या पारावर जाऊन मी बसलो. वाटलं अरे आता सापडला कडूनिंब आपल्याला. मोक्षस्थळम व नीम ट्री ते हीच जागा असेल. तिथे मी अर्धा तास ध्यानस्थ बसलो. आणखी तिथे मला खूप समाधान वाटलं. चला महर्षींनी जे सांगितलं होतं ते सापडलं.

राजेंद्र पाठक - आपण नंतर स्नानासाठी अगस्तींनी बोलावलेल्या धबधब्यापाशी गेलात असे मघा आपल्या बोलण्यात आले त्याविषयी सांगाना सविस्तर.

ओक – हो जरूर सांगतो. तर धक्के खात असा प्रवास करत करत मी तिरूनेलवेली या शहरापाशी बसने आलो आणि तिथून पापनाशम म्हणून एक गाव आहे तिथे जा असं सांगण्यात आलं. पापनाशमपासून एका बाजूला अगस्ती फॉल/धबधबा आहे आणि पहाडाच्या दुसऱ्या बाजूला अत्री महर्षींचं 'कूड' म्हणजे आश्रम आहे असं सांगण्यात आलं होतं. त्याप्रमाणे मी त्या भागात जायला निघालो तर बसमध्येच एकाने सांगितलं की तुम्ही त्या पापनाशममध्ये मुळीच जाऊ नका. ते अतिशय छोटं खेडं आहे. तिथं तुम्हाला राहायची सोय होणार नाही. त्याच्या आधी अंबसमुद्रम म्हणून एक गाव आहे तिथं थांबा आणि ते अशा जागी आहे कि तिथून अगस्ती धबधबा व अत्रींचा आश्रम दोन्ही ठिकाणी जाण्यासाठी बसेस किंवा इतर सोय होईल. त्याप्रमाणे मी तिथे अंबसमुद्रमला रात्र काढली आणि दुसऱ्या दिवशी सकाळी सहा वाजता अगस्ती धबधब्यापाशी जायला म्हणून निघालो. तिथं सुरूवातीची काही आठ-दहा किलोमीटर बसने प्रवास केल्यावर आटोरिक्षामधून जावं लागतं आणि तो सगळा टायगर प्रोजेक्टचा भाग असल्यामुळे तिथे आत जाता-येता संपूर्ण जंगल असल्यामुळे सरकारी परवानगी घ्यावी लागते.



Figure 8 **पापनासम जवळील अगस्त्य धबधबा..**

मग ती परवानगी घेत आम्ही तिथपर्यंत पोहोचलो. मला असं वाटलं होतं की, महाराष्ट्रात धबधबा म्हटल्यावर तिथे साधारण दोनतीनशे गाड्या आणि त्या धबधब्यात आंघोळीला आलेले लोक असा पिकनीक स्पॉट झालेला दिसतो. पण याठिकाणी फक्त तीनचार माणसं होती. तेही आंघोळी करून सटाकायला लागलेले. त्यामुळे तिथे जवळजवळ मी एकटाच अशी स्थिती जाणवू लागली. त्यावेळेला मी असा विचार करत होतो की आता त्या धबधब्यापाशी जायचं तर त्याच्या अलीकडेच एक माणूस मला म्हटला, "तुम्हाला मॉलीश करून देतो मी." मी काही मॉलीश करून घेणाऱ्यांच्या टाईपचा माणुस नाहीय. म्हणत मी त्याला नाही असं म्हटलं. पण तो कसं काय म्हणाला, 'अहो माझ्याकडून करून घ्या – मॉलिसा...

का कुणास ठाऊक आणि मीही त्याच्या म्हणण्याला मान्यता दिली. म्हटलं,'बर, चल कर'. मग किती पैसे वगैरे ठरलं आणि त्याने मला कपडे अंगावरचे काढून माझ्या अंगावर तिळाचं तेल अतिशय चोपडून असा काही रगडा दिला की, पंधरा मिनिटात माझी प्रत्येक गात्रं ढिली झाल्यासारखी परिस्थिती करून टाकली. त्याच्यानंतर तो म्हणाला, 'आता जा तुम्ही आंघोळीला'. त्या मधल्या काळात रस्त्याच्यावरच्या जाणाऱ्या एका माणसाला मी म्हणालो, 'अरे माझा फोटो काढा कोणीतरी. त्यांच्याकडून मी फोटो पण काढून घेतले मजा म्हणून. मालिश करून घेता घेता मी इकडे तिकडे पहात होतो की अगस्त्य मुनी कुठे दिसतायत का ते. कुठे काही मागमूस दिसेना!

तिथून मी अंघोळीसाठी त्या धबधब्यापाशी गेलो. तिथे गेल्यानंतर त्या धबधब्यामध्ये जवळजवळ पंधरा ते वीस मिनिटे मी बसून होतो. त्यावेळेला बसल्याबसल्या असं माझ्या तोंडावर-अंगावर त्या धबधब्याचं पाणी एवढ्या जबरदस्त येत होतं की, त्यामुळे डोळे आपोआप मिटत होते. डोळे उघडले की त्या पाण्याच्या धारेतून आणि तुषारातून थोडंफार दिसायचं. कधी-कधी तो माणूस मला समोर उभा राहिलेला दिसायचा ज्याने मला रगडा दिला होता तो तर कधी नाही दिसायचा. असेल कुठेतरी म्हणून बेफिकिरीने मनांत म्हणत होतो. त्याच्याजवळ मी सगळे कपडे वगैरे असं मोबाईल आणि माझं सामान दिलं होतं. पंधरा वीस मिनिटं झाल्यावर मी परत आलो आणि त्याने अगदी लगेच माझा टॉवेल वगैरे एक-एक वस्तु एखादा असिस्टंट असतो तशा दिल्या. मी कपडे वगैरे केले, त्याला त्याचे पैसे वगैरे

दिले, धन्यवाद म्हणून चलतो म्हटलो. त्याने हात केला, 'नाही नाही' असा आणि माझ्या हातातली प्लॅस्टिकची जी बॅग होती ती काढून घेतली आणि तो म्हटला, 'चला.'

मी इकडे तिकडे पहात अगस्त्य मुनी इतक्यात आले तरच दर्शन होईल. असे मनात म्हणत होतो. मग मी पुढे आणि माझ्यामागून तो. असं करत करत मी तिथे ऑटोरिक्षा लावली होती तिथे जवळजवळ अर्धा तास चाललो.

राजेंद्र पाठक - सर मघाशी तुम्ही बोलता बोलता उल्लेख केलात तो माणूस पैसे घेईना.

ओक - तर मला असं वाटायला लागलं बहुतेक या माणसाला आणखीन पैसे हवे असणार अशा हेतूने तो मागे मागे आलेला असणार. तोपर्यंत ती रिक्षा आली. रिक्षात बसलो आणि त्याला हातानी म्हटलं, 'बरं, ठीक आहे'. माझ्या मनात भाव असा की मी त्या व्यक्तीला पैसे दिलेले आहेत आता याला बहुतेक पैसे जास्त हवेत म्हणून मी खिशात हात घातला. त्यावेळी माझ्याकडे एकदम पाचशेची नोट होती. माझ्या मनात आलं एवढे काही द्यायची गरज नाही. तर मी त्या रिक्षावाल्याला म्हटलं, ' तुझ्याकडे काय असतील तर पन्नास रूपये दे त्याला', तर त्याच्याजवळही पैसे नव्हते. तो म्हटला, 'आपण आता असं करू जिथे तुमच्या नावाची नोंद केलेली असते त्या जंगलाच्या कार्यालयात जाऊ तिथे कदाचित मोड मिळेल'. म्हणून आम्ही तिथपर्यंत पोहोचलो तोपर्यंत हाही मागून चालत आला. तिथेही तो हात जोडून ऊभा! तोपर्यंत त्या रिक्षावाल्याला पैसे मिळाले. मी सांगितले 'त्यातले पन्नास रूपये त्याला दे म्हणून. मी तुला नंतर देईन'. 'बरं' म्हणून त्याने पैसे घेऊन त्या माणसाच्या हातात ठेवले आणि तमिळमध्ये बोलला तो, पण यावर तो 'नाही, नाही मला पैसे नकोत' असं म्हटला.

मला आश्चर्य वाटलं हा पैसेही घेत नाही मग आला कशाला ? त्याने मला हात केला नाही – 'नाही मला नको' असा.

राजेंद्र पाठक - एकदा ईश्वरन साहेब म्हणत होते की, साऊथमधे पैसे नकोत असं म्हणणारा माणुस भेटणं जवळजवळ शक्यच नाही. तर हा प्रकार काय आहे?

ओक - तेही सांगतो. त्या व्यक्तीने नाही असं म्हटलं. मी रिक्षावाल्याला म्हटलं की नाही तू त्याच्या खिशात घाल. त्याने काहीतरी करून कोंबले त्याच्या खिशात आणि आम्ही निघु लागलो. ज्यावेळेला ती रिक्षा चालू झाली. अन थोडी पुढे गेली. त्या क्षणाला माझ्या लक्षात आलं, 'अरे... हे दुसरे तिसरे कुणी नसुन अगस्ती महर्षी होते! कारण ज्यावेळेला मला भविष्य कथन केलं गेलं. ते होतं रावणनाडीत. ऑक्टोबर 2010 मध्ये मला सांगण्यात आलं होतं की, तु अगस्त्य धबधब्यापाशी जा. तिथं तुला अगस्ती मनुष्यरूपात दर्शन देतील. खरं म्हणजे मी अगस्ती धबधब्यापाशी असताना भिरभिरत्या नजरेने अगस्ती ऋषी – अगस्ती ऋषी कुठे दिसतात का असे शोधत होतो. अगस्ती ऋषी माझ्या समोर ऊभे होते. मला ते कळलेच नाही. ज्यावेळेला ती रिक्षा तिथून निघाली त्यावेळेला माझ्या लक्षात आलं की ह्या माणसाने पैसे का घेतले नाहीत? या माणसाच्या हातात माझी पैशाची बॅग होती. त्याला पैसे काढून घ्यायचे असते तर त्याने माझ्या पाचशेच्या सगळ्या नोटा काढून घेतल्या असत्या. त्याने काही केलं नाही. त्याने माझा फोटो काढला आणि सामान्यपणे पुरूष – पुरूषाला कधीही टच करत नाहीत. यांनी मला रगडा देता – देता माझ्या संपूर्ण शरीराच्या सगळ्या गात्रांना हात लावला! अशी 'ही विल टच यू अण्ड गिव्ह यू ब्लेसिंग.........' असे त्या रीडिंगमधे पुढे म्हटले होते! याचा असाही वेगळा पडताळा मला आला की, मधल्या काळात इकडे तिकडे फिरत होतो, समुद्रस्नान वगैरे झालं. म्हणून बऱ्याच वेळेला जांघामध्ये खुप खाजल्यासारखं होत होतं. तो तिथून निघून गेल्यानंतर माझ्या जांघामध्ये जे होत होतं. तर तेही एकदम नाहीस झालं. आपल्याला कायाकल्प योग येईल हा नाडीग्रंथामध्ये तो हा दिलेला भाग आहे. आणि ते झालंच. त्याच्यानंतर मी आता इथं पुण्यात आल्यानंतर माझ्या डोळ्याच्या खालच्या बाजूला मला कधी-कधी जड असं जाणवतं ते नाहीसे झाले. कारण नाडीग्रंथांत म्हटल्याप्रमाणे तुम्हाला लकवा येईल. तसा मला एक बारीक लकवा आला होता.

राजेंद्र पाठक - काय सांगताय तुम्हाला आणि लकवा?

ओक - अरे आपल्याला कशाला लकवा येईल असे मला वाटे. पण तो आला! ज्यावेळेला मला नागीण झाली तेंव्हा डोळ्याखालच्या भागात ओठांपर्यंत, त्या हार्पिसचा एक भाग म्हणून नर्व्ह नंबर फाईव्ह आणि सेव्हन अफेक्ट झाली. आता मला जाणवतयं की, मला तो जो एक त्रास किंवा धरून ठेवल्यासारखा व्हायचा तर त्याचीही मला जाणीव होत नाहीय. (गालावरील भागकडे निर्देश करत) हा जो भाग आहे, हा त्या महर्षींच्या आर्शिवादाने ठीक झालेला भाग आहे आणि 'महर्षी दर्शन देऊन गेले ते तुला कळेल ते दर्शन झाल्यानंतर' हे जे महर्षींनी जे म्हटलं होतं ते तंतोतंत खरं झालं.

राजेंद्र पाठक - हा तुमचा अनुभव एकताना आम्हाला रोमांचकारी वाटतय तर प्रत्यक्ष अनुभवताना तुमची काय स्थिती झाली असेल.. असो. सर आपल्या या मुलाखतीबद्दल धन्यवाद....

## 6. साद रामेश्वरमची .... –

संकलन – शशिकांत ओक

"शशिकांतजी आप को हमारे साथ रामेश्वरम आना है।"

असा राजन अलदानजींचा हुकूम वजा आदेश मला फोनवरून आला व मी तात्काळ होकार कळवला. झाले. मी कामाला लागलो, तोवर हवाई प्रवासाची तिकीटे आली.

मधल्या काळात मला महर्षी अत्रींच्या जीव नाडीत सांगण्यात आले, "तुला सांगून अजूनही अमुक अमुक ते सोपस्कार तू केलेले नाहीस. आम्हाला कल्पना आहे की तू मुद्दाम टाळत नाहीस पण त्याची तातडी आहे हे लक्षात ठेव. मी, अत्री, आता नाडीवाचकाला अशी आज्ञा करतो की त्याने तुझ्यासाठी व तुझ्या पत्नीसाठी सांगितलेली गोष्ट त्याच्या खर्चाने करावी."

मी ते उत्तर ऐकून थक्क झालो. कारण आत्तापर्यंत माझ्या व कुटुंबियांकरिता केलेल्या सर्व शांती-दीक्षा माझ्या खर्चाने मी करत आलो आहे. पुर्वीपासून अनेक लोक त्यांचे अनुभव मला सांगत की त्यांना शांती-दीक्षेच्यासाठी महर्षी म्हणाले की तुला परवडेल तितकी दक्षिणा नाडीवाचकाला दे किंवा तुला शांतीदीक्षा करायची गरज नाही. तू जे नाडी वाचकाला देशील ते पुरे आहे. ते आदेश नाडी केंद्रातील लोक तत्परतेना पाळतात. जादापैशाची मागणी करत नाहीत.

आजकालच्या जमान्यात पैशासाठी काहीही करायला तयार असलेले लोक पाहून असे काही नाडीकेंद्र चालक महर्षींचे आदेश आपणहून मानतात. वेळोवेळी फुकट नाडी कथन करतात यावर विश्वास बसणे शक्य नाही. आता तर त्याचा मला पण प्रत्यक्ष अनुभव येणार होता. नाडीवाचन झाल्यावर नाडी केंद्र संचालक म्हणाले, "असे आदेश मला आधून मधून मिळतात. तेंव्हा आपण संकोच मानू नका. आपणां उभयतांसाठी सर्व व्यवस्था मी करतो. आपण केंव्हा तमिळनाडूत जाणार ते फक्त ठरवा."

रामेश्वरला जायचे निमंत्रण अलदानजींकडून मला आले ते याच दरम्यान! एरव्ही टाळाटाळ करणारी पत्नी ही आश्चर्यकारकरित्या तयार झाली लगेच तिचे हवाईतिकीट काढले. रामेश्वरमला जायला मदुराईपर्यंत हवाईप्रवास झाला. एक मिनी बस तयार होती. त्यात आरूढ होऊन आमची रामेश्वरमला रवानगी झाली. तेथील समुद्रात स्नान झाले आणि आम्ही नाडी वाचनाला सरसाऊन बसलो.

"आज नाही उद्या सकाळी" असा आदेश झाला म्हणून रात्री गप्पांना उत आला. "बताईये ना शशिकांत जी, आजकल आपका क्या चल रहा है? अशा विचारणांना उत्तरे देता नाकी नऊ आले.

आमच्यासोबत आलेले १२ जण आधी एकदा मागच्याच आठवड्यात रामेश्वरमला येऊन परत काशी-वाराणशीला गंगेत स्नान करून परत रामेश्वरमला आले होते. सततच्या प्रवासाने तेही फार थकले होते. सकाळी नाडीपट्ट्या शोधायला सुरवात झाली. काही पट्ट्या बाद झाल्यावर एका पट्टीत नावे, जन्मदिनांक, ग्रहमान इ. जुळले अन् वाचनाला प्रारंभ झाला. त्यातील वर्णन ऐकून सगळ्यांना थक्क व्हायला झाले. नंतर आणखी अनेकांच्या पट्या निघाल्या त्यातील कथनांनी अनेकांना उत्साह आला.

दुपारच्या जेवणानंतर पुन्हा एकादा महफिल जमली. करता करता संध्याकाळ व्हायला लागली, तेंव्हा एकांची पट्टी वाचायला सुरवात होणार, इतक्यात एक आदेश आला, "आपण रामेश्वराची वाळू व जल काशीला गंगेत सोडलेत आणि तेथील जल आणि मृत्तिका कथनाप्रमाणे रामेश्वरमच्या समुद्रात सोडलीत. पण त्या धांदलीत एक गोष्ट करायला मात्र आपण विसरलात. ती केली की वाचन करायला पुढे परवानी मिळेल. तोवर नाही." झाले.

चर्चा झाली, त्यांना तसे विचारण्यात आले. खरोखर त्यांनी २२ विहिरीतील जलाने अंघोळ केलेली नव्हती असे निष्पन्न झाले. मग साऱ्यांनीच २२ विहीरीतील जलाने आंघोळीचा लाभ घ्यायचे ठरले. आम्ही धावलो. कारण तेथे स्नानाची वेळ सुर्यास्तापर्यंतच असते. आम्ही पोहोचलो तोवर फक्त काही मिनिटे उरली होती. पटापट तिकिटे काढून एका एका विहितील पाणी पाळीपाळीने आम्ही १४ जणांनी अंगावर घेत २२ विहिरींची परिक्रमा पूर्ण केली आणि परत कपडे बदलून वाचनाला बसलो. तेंव्हा महर्षी म्हणाले, "अशी त्वरा करावी, तेंव्हाच मनाच्या निश्चयाची परीक्षा होते. आत्ता केलेल्या स्नानाचा विसर तुम्हाला पडणार मग तुम्ही त्वरेने ती करणार. हे सर्व पुर्व नियोजित होते. जसे आम्ही आता तुम्हाला जे कथन करणार आहोत. ते ही असेच पुर्व नियोजित असेल. तुम्ही आता त्या एकाची नाडीपट्टी वाचायला मनाने तयार झाला आहात. आणि आम्हीही."

त्याच काळात अण्णा हजाऱ्यांचे उपोषण भर-बहरात होते. कधी नव्हे ते भारतभर उत्साहाने जनप्रवाह आपापल्यापरीने काही तरी करून दाखवायला सरसावला होता. त्यावर महर्षी काही भाष्य करतात काय? किंवा सूचक काही वर्तवतात काय? याची उत्सुकता आम्हाला होती. त्याप्रमाणे 28 तारखेला एका महत्वाच्या प्रश्नाला तोंड फुटेल व पुढील काळात त्याचा प्रभाव जाणवेल. असा महर्षींचा उल्लेख विचार करायला लावणारा होता.

त्यानंतर तिकडे आम्हा पति-पत्नीसाठी आणखी काय आश्चर्य तयार होते?.... ते नंतर केंव्हातरी....

## 7. अलदान कोण ?

*...साद रामेश्वरची प्रकरणातील कथनामुळे हे अलदान कोण? असा प्रश्न वाचकांना पडेल म्हणून सात वर्षापुर्वीच्या एका लेखात मला पडलेल्या पेचाचे उत्तर सादर करत आहे...*

दि. १५ जून २००५ तसा नेहमी सारखाच. आदल्या दिवशी अचानक मोबाईल खणखणला. पुनीत वालीयांचा आवाज... "शशिकांतजी हम पूना पहुंच रहे हैं, आपसे मिलने । कब, कैसे मिलेंगे बताईये । एक-दो दिन रूकने का विचार है । साथ में राजन शर्माजी भी है।...."

आठवले की दोन महिन्यापूर्वी राजन शर्मांनी एक लांबलचक पत्र पाठवले होते. त्यांच्या नाडीभविष्याबद्दलच्या विचाराचे, अनुभवाचे. त्यातच त्यांनी पुण्याला भाड्याचे घर घेऊन राहण्याविषयी सुतोवाच्य केले होते. मीही त्यांना.. जरूर या.. घराची व्यवस्था मी केली समजा, असे छातीठोकपणे सांगितले होते! आता तर ते पुण्यात आले!!

मी गाडी कोरेगाव पार्कमधील माझ्या घरी वळवली. तेवढ्यात पुन्हा घंटी वाजली. "आम्हाला एखादे हॉटेल सुचवा!" मी तर त्यांना माझ्या घरी नेण्याचा विचार करत होतो. सहज नाव सुचले, म्हटले रेल्वे स्टेशनमागील ताडीवाला रोडवरील हॉटेल माधवला जा.. पूर्वी असाच एक फोन आला होता, स्वामी, आम्ही पुण्यात नाडीकेंद्र उघडायला पुण्यात आलोय. हॉटेल माधव मधून बोलतोय. पुढे काय करायचे ते ठरवायला या..." अचानक न कळवता... त्याची सोय त्याच दिवशी झाली. संतोष - माझ्या चुलतभावाच्या - इतिहासतज्ञ श्री. पु.ना.ओकांच्या चिरंजीवांच्या - बंगल्यावर...नंतर ते केंद्र पुढे कल्याणी नगर, विमाननगर, करत सध्या कोरेगाव पार्कमधे लोकप्रिय आहे.

रात्री मी घरी पोचल्यावर त्यांचा फोन आला. "आम्ही हॉटेल माधवमध्ये A-24 रूममध्ये आहोत. पुढचा - उद्याचा काय कार्यक्रम...?" आम्हाला अद्याप न पाहिलेल्या महर्षींच्या नाडीकेंद्रात जाऊन भविष्य जाणून घ्यायचे आहे. तुमची प्रत्यक्ष भेट व नाडीकेंद्रातून भविष्य पडताळणे, हीच कामे..." ज्यांनी दक्षिणेतील सर्व गावे, नाडीकेंद्रे पालथी घातली आहेत त्यांना आणखी कोणत्या केंद्रात न्यावे? पेच पडला... पण आठवले, चिंचवडच्या ईश्वरननी अत्री महर्षींच्या जीवनाडी पट्ट्या आणल्या आहेत. तेथे त्यांना नेता येईल... ईश्वरनना फोन करून तातडी सांगितली. म्हणाले, मी तर काही नाहीये उद्या. पण वैदी (वैद्यनाथन्) ला तुम्ही ओळखताच. त्याला हिंदी येते. शिवाय तुम्हीपण आहात बरोबर. मी नसलो तरी आपण उद्या (दि. १५ जून २००५) जरूर या. मी वैदीला सांगून ठेवतो"... झाले. पुन्हा फोनाफोनी झाली व मी सकाळी ९ च्या आधी हॉटेल माधव मध्ये पोचलो. AC रूममध्ये पुनीत त्यांचे एक मित्र देवमणी शर्मा व राजन माझी वाट पाहत होते.

पुनीत वालीया ४२-४३ वर्षांचा.. तरतरीत, सरळ नाक, केस विरळ होत चाललेले, मिशांचा रंग पांढुरकासा होणारा. DSA इंजिनिअर्स नावाच्या फर्मचा मालक. गडगंज श्रीमंत. दिल्लीत, मुंबईत कंपनीची ऑफ़ीसेस. पत्नी मराठी; म्हणून थोडेसे मराठी येणारा, मिश्कील. चार वर्षांनंतर भेटत होतो, तरी नुकतेच भेटल्याचा आभास होत होता.

त्यांचा मित्र देवमणी शर्माला मी प्रथमच पहात होतो. चेहरा.... नुक्कड फेम हॉटेलच्या मालक नट अवतार गिलची आठवण करून देणारा. करारी, पुनीतच्यापेक्षा कमी वयाचे, थोडेसे अबोल असावेत.

राजन शर्मा पिवळ्या हाफ बुशकोटात... हसत पुढे आला. हातात हात घेऊन म्हणाला "आप को पूना जंच गया लगता है ।" (आपल्याला पुणे मानवलेले दिसतेय!) मी त्यांच्या छातीला छाती लावत म्हटले नुसते शेकहँड नाही, "गले मिलना पडेगा ।" एक आनंद उचंबळला. लुधियाणा हलवाऱ्याची आठवण काढून राजन म्हणाला, "पत्रात म्हटल्याप्रमाणे आलोय आपल्या भेटीला. चेष्टेने म्हणाला, "या करोडपतींनी मला आतल्या खोलीत झोपवले, पण रात्री दोनपर्यंत गप्पा मारताना उद्या अत्री नाडीत काय येतंय, ओकांची कशी काय प्रतिक्रिया होईल... वगैरे विषय होते. अत्री ऋषी कोण?... त्यांचे कार्य काय?... वगैरेही बोलणे झाले... चला लगेच निघू या..." राजनला ४० वे वर्ष लागणार असे वाटत नव्हते. उंच सडसडीत बांधा, गोरापान रंग, धारदार नासिका, काळेभोर खांद्याला रूळणारे केस, दाढी भरपूर वाढलेली पण छान रूबाबात ठेवलेली. तीही काळीभोर. डोळ्यांना मॉडर्न डिझाईनचा चष्मा, मिश्वास वाणी. हिंदीतून बोलताना संस्कृत भाषेचा प्रभाव. मध्येच आपले म्हणणे पटवण्यासाठी इंग्रजी शब्दाचा वेचक उपयोग. प्रसन्न व्यक्तिमत्व. एकदा पाहिले, बोलले, की लक्षात राहणारे.

आठवले, की चार वर्षांपूर्वी मी हवाईदलातील हलवाऱ्यातील स्टेशनमधे कार्यरत असताना असाच एकदा अचानक फोन आला होता. "आपले हिंदीतले पुस्तक वाचले. आपला अभ्यास आहे असे तात्काळ जाणवले. भेटीची इच्छा आहे. केव्हा येऊ..." पुढचा शनिवार / रविवार ठरला. ते आले, माझ्या मेसमधील रूमवर राहिले. गप्पांच्या ओघात होशियारपूरच्या भृगुसंहितांचा उल्लेख आला. लगेच दुसऱ्या दिवशी टॅक्सी ठरवून आम्ही होशियारपूरच्या केंद्राला भेटी दिली. पट्टी निघाली नाही. पण वाटेत गप्पांना ऊत आला होता. "बता दें क्या?" अशी एकमेकांच्यात चर्चा झाली. मग कळले की पुनीत व त्यांच्या नातलगांच्या नाडी भविष्यात वेळोवेळी "अलदान" या नांवाचा उल्लेख येतो. पण तो कोण हे कळत नाही. "त्यासंबंधी आणखी कोणाच्या पट्ट्यांत तसा उल्लेख आल्याचे आपणांस माहित आहे काय?" त्यांनी विचारले... मला ते नांव नवीन होते. वेगळे वाटले. मी ऐकले नव्हते, ना माझ्या संबंधीच्या पट्ट्यात ना इतरांच्या... "शोध घेत राहिन" असे मी म्हणालो त्यांना, जेंव्हा ते रेल्वेने दिल्ली परतले तेंव्हा.

त्यानंतर पुण्यात जेंव्हा केंव्हा पट्ट्यांच्या शोधाची वेळ आली तेव्हा "अलदान"चा विषय निघे. "तुला योग्यवेळी त्याची भेट होईल. तोच आपणहून भेटेल" असे महर्षींनी सुचवल्याचे कळे. पण शोध चालूच होता.

आज दि. १५ जून २००५ ला त्यांच्या AC गाडीतून चिंचवड नाडीकेंद्रात गाडी पोचली. वाटेत मी गेल्या ३/४ वर्षांतील ठळक घटनांचा संदर्भ दिला. योगी रामसुरतकुमारांच्या ध्यानमंदिरात मला घडलेले अनोखे विश्वदर्शन ऐकण्याची राजनने इच्छा दर्शवली. मला आठवले तसे सांगण्याचा प्रयत्न केला. ...संपूर्ण अवकाशाचे वेगवेगळे विभाग असावेत. त्या-त्या विभागात वेगवेगळ्या महात्म्यांच्या प्रेरणा, कामे करत असतात. ज्या-त्या व्यक्तीच्या कुवतीवर त्याची प्रगती घडवण्यास हे महात्मे प्रेरणा देतात. मदत करतात. जणू काही, वेगवेगळ्या तऱ्हेची विमाने एकाच वेळी आकाशात विहार करतात, वेगवेगळ्या दिशांना वेगवेगळ्या उंचीवरून, अन् त्याचे नियंत्रण एका केंद्रातून चालते. जरी प्रत्येक विमान आपआपल्या चालकाच्या नियंत्रणात असले. तरी प्रत्येक चालकाला मुख्य नियंत्रण केंद्राच्या आज्ञा पाळाव्या लागतात. तसेच काहीसे. कोणी नाठाळपणा केला वा धडपडला तर नियंत्रण केंद्र त्याला काही अंशी मदत करेल, पण सर्वस्वी नाही. राजन लक्ष देऊन ऐकत होता. हसून दाद देत होता.

केंद्रात नेहमीप्रमाणे लोकांची वर्दळ होती. एकाचे काम निपटून वैदी रूमबाहेर आला. आम्ही आल्याचे पाहून तो अत्री

नाडी पट्ट्या आणायला गेला. आम्ही तोवर महर्षींच्या फोटोंना नमस्कार करून स्थानापन्न झालो. एका पिवळ्या कपड्याला टेबलावर अंथरून वैदीने बारा कवड्यांचे दान पुनीतच्या हाती दिले. तेवढ्यात मी वैदीची त्यांना व त्यांची वैदीला थोडक्यात ओळख करून दिली. मुद्दाम या नाडी केंद्रात तुझ्याकडील अत्री जीवनाडीचा अनुभव घ्यायला हे तिघे दिल्लीहून खास आलेत असे कळताच त्याला आश्चर्य वाटले. उत्साह दुणावला.

पुनीत नी कवड्या खुळखुळवून दान टाकले. आठ पालथ्या व चार उलथ्या पडल्या होत्या. मनात मोजत वैदीने एका पॅकेटची दोरी सोडली व एक पट्टी हातात घेऊन वाचायला तयार झाला व म्हणाला, "विचारा प्रश्न". पुनीतने परिचित प्रश्न विचारला. "अलदान के बारेंमें बताईये!" वाटले, हा अजून अलदानच्या शोधातच अडकून पडलाय वाटतं. आज अत्री महर्षींनी त्याचे शेवटचे निराकरण करून रहस्याचा परदाफाश करावाच!



Figure 9 पिवळ्या कापडात गुंडाळलेल्या अत्री जीवनाडीची 3पॅकेट्स व 12कवड्या.

इकडे वैदीचे तमिळमध्ये वाचन चालू झाले. एक ते दोन वाक्ये वाचून तो हिंदीत उत्तर देता झाला. अलदान (की अलतान) चा जन्म झालेला आहे. पण सध्या त्याचे नाव अलदान नाही. त्याचे वास्तव्य उत्तरेला आहे. या कलियुगातही पूर्वजन्मामुळे त्याचे आत्मिक बळ प्रचंड आहे. महर्षी अत्री पुढे सांगतात पूर्वी नल-दमयंतीच्या आख्यानातील त्यांच्या पूर्वावतारात त्या दोघांचे दांपत्य जीवन जंगलातील एका झोपडीत चालत असे. एके दिवशी एका ऋषींना त्यांच्याकडे थांबावे लागले. झोपडी फक्त दोघांची होती. बाहेर रात्र काढणे धोक्याचे होते. शेवटी पती बाहेर झोपला व वाघाने शिकार केल्याने मृत झाला. दमयंतीला - तिच्या पूर्वजन्मातील पत्नीला - शोक अनावर झाला. त्याच्या भरात तिने झोपडीत आलेल्या गुरूमुळे असे घडले असे वाटून शिवाला आळवले. त्यानंतरच्या जन्मांत ते दोघे पती-पत्नी शिवमंदिरांच्यावर पक्षी बनून घिरट्या घालत घुटमळत राहिले. त्यांचे आत्मिक बल या व्यक्तित अवतरले आहे... (यामधील शेवटचे वाक्य वैदीच्या हिंदीच्या आकलनातील कमतरतेमुळे मला जसे लक्षात आले किंवा वाटले तसे मी इतरांना सांगितले.)

पुढचा प्रश्न विचारायला पुनीतने हात जोडले व म्हणाला, "हे महामुनी अत्री, बालक पुनीत आपसे ये जानने की इच्छा

रखता है की अलदानचा व आमचा संबंध काय...? आम्हाकडून अलदानची कशी मदत केली जाईल...?" पुन्हा दान

पडले त्यावरून गणित करून वैदीने दुसरी पट्टी उचलली व वाचून म्हणाला, "इन्दनाळिल् अवनै कण्डान्", अर्थात महर्षी म्हणतात, ‘आपण त्याला आजही पाहिलेले आहेत. ईशन्, शिवजींच्या दर्शनोत्सुक जातका, तो तुझ्याजवळ शेजारीच विराजमान आहे. त्याला ज्योतिषशास्त्राचे ज्ञान आहे. जो सदैव देवधर्माच्या कामाशी निगडीत असतो. आश्रम मंदिरांना (कट्टिडम्) मदत करतो, असा तो इथे आत्ता उपलब्ध आहे. त्याचा व तुझा घनिष्ठ संबंध आहे. तुझा पुढे उपयोग केला जाणार आहे."

**मनातून तरंग उठले. हे दान, ह्या कवड्या, ह्या पट्या, ती लिपी, ती भाषा हे सगळे बहाणे आहेत. ती वेळ, ती जागा, ती व्यक्ती एकत्र आणण्याचे. आपण कोण, काय, कोणाला, कोणासाठी प्रश्न विचारणार? या ओळीत उत्तरे तयार आहेत. प्रश्नकर्त्याने त्या उत्तरासाठी प्रश्न बनवायचे काम करायचे...!**

पुनीतचे हात पुन्हा जोडले गेले. तिसऱ्या प्रश्नाकरता कवड्यांचे दान पडले. प्रश्न केला गेला. महान अत्री महर्षी, मी माझ्या आराध्यदेवतेची पूजा जरा हटके वेगळ्या पध्दतीने करू इच्छितो. त्यासाठी मार्गदर्शन करा.

पुन्हा काही पट्ट्यांना ओलांडून एका पट्टीवर नजर केंद्रीत करून वैदी वाचू लागला. अत्री महर्षी एक कथा सांगतात, "पूर्वी एक कण्णप्पन् नावाचा एक व्यक्ती होता. सामान्य जीवन जगणारा तो प्रखर शिवभक्त होता. शिवाची पूजा तो न चुकता करे. पूजेला फुले आणून वाही. काही कारणाने फुले न मिळाल्याने त्याने वाहण्यासाठी आपल्या शरीराचा एक-एक भाग देण्यास सुरूवात केली. डोळा फोडून रक्त वाहत असताना शिवांनी ओंजळीतील डोळा परत लावत त्याचा दानधर्माची प्रशंसा केली. तू वेगळेपणाने शिवाची पूजा करू इच्छितोस, जरूर कर. मनाने वासनांची आहुती दे. दररोज निरिच्छपणे ’ॐ नमः शिवाय’ जप १०८ वेळा कर. तुला तेवढेच गरजेचे आहे."

यापुढे प्रश्न विचारण्याची पाळी होती. श्री. देवमणी शर्माजींची जे राजन व पुनीतच्या बरोबर दिल्लीहून आले होते. त्यांना कवड्या हातात घेऊन दान टाकले व शंकरांच्या मूर्तीला मनात स्तवून प्रश्न केला. "प्रत्यक्ष शंकर भगवानच अलदान आहेत का?"

वैद्यनाथनने पट्यांचा शोध घेतला. काही पट्ट्यांना मागे सरकावून एका पट्टीवर नजर बारीक करून तमिळ वाचून हिंदीत अर्थ सांगायला सुरूवात केली. मी सारांशाने अर्थ समजून घेतला. महर्षी अत्री म्हणाले, "प्रत्येक जीव शिवजींचा अंश आहे. अलदानला शिवजींचा आशिर्वाद आहे. पण अलदान प्रत्यक्ष भगवान नाहीत." तीन वाक्यात उत्तर संपले! अलदान बद्दलची उत्कंठा मात्र जास्तच वाढली!

शिवमणींनी नवा प्रश्न विचारायला हातात बारा कवड्या घेतल्या. डोळे मिटून देवाला स्मरून दान टाकले. प्रश्न विचारला, "भ्रष्टाचाराने लिप्त हे जग कसे मुक्त होईल. ते काम कोण करेल."

वैद्यनाथनने पट्टी निश्चित करून वाचायला चालू केले. "सेयवदुम निरूपाल इरूपाही. सिध्दीडवे, नीराले पलविईर पोई... पोईडवे सिल सिर भूतम इन्नम उंड..." तमिळ शब्द माझ्या कानावर पडत होते. या जगावर पंचमहाभूतांचे साम्राज्य आहे. प्रत्येक महाभूताचा कोप किंवा, उधाणाची वेळ येते. त्यावेळी जगावर विविध घटना निर्माण होऊन मोठ्या प्रमाणात उलथापालथ होते. अग्नी, आप, तेज, वायू व पृथ्वी ही ती तत्वे आहेत हे आपण जाणतो. भ्रष्टाचाराचा विनाश हा नैसर्गिक आपदांमधून होत असतो. तरी नुकताच पाण्याचा प्रचंड लाटांमुळे विनाश झाला. धरणीकंप, वादळे, वीजा पडून वगैरे पंचमहाभूतांचे शक्तीप्रदर्शन होते. तथापि सर्वस्वी विनाश करून अपप्रवृत्तींचा नाश होणार नाही. मात्र ज्यांना या कुप्रवृत्तींपासून संरक्षण करायचे आहे त्यांनी "ॐ नमः शिवाय" या शिवमंत्राचा १०८ वेळा जप करण्याने

त्यांच्यावर वाईट परिणाम कमी प्रमाणात घडतील. त्रास व कष्ट सुसह्य होतील. तेव्हा या कुप्रवृत्ती आपदा व कष्टांपासून प्रत्येक व्यक्तीने स्वत:ला वाचवावे, सोडवावे लागेल. ते काम कोणी एकटा करू शकणार नाही, कारण पंचमहाभूतांवर आपले नियंत्रण कोण करू शकेल?

देवमणी, राजन व पुनीतला मी वैदीने सांगितलेल्या अर्थाचे अर्थवाही वाक्य बनवून सांगताना आतून स्फुरण आल्यासारखे झाले. पुढील प्रश्नाला सर्वजण सरसावून बसले. कवड्या शिवमणींच्या दोन्ही हाताच्या ओंजळीत खुळखुळल्या. उलट सुलट पडून पट्टी शोधण्याला हवा तो आकडा निर्माण करून गेल्या. सगळ्यांच्या नजरा दानावर होत्या. मनातून तरंग उठले. हे दान, ह्या कवड्या, ह्या पट्या, ती लिपी, ती भाषा हे सगळे बहाणे आहेत. ती वेळ, ती जागा, ती व्यक्ती एकत्र आणण्याचे. आपण कोण, काय, कोणाला, कोणासाठी प्रश्न विचारणार? या ओळीत उत्तरे तयार आहेत. प्रश्नकर्त्याने त्या उत्तरासाठी प्रश्न बनवायचे काम करायचे...!

देवमणीच्या प्रश्नाने शांतता भंग झाला. "मी शिवाची भक्ती बिना लोभ किंवा निष्काम भावनेने कधी करू लागेन..."

वैद्यनाथनने बोटांनी पट्टा पुढे-पुढे सरकवल्या, एका पट्टीवर नजर रोखली गेली. सध्या तुझे वय आहे ३८ वर्षे, जेव्हा तुझे वय ४४ वर्षे होईल त्यावेळी तुझे तमिळनाडूमधील पंचमहाभूतांवर आधारित भगवान शंकरांची मंदिरे आहेत तेथे दर्शने घेण्याचा योग येईल. त्यानंतर त्यांच्या आशिवार्दाचे फळ म्हणून मनासारखी भक्ती घडेल. ही पंचमहाभूतावर आधारित शिव मंदिरे कोणती...

(१) अग्नी तत्वाचे तिरूवण्णामलै,

(२) वायू तत्वावर आधारीत श्रीकालहस्ती, ( तिरूपती बालाजीच्या पायथ्याशी रेणिगुंठा स्टेशनपासून २५-३० किमीवर)

(३) आकाश तत्वाचे चिदंबरम्, नावावरूनच लक्षात येणारे

(४) पृथ्वी तत्वाचे कांचीपुरमस्थित एकांबरनाथ मंदिर.

(५) जल तत्वावरील कोणते, मला माहित नव्हते. वैद्यनाथनने माहित नसल्याची मान हालवली. राजनजीने म्हटले "मला माहित आहे" ते मंदीर तिरुच्चिरापल्लीचे जंबुकेश्वर मंदीर आहे.

नवी माहिती मिळाल्याचा आनंद झाला. देवमणींचे प्रश्न संपले होते.

आता बारी होती, राजन शर्माची. त्याच्या मुठीत कवड्या गेल्या. खुळखूळून विखरून पडल्या. प्रश्न केला गेला. “हे महर्षी अत्री, मेरे गुरु के संदर्भ में कहें” । आता पट्यांमधून अत्री राजनचे गुरू कोण हे सांगणार होते. पट्ट्यांच्या सरकण्याचा आवाज थांबला. वैद्यनाथन वाचायला लागला. थांबला. डोळे बारीक करून पुन्हा वाचायचा प्रयत्न केला. हातानी प्रश्नचिन्हाची मुद्रा करत, काय आहे कोणास ठाऊक! असे मनात म्हणत, म्हणाला, "महर्षी अत्री मला, नाडी वाचकाला ह्या प्रश्नाचे उत्तर देण्याआधी ’नमस्कार कर’ असे म्हणतात!" त्याच्या बोलण्याचा अर्थ आम्हाला नीटसा लागला नाही. नमस्कार कोणी कोणाला करायचा... जरा चर्चा झाली. राजन ती ऐकत होता. मला वाटले, नाडी वाचकाला महर्षी अत्री मानून आम्ही त्याला नमस्कार करायचा आहे. वैद्यनाथनने खुलासा केला, "नो, नो, सामी, आय नमस्कारम टू हिम..!" राजनकडे पहात तो म्हणाला. त्यानंतर त्या चिंचोळ्या जागेतील खुर्च्या हलवून जागा केली गेली. वैद्यनाथन् नमस्काराला खाली वाकला. तेवढ्यात त्याचा हात हातात घेत राजन म्हणाला, "काफ़ी है।" पुन्हा जागेवर बसून त्याने पट्टीवाचन केले, एकत्र ओळ वाचून अर्थ सांगितला. "इनका गुरू कोई साधारण इन्सान नही, साक्षात शंकर भगवानही उनके गुरू है।"

एवढे ऐकताच राजनजींना बसल्या-बसल्या गदगदून आले. आनंदाचे अश्रु आवरता येईनात. पुनीत व देवमणी उठून उभे राहिले. भावनांचा गहिवर अनावर झाला. आंतरिक उमाळ्याने सर्वांच्या डोळ्यातून अश्रूधारा वाहात होत्या. कोणीही कोणाशी बोलत नव्हते. भांबावलेला वैदनाथनही माझ्यासोबत उठून उभा राहिला होता. राजनजींचा चेहरा आनंद,

समाधान, अपेक्षापूर्तीने ओसंडत होता. किती वेळ ती अवस्था राहिली कळले नाही. झाली असतील पाच-सहा मिनिटे. त्यावेळांत भावविश्व बदलले. राजन - राजनजी झाले - अलदान झाले. रूमालांनी चेहरा ठाकठीक करत खोलीच्या बाहेर येण्याआधी पुनीतनी पाचशेच्या तीन नोटा केंद्रातील विविध देवतांच्या व शिवजींच्या फोटोच्या पायाशी ठेवल्या. काहीही न बोलता आम्ही केंद्र सोडले.

खाली उतरून गाडीत बसलो. मी व पुनीत मागे, देवमणी ड्रायव्हींग करत होते. त्यांच्या बरोबर पुढील सीटवर राजन गाडी कुठे न्यायची? असे विचारता राजन म्हणाले, "हम शशिकांत जी को मिलने आए थे। नाडीभविष्य जानना चाहते थे। दोनों काम हो गए। अब कहीं जाने की जरूरत नही।" माझ्या मनात जवळच राहणाऱ्या श्री. राजन व सौ. मीनाक्षी वैद्यांकडे नेण्याचे ठरत होते. नंतर गाडीतच बसून बोलणे चालू झाले. AC ऑन होता म्हणून बाहेरील गरमी जाणवत नव्हती. राजनजींच्या आवाजाची धार बदलली होती. 'हम' असे संबोधून त्यांनी त्यांच्या भावी कार्याची चुणुक सांगितली. बऱ्याच वेळानंतर गाडी परत हॉटेलकडे वळली. १५ किमीचे अंतर केव्हा संपले ते कळलेही नाही. हॉटेलच्या खोलीत राजनजींनी मला त्यांच्या बेडवर बसा म्हणून सांगितले. ते स्वत: माझ्या शेजारी एक जाडजूड रजिस्टर समान वही घेऊन बसले. त्याच्या कव्हरवर हर हर महादेव लिहिले होते इंग्रजीत. तृतीय नेत्राचे चित्र व खाली नाडीभविष्य कथनाचे रेकॉर्ड असल्याचे दिसले.

राजनजींनी पुढील एका तासात त्यांच्याबद्दल म्हणजेच अलदानबद्दल नाडी महर्षींनी काय-काय लिहिले आहे ते वाचून दाखवले. अक्षर मोत्यासारखे, पिवळ्या हायलायटरमध्ये महत्त्वाचा मजकूर होता. काही ठिकाणी हिंदीतून अर्थ लिहिला होता. प्रत्येक पानाला सुवाच्य पान क्रमांक, केकेबीजे वगैरे संदर्भ व वर्ष-महिना यांची नोंद त्यांच्या अत्यंत नेटकेपणाची साक्ष देत होत्या. इंग्रजीतील भाषांतर सुंदर होते. अर्थवाही होते. दुपारचे दोन वाजले, माझी कॉलेजला जायची वेळ झाली. दुसऱ्या दिवशीपर्यंत ते हॉटेल माधवमधे होते. जाण्याआधी फॅक्सने पत्र हिन्दीतून मिळाले त्यात होते, "मी आपले गुरू अर्धनारीश्वर, दक्षिणामूर्ती परमअलदानच्या पावन श्रीचरणांना नमन करून तुझ्या कल्याणाचा मार्ग सांगत आहे."

*प्रिय शशिकांत,*

*मी गेल्या काही दिवसांत स्वतः म्हटले होते की मला भजण्याची आवश्यकता नाही. गौरीनाथांची जे भक्ती करतात त्यांना माझ्या आशिर्वादांची गरज भासत नाही. मी स्वतः चालत त्यांच्यापाशी पोहोचतो. नाडीच्यावरील तुझ्या श्रध्देमुळे मी स्वतः भेटलो. ही तुझ्या जीवनाची अंतिम फलप्राप्ती नाही. जे मी स्वतः सांगितले त्याचे फल तुला साक्षात दर्शन करून प्राप्त होईल. तेच तुझे निर्वाण असेल, कोणत्याही परिस्थितीत डळमळून जाऊ नकोस. तुझ्या सर्व सांसारिक कामना / इच्छा पूर्ण होतील. अवश्यमेव पूर्ण होतील. परंतु त्या तुझ्याकडून ज्ञानाद्वारे किंवा शब्दरूपाने कथन करून त्यावर जोर देऊन प्राप्त होणार नाहीत. जेव्हा ती संधी, वेळ येईल तेव्हा मी स्वत चंद्रमौळी भगवान शंकरांचा भक्त तुला निर्विकल्प अवस्थेत नेईन.*

*अलदान, प. २६.५४, जून १६, २००५, गुरूवार प्रातः*
*स्थानः पुण्याचे हॉटेल माधव (पूर्ण माधव)*

हिंदी भाषी पत्रातील मजकूराची धार व आशय अत्यंत महत्वाचा होता. दोन तासांच्या आमच्या चर्चेचा तो गाभा होता. अलदान यांच्यापुढील जीवन कार्याची रूपरेषा, त्यामध्ये पुनीत व पुनीत सारख्यांचे सहकार्य, वगैरे गोष्टी योग्य वेळ येता समजतील.

अत्रींच्या महान जीवनाडी पट्ट्यांतून अलदानाबद्दलची माहित किती अचूक व सुयोग्य शब्दात आली. त्या तीन चार पॅकेटमधली पट्यातून लिहिलेल्या उत्तरात काय-काय ज्ञान भरले आहे. प्रत्येक वेळी प्रश्नकर्त्याच्या प्रश्नांची उत्तरे दिली जातात. ते तयार कसे होते... दर वेळी उत्तरांचा मजकूर बदलतो. तो कसा प्रकट होतो. याच्या गूढाने महर्षींच्या नाडीग्रंथ रचनेबद्दल आदर व प्रेमभाव दुणावतो.

नंतरआमच्या भेटी होत राहिल्या त्यापैकी एक होती -- साद रामेश्वरमची—

**टीप - श्री. राजन अलदाल कोण? हे वाचल्यावर त्यांना प्रत्यक्ष भेटायची उत्सुकता अनेकांना होणार पण त्यांनी तसे कोणाला भेटायला मनाई केली आहे. त्यांचा फोटो ही ते सध्या प्रकाशात आणायला परवानगी देत नाहीत.**

## 8. श्री. रमणी गुरुजी सांगतायत त्यांच्या हाती जीव नाडीपट्टाया कशा आल्या याची अदभूत कथा



**Figure 2 श्री रमणी गुरुजी आपल्या काकभुजंदर जीव नाडीपट्टीचे पुण्यात वाचन करताना**

**श्री. रमणी गुरुजी साधारण दरवर्षी आवर्जून पुण्यात येतात. त्यावेळी अनेक नाडीप्रेमी त्यांच्या काकभुजंदर जीव नाडीवाचनाला उपस्थित असतात. फेब्रूवारी 2012. मधे ते आले असताना कूट तमिलमधील काव्यगायनातून केलेल्या कथनाचा मराठीत अर्थ हैयोंहैयैयोंनी वाचना नंतर सादर केला. त्यावेळी श्री. रमणी गुरुजींकडे या काकभुजंदर महर्षींच्या ताडपट्टया कशा आल्या याचे कथन करावे अशी ओकांनी विनंती केली त्यावर त्यांनी जे सांगितले त्याचा गोषवारा-**

ते म्हणाले, 'सन 1962 साली मला हिमालयाच्या पायथ्याशी ऋषिकेशला जायला एकांनी रेल्वेचे तिकिट काढून दिले. त्यानंतर मला एक भेटले. त्यांनी बद्रिनाथच्या रस्त्यावर जायला सुचवले. मी जात राहिलो. त्यावेळी आर्मीची वाहने आपल्या गाड्यांचा तांडा घेऊन जात होती. मी त्यातील लोकांना मला बसवता काय़ म्हणून विचारले. त्यांनी मला एक सरदारजी कर्नल मुख्य अधिकाऱ्यासमोर नेले. ते म्हणाले, 'कोई बात नही, चलो हमारे साथ'. पुन्हा परतताना माझे नाव सांग व चढ आमच्या गाडीत असा आदेशही दिला. साधारण फुलोंकी घाटी जिथे आहे त्याच्या आसपास मला एकांनी एका गुफेकडे निर्देश करून जायला सांगितले. मी जात राहिलो. अंधाऱ्या प्रकाशात एक दाढीवाले बाबाजी बसले होते. त्यांनी माझ्याशी तमिळमधे बोलायला सुरवात केली. हिमालयातील एका गुहेत तमिलभाषेत बोलणारा माझी अशी कोणी वाट पहातोय हे ऐकून बरे वाचले. मी विचार केला, माझ्यासारख्या घरच्या गरीबीने त्रस्त दाक्षिणात्य लुकड्या छोकऱ्याला आणखी काय हवे होते!. म्हणालो, 'ते ठीक आहे, पण मला आत्ता भूक लागली आहे. काय करू? त्यांनी काही फळे दिली. म्हणाले, 'मीच तुला वेळोवेळी भेटून इथे यायला उद्युक्त केले. आता मी सांगतो तसे कर व रहा इथे काही काळ'. पहाडी उंचीवरचे ठिकाण. थंड वारे. बोचरी थंडी सहन होईना. ते पाहून ते बाबाजी माझ्या आसनाच्या भोवती एक रिंगण काढून म्हणाले, 'आता बघ कसे वाटते ते? खरेच थंडी जणू त्या रिंगणातील जागेतून गायब झाली होती!

खायची, पांघरायची सोय झाली. त्या वातावरणाशी जुळवून घेऊन सहा महिने झाले असावेत. कारण ना घड्याळ व ना कॅलेंडर. एक दिवशी ते म्हणाले, ‘तू आज बाप झालास. आता तुला जायला हवे. उद्याच नीघ’. मला कळेना की यांना कसे कळले ते. मला पोहोचवायला ते मुख्य रस्त्यापर्यंत आले. माझ्या खांद्यावर ह्या भल्या मोठ्या पोटल्या. त्यात असंख्य ताडपट्यांची बंडले! असे करत आम्ही वाटेला लागलो. बराच वेळ थांबल्यावर आर्मीचा तांडा दिसला. त्याला हातकरून मी विचारले की सरदारजी कर्नल कुठे आहेत? त्यांच्याशी संपर्क करून मी दिल्लीपर्यंत सुखरूप आलो. दिल्लीला त्या सरदारजींच्या घरी मला त्यांनी नेले. मला एक दिवस आग्रहाने राहायला लाऊन मद्रासपर्यंतचे फर्स्ट क्लासचे रिझर्वेशन व तिकिट घेऊन मी घरी परतलो. माझ्या गायब होण्याचा विपरीत अर्थ लाऊन निर्माण झालेली निराशा संपली होती. मला माझ्या प्रथम पुत्राचे मुखदर्शन जाले. त्याचे नाव गणेशन असे ठेवले’. इथे त्यादिवशीच्या पुण्यातील कथनाची सांगता झाली.

अन्य एके ठिकाणी रमणीगुरुजींच्या या प्रसंगानंतरची काही कथा ओकांनी पुर्वी ऐकली होती. ती वाचकांसाठी सादर. गुहेत म्हटल्याप्रमाणे त्यांना त्यापट्ट्या वाचायला आदेश अजून आला नव्हता. शिवाय त्या र ट फ करत वाचून त्यातील अर्थ समजणे अवघड होत होते. एक दिवशी एक जोडपे ते राहात होते त्या ठिकाणी आले व त्यांना बाहेर बोलावून घरात असलेल्या पट्ट्या वाचायला सुरू कर असा आदेश देऊन गायब झाले. ते साक्षात शंकर-पार्वती होते असे नंतरच्या वाचनातून उत्पन्न झाले. या ताडपट्ट्या ज्यांनी दिल्या ते होते खुद्द महर्षि काकभुजंदर किंवा भुशुंडी. त्यांच्या सोबत चित्रात एक स्त्री असते, तिला बहुला किंवा बकुळा असे म्हणतात. ते अति प्राचीन आहेत अशी मान्यता आहे. विविध वाचनातून, ‘मी या आधी सात वेळा ही विश्व रचनेची लीला पाहिली आहे. असे उल्लेख येतात. यावरून त्यांच्या अती प्राचीन अस्तित्वाची झलक मिळते. काकभुजंडरांच्या ताडपट्टायांचे वाचन संपल्यावरही ते महर्षि रमणी गुरुजींच्या मुखातून बोलतात असा अनेकांना अनुभव आहे. शिवाय एक ही रुपया ते दक्षिणा वा फी म्हणून घेत नाहीत. मात्र ज्यांना काही दान करायचे असेल त्यांनी ते महर्षींच्या जन्मदिवसाच्या प्रित्यर्थ होणाऱ्या महोत्सवात द्यावे असे सांगितले जाते. श्री. रमणी गुरुजींचे जगभर चाहते आहेत. विशेषतः जर्मनीतील अनेक स्त्री-पुरुष एप्रिल मधील गर्मीच्या महिन्यात आनंदाने चेन्नईला सामिल असतात. गुरुजी दोनमहिने परदेशच्या दौऱ्यावर असतात.



महोत्सवाचे वर्णन अन्यत्र वाचायला मिळेल.

**Figure 3 योगी रामसूरत कुमारांचा जन्मदिवस तांबरमस्थित श्री रमणी गुरुजींच्या काकभुजंदर आश्रमात थाटात साजरा करताना केलेली फुलांची पखरण**

## 9. अरुळ कुडीर - कोऱ्या ताडपट्टीतून अदभूत कथन करणारे तंजावरमधील जीव नाडी केंद्र



Figure 12 श्री गणेशन ताडपट्टीवाचताना जे कुमार व ओक हस्त जोडून

तंजावरच्या अरुळ् कुडिर् केंद्रात श्री. गणेशन् नामक नाडीवाचक श्री अगस्त्य महर्षी प्रणित जीवनाडीचे वाचन करतात. त्या ताडपट्ट्यांचे वैशिष्ट्य असे की त्या दिसताना पूर्णत: कोऱ्या असतात; परंतु प्रश्न विचारताच त्यावर प्रकाशस्वरूपात अक्षरे आपोआप उत्पन्न होतात. ही अक्षरे केवळ नाडीवाचकास वाचता येतात. नाडीवाचक त्या पट्टीतून भराभर गतीने वाचन करतो व आपणास त्याचे विवरण विश्लेषण करून सांगतो. हवे असल्यास वाचनाचे रेकॉर्डिंग देखील करून मिळते. कथन व विश्लेषण यासाठी कसलीही फी आकारली जात नाही.

अलिकडेच मी तंजावरला गेलो असताना जे. कुमार नामक एका गृहस्थाशी माझी ओळख ह्या केंद्रात झाली होती. एरव्ही सेलम शहरात राहणारे कुमार हे महर्षींचे भक्त आहेत. ते वरचेवर सेलमहून तंजावरला ३-४शे किमीचा प्रवास करून येत असतात. महर्षींच्या कार्याला हातभार म्हणून केंद्रातील तमिळमधील कथने इंग्रजीत भाषांतरीत करून भाषा न कळणाऱ्यांची ते सोय करतात. उत्तर जर फार मोठे असेल तर ते त्यांच्या मोबाईलवरून टेप ऐकून इंग्रजीत गोषवारा लिहून देतात. हे कार्य ते सेवा म्हणून करतात. भाषांतरासाठी कसलीही फी आकारली जात नाही.

तर मध्यंतरी महर्षींच्याकडून मार्गदर्शन घेण्याची मला इच्छा झाली अन् आता कोणाला विचारावे, असा पेच पडला. तेंव्हा श्री अगस्त्य महर्षी प्रणित ह्या जीवनाडीची आठवण झाली व कुमारांशी फोनवरून संपर्क साधून महर्षींच्या कृपाशिर्वादाची व मार्गदर्शनासाठी विनंतीवजा विचारणा केली. नेमके ते त्या वेळी तंजावरला होते. अन् मग ५ सप्टेंबर २०१२ ला जे नाडीग्रंथवाचन झाले, त्यातून जे काही ताडपट्ट्यांतून सांगून आले, त्याचा इंग्रजीत गोषवारा कुमारांनी पाठवला. महर्षींचे मार्गदर्शन अनेकांसाठी उपयोगी होईल असेल वाटून वाचकांसाठी हा गोषवारा प्रकाशित करत आहे.

"सिद्धपुरुष महर्षी श्री. अगस्त्यजी म्हणतांत:- जे लोक आमच्याशी ह्या जीवनाडीच्या माध्यमातून संपर्क साधतात, त्यांना आम्ही परमशिवांच्या आदेशाने हे आशिर्वचन प्रदान करतो. पुढील कथन भक्तीपूर्वक ऐकावे.

(१) ज्यांच्यामध्ये अहंरहित आत्मविश्वास, परमशिवतत्त्वावर अढळ श्रद्धा आणि सत्यधर्माचरण हे सद्गुण आहेत;

(२) जे काया-वाचा-मनाने इतरांचे भले करू इच्छितात, आणि;

(३)	जे आपल्या पूर्वकर्मयोगाने सात्त्विक तथा परोपकारी जीवन जगतात;

तेच लोक आम्ही पुरस्कृत केलेल्या जीवनमार्गाचे रहस्य तथा भगवंताचे रहस्य जाणू शकतात.

सद्यकालांत भौतिक सुखांच्या मागे लागलेल्या जगांत, आपण सत्वशीलतेने आचरण केले तर आपला गैरफायदा उठवला जाईल असा विचार करून लोक कसलेल्या नटाप्रमाणे धूर्त वर्तन करण्यात तरबेज झाले आहेत. जे लोक अशा धूर्तांकडून बनविले जातात, त्यांना आम्ही दोष देत नाही - कारण जो फसवतो तो स्वत:करिता वाईट कर्म निर्माण करत असतोच. तत्प्रमाणेच जो फसविला जातो तो एका अर्थी स्वत:च्या वाईट पूर्वकर्मांचा निचरा करीत असतो. यावर असे विचाराल, मग आम्ही आमची बुद्धी वापरून बऱ्या-वाईटाचा सारासारविचार करायचा नाही की काय?

आमचे प्रतिपादन केवळ इतकेच आहे की धर्म दक्षतेने वागूनही जर कधी भौतिक सुखे गमवायची वेळ आली तर दु:खी होऊन स्वतःस दूषणे देऊ नका. स्वत:च्या मनाला समजावा; जे आत्ताच्या जीवनात विपरीत घडते आहे ते एका अर्थाने माझ्याच पूर्वजन्मातील दुष्कृत्याचे प्रतिफल आहे. हे प्रतिपादन सर्वसामान्यांस पचनी पडायला अवघड जाईल याची कल्पना आम्ही बाळगून आहोत. अनेक जण असा तर्क करतील की ते तर रोज पहाटे उठून जप-जाप्य, वेद पठण, योगासने करून सात्विक जीवन रहाटतात, भारतात तीर्थयात्रा करून, अनेक संत-महात्म्यांचे आशीर्वाद मिळवतात, असे केल्याने त्यांना पाप शिवणारही नाही असा ते ग्रह करून घेतात, मात्र ते तसे नाही. कर्माची गती अतिगहन आहे. यात मेख अशी की या सर्व कर्मांचे सर्वोच्च अधिष्ठान केवळ धर्म, धर्म आणि धर्म हेच असले पाहिजे. *(लेखकाची टीप: धर्म या शब्दाचा अर्थ रिलिजन असा अभिप्रेत नाही.)*

धर्म करण्याचे अनेक मार्ग आहेत. धर्मकार्य पैसे वा वस्तू दान करून साधता येते. तथापि, शक्य असल्यास ह्या मार्गाचा अवलंब करून धर्म करावा. ते शक्य होणार नसेल तर अंगमेहनतीने इतरांची सेवा करून धर्म करावा. तेही शक्य होणार नसेल तर लोकांचे प्रश्न आपल्या आत्मियतापूर्वक शब्दांनी सोडवून धर्मकार्यास हातभार लावावा. हेही शक्य नसेल तर निदान मौन बाळगून मानवजातीच्या कल्याणाची प्रार्थना परमेश्वराकडे करावी. लक्षांत ठेवा की जर तुमच्या एकट्याच्या नुकसानीने हजारोंचा फायदा होणार असेल तर नुकसान सहन करा पण त्याउलट वर्तन कदापि करू नका. आम्ही (महर्षी) निरंतर हाच विचार करून अधिकाधिक लोकांचे कल्याण करावयास सिद्ध असतो. ह्याच कारणाकरिता कधी कधी काही जणांचे त्रुटिपूर्ण कथन करून रोषही सहन करतो.

आज (ओक) या जातकास, जो आमच्या लेखनाचा व कथनांचा सखोल अभ्यास ताडपत्रांच्या मार्फत करत आला आहे, त्याला व त्याच्यासारख्या समविचारी लोकांना आमचे हेच सांगणे असेल की तुमच्या मर्यादित मानवी दृष्टीस सिद्धमुनीजन व प्रत्यक्ष शिव परमात्मा कधी येणे शक्य नाही. सामान्य मानवी चक्षु, अध्यात्मिक प्रज्ञाचक्षूंशी बरोबरी करू शकतील काय? हां, प्रेम, भक्ती व परिपूर्ण शरणागतीद्वारे आमच्याशी मानसिक संपर्क करू शकाल. मात्र ते अनुभवजन्य ज्ञानानेच कळू शकेल. असो.

ह्या जातकास फार तळमळ आहे. स्वत:स नाडीग्रंथांच्या आलेल्या अनुभवावरून सगळ्या जगाला आमच्या कथनाचे महत्त्व व मर्म सांगण्याच्या सर्वतोपरी प्रयत्नांची त्यास घाई झाली आहे. चांगली गोष्ट आहे. पण लक्षांत असू द्यावे की हे कार्य सहजसाध्य नाही. ह्या घटकेस आम्ही त्यास एवढे सांगू इच्छितो की आमच्यासाठी कार्य करताना त्याने सदैव "शिवपञ्चाक्षरमन्त्रम्" मुखात ठेवावा. जर पुढे योग्य वेळी परमशिवांच्या आज्ञेने तो आमच्या कुटीरात पुन्हा भेट द्यावयास प्रत्यक्ष आला, तर योग्य मार्गदर्शन केले जाईल. सध्याच्या काळात त्याची मनस्थिती गोंधळलेली आहे. आम्हांस ह्याची पूर्ण कल्पना आहे. तेंव्हा हे आशिर्वचन ऐकून तो आणखी बुचकळ्यात पडू शकेल. तो त्याच्या प्राक्तनाचा भाग आहे. ते त्याला भोगून संपवावे लागेल. म्हणून आम्ही सांगतो की त्याने त्याच्या कुवतीप्रमाणे लोकसेवा व ईशसेवा पूर्ण श्रद्धाभावाने चालू ठेवावी. उर्वरित आशिर्वचन योग्य वेळी मिळेलच. तोवर आमचे शुभाशीर्वाद....

**वरील अगस्त्य महर्षिंचे कथन मला एकट्याला उद्देशून असले तरी अनेक साधकांना ते विविध संदर्भात लागू होते असे वाटून लेख रुपात सादर करीत आहे. कथन नेट वरून संपर्क करून मिळवले गेले. तसे ते सर्वांना उपलब्ध होईल असे नाही. ज्यांना ते मिळवायचे असेल त्यांनी प्रत्यक्ष जाऊन अनुभवयला हवे. कारण पुर्णतः कोऱ्या ताडपट्टीवर अक्षरे उमटतात व आपोआप विरुन जातात असे म्हटल्यावर, 'कसे शक्य आहे?' असे वाटून अनेकांच्या भुवया वक्र होतील.**

**अगस्त्य महर्षींचे कथन मिळाल्यावर श्री. राजन अलदान सरांना ते वाचनार्थ सादर केले होते. त्यांनी त्यावर जी प्रतिक्रिया व्यक्त केली ती त्यांच्या पूर्वसंमतीने सादर करत आहे. ते म्हणतात,**

*प्रिय शशिकांतजी, नमस्कार,*

*सर्वप्रथम आपली क्षमा मागतो; मी योग्य समयी आपणांस लिहू शकलो नाही. भगवान अगस्त्यजींच्या द्वारा दिले गेलेले सूक्ष्म मार्गदर्शन नि:संदेह परमसंपूर्ण आहे; ह्यात संशयास काही जागाच नाही. मी स्वत: आपणांस पूर्वी बरेचदा सांगितलेप्रमाणे, आपले संपूर्ण मार्गदर्शन तथा भविष्यकालांत आपले जे काही कार्य शेष आहे; ते होणे पूर्णत: ईश्वरीय इच्छेवर अवलंबून आहे. आपण केवल धैर्य धारण करावे. इथे तिथे न भटकावे. आपण भक्तीमार्गासी आपलेसे करावे. सारे ऋषी महर्षी ह्याच एका मार्गाचे अनुसरण करत स्वत:च्या जीवनाच्या सर्वोच्च लक्ष्यास प्राप्त करू शकले आहेत.*

*हे शशिकांतजी... जे परमपूज्य महर्षींनी सांगितले ते तसे त्याच शब्दांत सांगत पोपटपंची करणारे कोट्यवधी लोक कलियुगांत झाले आहेत. एकाहून एक धुरंधर... आपण परमपूज्य महर्षींच्या कथनांचे शब्दश: पालन करावयास हवे. संपूर्ण श्रद्धेसह, अतूट विश्वासासह. आदीयुगांपासून आजपर्यंत ह्या व्यतिरिक्त इतर कोठलाही मार्ग बनलेलाच नाही, प्रिय...*

सदैव आपला,

अलदान

## 10. चमत्कारी ईरटै नाडीची पुणे यात्रा

**इरट्टै नाडीग्रंथ वाचक डॉ. ए. आर. ओम उलगनाथन्, म्हणजे अण्णा, हे एक अनोखे प्रस्थ आहे.**




Figure 13 ज्योतिष पराशर, ज्योतिष सिद्धरत्न, होरा मार्तंड, श्री. विराटविश्व...म्हणतायत, "ब्रह्मर्षीऋषीज आर्डरा, गोईंग... टू शेवाले कान्फरन्सा?...कमांडरा फ्रेंड हैयो मीटींग ? रंबा गुड्ड.....गो; ....हैयो नो कमिंग.... नो गो.

अण्णांकडे असलेल्या सप्तर्षी प्रणित इरट्टै नाडीग्रंथांच्या चमत्कारी कथनाचा लाभ अनेक थोरामोठ्या विभूतींना मिळालेला आहे, आणि त्याबाबतचे किस्से अनेक लोक रसाळपणे सांगत असतात. अशा या अण्णांना पुण्याबाबत एक वेगळे आकर्षण आहे, हे ते स्वत:च म्हणतात..! कारण त्यांचे घनिष्ठ मित्र श्री. चंद्रकांत दादा शेवाळेजी तसेच श्री. प्रकाश देवळेजी हे पुण्याचे निवासी आहेत. शेवाळ्यांच्या तब्येतीची वास्तपुस्त करायच्या निमित्ताने म्हणा, किंवा प्रति-शिर्डीच्या पावन स्थळी दर्शनाला देवळ्यांसोबत जाण्याच्या निमित्ताने म्हणा, अण्णा बऱ्याचदा जातीने पुण्याला येत असतात. तमिळ सोडून इतर भाषा त्यांना येत नसल्याने त्यांच्या सोबत भाषांतरकारांचा फौजफाटा हा तर ठरलेलाच. असो.

श्री. शेवाळे यांच्या ६१ व्या जन्मदिनानिमित्त दि. २०-२१ ऑगस्ट २०११ रोजी ज्योतिष शास्त्राभ्यासकांचे भरविले गेलेले अधिवेशन अण्णांच्या पुणे भेटीला निमित्त ठरले, नुकतेच डोळ्यांचे ऑपरेशन झाल्याने काही बंधने आली असून देखील आपल्या पुणेकर मित्रांच्या प्रेमाखातर अधिवेशनाच्या निमित्ताने अण्णा पुण्याला आवर्जून आले होते. पुण्यात नाडीग्रंथांच्यावर काही शास्त्रशुद्ध अभ्यासपूर्ण माहिती मांडली जाणार होती, आणि अण्णा तर खुद्द नाडीग्रंथ वाचक..!

त्यामुळे या सभेचे अध्यक्षस्थान त्यांनी भूषवावे अशी प्रेमळ विनंती दादांनी अण्णांना केली आणि अण्णांनीही पुणेकरांच्या प्रेमापोटी ती स्वीकारली. दादा शेवाळ्यांच्या विनंतीवरून २० ऑगस्ट २०११ रोजी मी स्वत: हैयोंसमवेत अण्णांना भेटायला त्यांच्या हॉटेलवर गेलो होतो. तिथे, त्यांच्या सोबत श्री. उदय साने व अन्य काही अण्णांनी मुद्दाम बंगलोर व मुंबईवरून भाषांतरकार बोलावले होते ते, असे आम्ही दहाबारा जण गप्पा मारत होतो. तसे अण्णा म्हणजे एकदम मूडी गृहस्थ. त्यांच्या मनोदशा क्षणाक्षणाला बदलत असतात. त्यांच्या कलाने घेतले तरच ते खुलतात हे माहित असल्याने आम्ही त्यांना विविध संदर्भात प्रश्न विचारत विचारत बोलते केले. त्यातून पूर्वी ऑक्टोबर 1999मधे पुण्यात झालेल्या इरट्टै नाडीग्रंथ वाचनातून काही आकड्यांचे चमत्कार घडून त्यावेळच्या लोकसभेच्या निवडणूकीतले भाजपाच्या यशाचे भाकित कसे दर्शवले गेले या गोष्टीला उजाळा मिळाला, तर कधी 'कमांडरा ससिकांता, मै ब्रदर्रा' म्हणून अण्णांच्या तमिळमिश्रीत इंग्रजीतून माझी तारीफ होत होती. नंतर हैयोंशी ओळख करून दिल्यानंतर हैयो आणि अण्णांच्यात तमिळमधे गप्पा रंगल्या. त्यानिमित्ताने अण्णांकडील नाडीग्रंथातून विख्यात सिनेदिग्दर्शक मणिरत्नम् यांना महर्षींच्या कथनातून तेव्हाच्या एका सिनेमाला एका फुलाचे हे नाव दे म्हणजे तो सिनेमा सिनेक्षेत्रात क्रांती घडवणारा ठरेल असे सांगून 'रोजा' हे नाव द्यायला कसे उद्युक्त केले या आठवणीलाही उजाळा मिळाला. त्यावेळी बोलताना अण्णा अधूनमधून सारखे "इथे उपस्थितात कोणी अमुकअमुक लग्नाचा आहे का?" असे विचारत होते. पण कोणीही होकार न दिल्याने त्यांचा विरस होत होता, असे वाटले. तशा गप्पा चांगल्याच रंगल्या होत्या. ग्रहगोचरांच्या बद्दल बोलताना तिथे बसलेले उदय साने इ. अभ्यासकांची पारंपारिक अभ्यासावर आधारित मते आणि अण्णांनी महर्षींच्या कडून ऐकलेली शास्त्रोक्त मते या दोन्हींवर एक तुलनात्मक अभ्यासपूर्ण चर्चा रंगात आली होती. मधेच एकदम, "उद्याच्या उद्घाटनाची वेळ कोणी ठरवली?" असे विचारून अण्णांनी आमची तारांबळ उडवली. आम्हाला वाटले, शास्त्राची कदर न करता चुकीची वेळ ठरवली गेली की काय? नुकतेच डोळ्यांचे ऑपरेशन झाल्याने अण्णांना सक्तीच्या विश्रांतीची आवश्यकता होती, त्यामुळे, "चला आता उद्या सकाळी अधिवेशनाच्या हॉलमधेच भेटू" असे म्हणत आम्ही अण्णांचा निरोप घेतला. दुसऱ्या दिवशी सकाळी अधिवेशनाला सुरुवात होण्यापूर्वी दादांचा फोन आला, आणि अण्णांना त्यांच्या कलाने घेऊन हॉलवर आणायची कामगिरी त्यांनी माझ्यावर सोपवली. अण्णांना बोलते करण्याचे काम त्यांच्यासाठी सोपे होण्यासाठी म्हणून हैयो हे तमिळभाषक असल्याने, मी हैयोंना याबाबत कल्पना देऊन त्यांनीच अण्णांना हॉटेलमधून हॉलवर वेळेवर आणावे अशी मी विनंती केली. हैयो अण्णांना घेऊन यायला हॉटेलावर गेले, तेंव्हा काही धक्कादायक मजेशीर घटना घडल्या....

हैयो अण्णांना भेटायला हॉटेलवर गेले तेंव्हा अण्णा हॉटेलच्या गेटवर तयारच थांबले होते. "चला निघूया" असे हैयोंनी म्हणताच, "राहूकालम् संपेस्तोवर थांबा हो" असे म्हणून ते तसेच इकडे तिकडे पाहत थोडावेळ थांबले. त्यांच्या हातात एका कागदावर काही टिप्पणे काढली होती, त्यावरही अधून मधून नजर फिरवत होते. राहूकालम् संपताच आपल्याला घ्यायला कोणी येतोय का म्हणून पाहू लागले. अण्णांनाच घ्यायला आपण स्वत: कार चालवत इथे आलोय, आणि आता अण्णांचे हे..! हैयोंना जरा विचित्रच वाटले. "अण्णा अधिवेशनाची वेळ होत आली आहे, आपण आता निघूया का?" असे हैयोंनी म्हणले, तेव्हा "थांबा हो, तुमचे काय अमुकअमुक लग्न आहे का?" असे अण्णांनी जरा त्रासूनच विचारले. "हो हो तेच आहे." हैयो कुजबुजले, तेव्हा "क्काय? अहो मग काल मी इतके वेळा विचारत होतो तेव्हा का नाही सांगितलेत?" असे अण्णांनी गडगडाटी आवाजात विचारले! "अहो, पण मला काय माहिती तुम्ही कशाबद्दल विचारताय ते? माझा काही ज्योतिष शास्त्राचा अभ्यास नाही, एवढे अचूक बारकावे पाठ असायला..!" असे

हैयो म्हणाले. "आता असू द्या. चला चला, आधी गाडी एखाद्या शिवमंदिराकडे वळवा" असे फर्मान सोडत अण्णा कारमधे बसले. अधिवेशनाला जायला उशीर होत असून सुद्धा, अण्णांच्या कलाने घ्यायचे म्हणून, ओंकारेश्वराच्या मंदिराकडे गाडी वळवायचे ठरले. हैयोंना पुण्यातील रस्ते ठावूक नसल्याने एकजण वाटाड्या म्हणून सोबत यायला तयार झाले. कारमधे बसता-बसता, "पण अण्णा, ते अमुक लग्नाचे तुम्ही विचारत होतात म्हणता, ते का हो?" असे हैयोंनी विचारले, आणि अण्णा बोलते झाले.

"मी सांगतो काय झाले ते." अण्णा म्हणाले, "अहो, तुम्ही तर बघताच आहात, डोळ्यांच्या ऑपरेशनमुळे माझी काय परिस्थिती आहे ते. अशा परिस्थितीत मुळात मी इथे यावे की नाही, हा प्रश्न मला पडला होता. बरे, यावे म्हणले तर मला सोबत भाषांतरकार सुद्धा यायला पाहिजेत. त्यांचे कामही त्यांनी चोख बजावले पाहिजे. हे सगळे कसे शक्य होणार? एक ना अनेक प्रश्न मला सतावत होते. त्यामुळे इथे येण्यापूर्वी मी स्वत:च महर्षींकडून मार्गदर्शन घेतले." अण्णा त्यांच्या गगनभेदी आवाजात बोलत होते. "हो का? छान! पण ते अमुक लग्नाचे विचारत होतात ते कशा संदर्भात?" असे हैयोंनी विचारले. "हो, हो सांगतो ना. महर्षींनी मला सांगितले, की विंग कमांडर ओक तुझी ओळख अमुक एका माणसाशी करून देतील, त्याची अमुक लग्नरास असेल. तो जर घ्यायला आला तरच तू अधिवेशनाला जा अशी मला महर्षींची 'आर्डर' होती. आता काल मी इतके वेळा विचारले, पण कोणीच काही बोलले नाही, त्यामुळे मी ती व्यक्ती कोण असेल असा विचार करत होतो. असो." नाट्यपूर्ण पद्धतीत एखादा रहस्य भेद करावा तशाप्रकारे महर्षींच्या कथनातले बारकावे उलगडून सांगायला सुरुवात करताना अण्णा म्हणाले, "हे अधिवेशनापूर्वी शिवमंदिरात जाऊन दर्शन घ्यायला जायला सुद्धा महर्षींनीच सांगितले आहे. आता पर्यंत महर्षींची कथने आजच्या घटनांशी जुळताहेत. आता आपल्याला रस्त्यात एखादा लहान मुलामुलींचा घोळका आडवा जातो का, पाहूया. त्याला काही विशेष महत्त्व आहे."

त्या सुमारास ज्येष्ठ समाजसेवक अण्णा हजारेंनी भ्रष्टाचारमुक्त भारतासाठी आंदोलन हाती घेतले होते. 'अण्णा तुम आगे बढो, हम तुम्हारे साथ है' असा निनाद ओंकारेश्वराच्या मंदिराकडे जाणाऱ्या रस्त्यावर त्या दिवशी घुमला. शाळकरी मुलामुलींनी एका अण्णांच्या (हजारे) समर्थनार्थ काढलेली स्वतंत्र फेरी त्या दिवशी दुसऱ्या अण्णांच्या (उलगनाथन्) कथनाला दुजोरा देणाला कारणीभूत ठरली. अण्णा म्हणाले, "भारताच्या इतिहासात आजचा दिवस विशेष महत्त्वाचा आहे. अण्णा हजारेंनी हाती घेतलेले आंदोलन पुढे जाऊन निर्णायक ठरेल. ग्रहस्थिती पालटल्यानंतर लवकरच विश्वात सर्वत्र क्रांतीचे वारे वाहू लागेल असे महर्षींचे प्रतिपादन आहे." या विषयावर एवढे बोलून होईपर्यंत मंदिर आलेले होते. हातातील टिप्पणाचा कागद खिशात ठेवत गाडीतून उतरता उतरता "रेड्यासारख्या वर्णनाचे वाहन जागा सोडेल त्या ठिकाणी तुमचे वाहन उभे करून आमच्या मागे याल" असे भाकित वर्तवत अण्णा मंदिरामधे शिरले, आणि हैयो पार्किंग साठी जागा शोधत बाहेर गाडीतच थांबले. बराच वेळ फिरून सुद्धा पार्किंग करता जागाच मिळेना. साधारण दहा मिनिटे गेली असतील, तेव्हा एका तिऱ्हाईत मनुष्यामुळे उगीचच हैयोंचे लक्ष वेधले जाऊन त्यांना एका ठिकाणाहून एक काळ्या रंगाची क्वालिस गाडी हलत असलेली दिसली. लगबगीने हैयोंनी त्या जागेवर आपली कार पार्क केली, आणि मंदिरात प्रवेश केला. 'रोंबा संतोषम्, रोंबा संतोषम्' असे तमिळ भाषेत म्हणत अण्णा स्वत: हैयोंच्या स्वागताला मंदिराच्या द्वारापाशी येऊन उभे होते...!

मंदिरातून दर्शने घेऊन बाहेर पडेपर्यंत फारच उशीर झालेला होता. मध्यंतरीच्या काळात मंदिरात घडणाऱ्या विविध घटनांच्या आधारे, अण्णांनी स्वत:ची खात्री करून घेतली की "विंग कमांडर ओक तुझी ओळख करून देतील" असे ज्या

व्यक्ती बद्दल महर्षींनी सांगितले होते, ती व्यक्ती म्हणजेच हैयो. ही खात्री करताना; अण्णांनी महर्षींच्या कथनातील लग्नरास, जन्मरास, जन्मवार, जन्मनक्षत्र, ग्रहस्थिती इत्यादि माहिती हैयोंच्या माहितीशी जुळते की नाही याची खात्री महर्षींनी सांगितलेल्या घटनांच्या आधारे केली. उदा. काळ्या रंगाचे वाहन हलल्यावर स्वत:चे वाहन तिथे उभे केले, म्हणजे त्यांच्या पत्रिकेत अमुक ग्रहाची स्थिती तमुक. अशा पद्धतीने खात्री करत करत, आता फक्त जन्मवेळेची खात्री करणे बाकी राहिले होते. मंदिराच्या पार्किंगमधून गाडी बाहेर निघून रस्त्याला लागली, तसे अण्णा म्हणाले, "आता बघा, अधिवेशनाच्या हॉलमधे तुम्ही शिराल, तीच तुमची जन्मवेळ असेल. हे मी सांगत नाहीए, हे महर्षींनी मला आधीच सांगून ठेवलेय.

हैयो मनातल्या मनात हसले. अधिवेशनाची जागा अगदी दोन-पाच मिनिटांच्या अंतरावरच होती. आणि हैयोंच्या जन्मवेळेला अजून २५ मिनिटे तरी अवकाश होता. हैयोंना वाटले असावे, आता अण्णांच्या महर्षींचा आडाखा नक्कीच चुकणार. नेमके त्याच वेळी मघाचा अण्णा हजारे समर्थक शाळकरी मुलामुलींचा तोच मोर्चा दुसऱ्या बाजूने हैयोंच्या गाडीच्या वाटेत आला. शाळकरी मुलेच ती, त्यांच्या गोंधळात ट्रॅफ़िक विस्कटला आणि एकच गोंधळाची परिस्थिती निर्माण झाली. एकामागोमाग गाड्या रस्त्यावर उभ्या होऊन रस्ता मोकळा व्हायची वाट पाहू लागल्या. त्यातच, "का हो, अधिवेशनाची वेळ होऊन गेली, आहात कुठे? अजून किती वेळ घेणार आहात?" असे ओकांचे फोन हैयोंना यायला लागले. त्याच गोंधळात, उदय साने गर्दीतून वाट काढत आले आणि अण्णांना पायी-पायी घेऊन जातो, तुम्ही गाडी पार्क करून या असे म्हणून निघाले. भयंकर पुणेरी ट्रॅफ़िकला अजून तसे सरावलेले नसल्याने हैयोंची बिकट परिस्थिती झाली. त्यातच समोरून येणारा एक दुचाकीस्वार हैयोंच्या गाडीला घासून गेला, अन् आधीच्या गोंधळात अजूनच भर पडली. शेवटी रस्ता मोकळा व्हायची चिह्ने दिसेनात, तसे आयोजकांनी हैयोंच्या एका मित्रास कल्पना देऊन हॉलवरून हैयोंकडे पाठवले. त्या मित्राच्या हाती पार्किंगसाठी कार सोपवून हैयो हॉलच्या दिशेने चालत चालत, रस्ता माहिती नसल्याने, विचारत विचारतच आले.

मधल्या गोंधळात बराच वेळ गेला होता. 'उशीर झालेला दिसतोय, आता काय करावे? अशा विचारात अनायासे हैयोंची नजर घड्याळाकडे गेली तेंव्हा त्यांना धक्काच बसला असावा, कारण मधल्या गोंधळाच्या काळात २५ मिनिटे उलटून आता घड्याळात दिसणारी वेळ तीच नेमकी हैयोंची साधारण जन्मवेळ होती. एकतर अधिवेशनात काही विषय मांडायचे होते त्याचे विचार डोक्यात होते. त्यातच येताना झालेला त्रागा. या सगळ्याच्या एकत्रित परिणामामुळे, "अधिवेशनाच्या हॉलमधे तुम्ही शिराल, तीच तुमची जन्मवेळ असेल." या अण्णांच्या वाक्याविषयी हैयोंना जाम विसर पडला होता..! पण आताच्या या अनुभवामुळे, मनोमन आश्चर्य व्यक्त करत हैयो सभास्थानावर पोहोचले.
व्यासपीठावरून अण्णा हैयोंकडे मिश्किल नजरेने बघत होते, हाताच्या इशाऱ्यानेच विचारत होते, झाली की नाही तुमची जन्मवेळ मॅच?

पुढे अण्णांचा सत्कार झाला. माझे नाडीग्रंथ - एक आढावा या विषयावर भाषण झाले, आणि त्यानंतर हैयोंनी "नाडिग्रंथाच्या ताडपट्ट्यांमधून व्यक्तीच्या संदर्भातील जन्मविषयक नोंद कशी येते" आणि "नाडीग्रंथात तमिळमधून




Figure 14. **डॉ. ओम उलगनाथ यांच्या तमिलमधील भाषणाच्या प्रसंगी डावीकडून दादा शेवाळे. डॉ. आर. एन. शुक्ल, शशिकांत ओक व हैयोहैयैयो.**

दिलेल्या तुटपुंज्या माहितीतून नाडिग्रंथवाचक आपणांस आपला जन्मदिनांक इंग्रजीत कसा सांगतो", या दोन विषयांवर काही अभ्यासपूर्ण माहिती प्रस्तुत केली. हैयोंचे भाषण सुरु असताना शेजारीच अध्यक्षस्थानी बसलेले अण्णा हैयोंना कौतुकाने न्याहाळत होते; हैयोंनी भाषणासाठी काढलेली तमिळ भाषेतील टिप्पणे अण्णा स्वत: ध्यानपूर्वक वाचत होते. हैयोंच्या भाषणानंतर अण्णांचे अध्यक्षीय भाषण होते. त्यावेळी, स्वत:बरोबर आलेल्या भाषांतरकारांना थोपवून अण्णांनी भाषांतरकार म्हणून हैयोंनाच पाचारण केले.

उपस्थितांना नमस्कार करून, भाषणास सुरुवात करून अण्णा म्हणाले, "सर्व मान्यवर ज्योतिषशास्त्राभ्यासकहो, आजच्या या अधिवेशनासाठी मी पुण्याला येण्यापूर्वीच "हैयो" या व्यक्तीची ओळख सप्तर्षींनी चमत्कारी इरट्टै नाडीग्रंथांच्या माध्यमातून दिलेल्या काही आडाख्यांवरून कशी करून दिली होती, ते मी आज आपणासमोर मांडणार आहे." असे म्हणून खिशातील टिप्पणे लिहिलेला कागद बाहेर काढला. "आज जरी मी या अधिवेशनाच्या कार्यक्रमासाठी बंगलोरहून भाषांतरकार बोलावले असले, तरी खरे भाषांतरकाराचे काम हे हैयोंनी करावे असा महर्षींचा आदेश आहे" असे म्हणून अण्णांनी तमिळ मधून भाषण सुरु केले, आणि हैयोंनी त्याचे मराठीत रुपांतर केले. महर्षींनी कथन करताना लग्नरास, जन्मरास, जन्मवार, जन्मनक्षत्र, ग्रहस्थिती इत्यादि माहिती घडणाऱ्या विविध घटनांच्या आधारे केली, आणि तशा घटना खरोखरच घडून त्या माहितीची खात्री झाली असे हैयोंनी म्हणताच, टाळ्यांचा कडकडाट झाला.

एका बाजूला हैयोंच्या भाषणाच्या निमित्ताने उपस्थितांना "नाडिग्रंथाच्या ताडपट्ट्यांमधून व्यक्तीच्या संदर्भातील जन्मविषयक नोंद कशी येते" या विषयावर प्रात्यक्षिक पहावयास मिळाले, तर दुसऱ्या बाजूला डॉ. ए. आर. ओम

उलगनाथन् तथा अण्णांच्या निमित्ताने स्वत: महर्षी एखाद्या व्यक्तीच्या संदर्भातील जन्मविषयक माहितीची कशी नोंद घेतात याचे प्रात्यक्षिक हैयोंच्या सोबत सगळ्यांनाच मिळाले... सप्तर्षींच्या चमत्कारी इरट्टै नाडीग्रंथांच्या अनोख्या दर्शनाच्या किश्श्यांमध्ये अशा ह्या प्रासंगिक किश्श्याची भर पडली...

असा हा ऑंम उलगनाथजींच्या पुण्यातील 2011सालच्या भेटीतील किस्सा.

टीप - हैयोहैयैयोंच्या संदर्भातील घटनांचे सुक्ष्म शब्दांकन त्यांचे आहे..



**Figure 4 ओम उलगनाथन पुण्यातील ओकांच्या हवाईदलातील घरी, सोबत श्री. दादा शेवाळे व श्री. उदयराज साने. ( सन1999)**

## 11. कै. हनुमत दासन यांची अगत्यार जीव नाडी

तमिळनाडू राज्याची राजधानी आहे चेन्नई उर्फ मद्रास. तमिळ संस्कृतीची देखील ती राजधानी आहे असे म्हटले तर फार अतिशयोक्ती होणार नाही. त्या ठिकाणी वडपळणी उपनगर आहे. पूर्वी फार लोकप्रिय, बालपणातील आठवणींचे "चांदोबा" हे मुलांचे मासिकाचे प्रकाशन, याच भागातील कार्यालयातून अनेक वर्षांपासून होत असे. तो प्रभाग नाडी भविष्यासाठी ही असाच लोकप्रिय आहे.

पूर्वी ओम उलगनाथन त्यांच्या ईरटै जीवनाडीचे अदभूत वाचन या भागातील एका मंदिरापाशी करत असत. त्याचे अनुभव, पत्ता माझ्या हिंदी पुस्तकात आहेत. अगत्यार किंवा (अगस्त्य) जीव नाडीचे वाचन श्री.हनुमत दासन (– दि. १७ नोव्हेंबर २०१०ला त्यांचे देहावसान झाले.) या भागातील करत असत. त्यांच्या जीव नाडीवाचनात आलेले काही अनुभव, किस्से "दिनतंती" नावाच्या तमिळ साप्ताहिकातून वेळोवेळी प्रसिद्ध होत असतात. त्यांच्या अनुभवांच्या संकलनावर आधारित तमिळमधे 5 भागात पुस्तके उपलब्ध आहेत. त्याचे स्वैर इंग्रजी भाषांतर श्री.विश्वनाथ गोपी करतात. मराठी वाचकांना त्यातील काही अनुभवांची ओळख करून देणे हा य़ा लेखाचा उद्देश आहे. त्या अनुरोधाने नाडी ग्रंथ भविष्याची सामान्य ओळख करून देऊन नाडी लेखनकर्त्या महर्षींचा भविष्य लेखनामागील उद्देश स्पष्ट करण्याचे कार्यही घडेल.

नाडी ग्रंथ भविष्य ही संज्ञा आता मराठी लोकांना गेल्या १०-१५ वर्षांच्या काळात थोडीफार परिचित झालेली आहे. दक्षिण भारतात तमिळ भाषेत ताडपत्रावर कूट लिपितून कोरलेले भविष्य आता महाराष्ट्रातील अनेक शहरात पहायला उपलब्ध आहे. रामायण, महाभारत, भागवत या धार्मिक ग्रंथांतून सामान्यपणे उल्लेखलेल्या अनेक महर्षींच्या नावाने या नाडी ग्रंथ भविष्य ताडपट्या उपलब्ध आहेत. त्यापैकी अगस्त्य, महाशिव, कौशिक म्हणजेच विश्वामित्र, वसिष्ठ, शुक, भृगु, काक भुजंदर (भुशुंडी) आदि महर्षींची नावे असलेल्या नाड्या सध्या जास्त प्रचलित आहेत.

ज्यांना नाडी ग्रंथ भविष्याची काहीच माहिती नाही त्यांच्या सोईसाठी[1] थोडक्यात असे सांगता येईल की या महर्षींनी आपल्या प्रज्ञाचक्षूंच्या सामर्थ्यावर अनेकांचे जीवनपट पाहिले व आपल्या निर्देशनाखाली शिष्यगणांकडून त्याची काटेकोरपणे नोंद केली व अनंत काळपर्यंत मानवाला उपयोगी पडणाऱ्या नाडी ग्रंथ भविष्याची निर्मिती केली.

नाडी ग्रंथ भविष्य पहाण्यासाठी पुरुषांना उजव्या व स्रियांना डाव्या हाताच्या अंगठ्याचा ठसा त्यावरील सर्व रेषा ठळक व व्यवस्थित दिसतील अशा बेताने उमटवून द्यावा लागतो. त्या रेषांच्या ठेवणीवरून महर्षींनी १०८ विभाग पाडलेले आहेत. नाडीकेंद्रात त्यापैकी उपलब्ध पट्यांशी त्या ठशांना पडताळून त्यांच्याशी जुळणाऱ्या पट्यांचे पॅकेट आणले जाते. नंतर त्यातील एकएक पट्टीतील थोडा थोडा मजकूर वाचून तो जातकाच्या माहितीशी जुळतो का, ते पाहिले जाते. बऱ्याच न जुळणाऱ्या पट्या बादकरून शेवटी एक अशी पट्टी येते की त्यातील सर्व माहिती जातकाशी तंतोतंत जुळते. उदाहरणार्थ स्वतः नाव, आई-वडिलांचे, पती-पत्नीचे नाव, जन्मतारीख, वार, महिना, साल, व त्यावेळची आकाशस्थ ग्रहांची स्थिती, शिक्षण. नोकरी-व्यवसाय, भावाबहिणींची, मुलाबाळांची संख्या व अशी काही माहिती जी केवळ त्याच व्यक्तीला ताडता येऊ शकते. त्यानंतर जेंव्हा व्यक्ती आपणहून मान्य करते की पट्टीतील सर्व माहिती १००टक्के जुळते आहे. तेंव्हाच त्या पट्टीतील कूट तमिळ लिपितील मजकूर एका ४० पानी वहीत सध्याच्या तमिल भाषेत उतरवला जातो. त्यावरून भाषांतरकाराच्या मदतीने एकएक वाक्याचा सावकाश अर्थ लाऊन ते सर्व एका ऑडिओ कॅसेटमधे रेकॉर्ड करून मग ती वही व कॅसेट ग्राहकाला सुपुर्त

केली जाते व मग मेहनताना पूजारुम मधील शिव-पार्वतीच्या, महर्षींच्या फोटो समोर ठेवायला सुचवले जाते.

कुंडलीतील बारा स्थाने व्यक्तीच्या जीवनातील महत्वाच्या अंगांचा विचार करतात. त्याच धर्तीवर लग्न स्थानाच्या भविष्याला जनरल किंवा पहिल्या नंबरचे कांडम असे म्हटले जाते. त्यात सर्व स्थानांचे त्रोटक भविष्य कथन केले जाते. एखाद्याला कोणा एका विशिष्ठ स्थानाचे जास्त भविष्य जाणून घ्यायचे असेल तर उदा. विवाह विषयक ७ नंबरचे, नोकरीसाठी १० नंबरचे कांड काढून त्यातून विशेष माहिती मिळवता येते. नाडी ग्रंथ भविष्याचा पाया पुनर्जन्म व कर्मविपाक सिद्धांतावर आधारित आहे. त्यामुळे पुर्वजन्मातील पाप-पुण्यांच्या कमीजास्त प्रमाणात व्यक्तीला विविध मंदिरांना भेटी तेथे पुजा-अर्चना, अन्न-वस्त्र-जलदान, अपंगांना मदत करण्याला सुचवलेले असते. शिवाय जपसाधनाही सुचवली जाते. सध्याच्या धामधुमीच्या जीवनरहाटीत तो जप करण्याचा भार आपण नाडी केंद्राला सांगून करवून घेता येतो. त्याच्यासाठी वेगळा मेहनताना घेतला जातो.

हा झाला नाडी भविष्य जाणण्याचा सामान्य प्रकार. या शिवाय जीव नाडी असा एक विशेष नाडीचा एक प्रकार आहे. त्यात महर्षींशी आपण सद्यपरिस्थितीत आपल्या समस्या कथनकरून, त्यावर सल्ला-विचार विनिमय करून त्यातून वाट शोधू शकतो. सामान्य नाडी पट्टीतील मजकूर वाचून त्याचे भाषांतर करून सांगताना अनेकदा तात्कालिक समस्यांवर महर्षी काही भाष्य करताना दिसत नाहीत. त्यामुळे अनेकांचा विरस होतो. नाडी ग्रंथ भविष्याबद्दल नाही नाही त्या शंका येऊ लागतात. जीवनाडीतून अशा समस्यांचे-शंकांचे समाधान होते. असो. अशा अनेक सत्य घटना व कथने पुस्तकाच्या माध्यमातून वाचायला मिळतात. त्या कथांचे मराठीत रुपांतरण करून प्रकाशित करायची परवानगी हैयो हैयैयोंनी मिळवली आहे. त्यातील दोन कथा नाट्यरुपात डॉ. मधुसूदन (सबकुछ) घाणेकरांनी प्रस्तूत केल्या आहेत. ते प्रकरण 23 मधे वाचायला मिळेल.

## 12. एड. राजेंद्र पाठकचा नाडीग्रंथांचा प्रथमानुभव



**Figure 5 ऍड राजेंद्र पाठक सांगतायत आपला अनुभव**

मी नाडीग्रंथांचा शोध घ्यायला सुरूवात केली. ती सुरूवात करत असताना माझा योग तोपर्यंत आलेला नव्हता असं मला वाटत होतं. मी अनेक वेळेला नाडीग्रंथांच्या ऑफिसमध्ये फोन करायचो, ते म्हणायचे,'आप आके जाईये! अंगुठा दे जाईये!' असे ते म्हणायचे. काही कारणाने माझं जाणं व्हायचं नाही. अस करत करत नाडीच्या या मासिकाचं रोज वाचन करून प्रत्येक गोष्ट आत्मसात झालीय असं वाटून एक दिवस माझा तो योग आला आणि तो होता अनंत चतुर्दशी २०१० चा म्हणजे दोन वर्षे दवडली जावी लागली. त्यादिवशी संध्याकाळी ५.०० वा. नाडीकेंद्रांत जाऊन माझ्या अंगठ्याचा ठसा दिला. तो ठसा दिल्यावरती मला असं वाटलं की ओक साहेबांनी जसं वर्णन केलेली आहेत, तसं तो आतमध्ये गेला आणि पट्टी घेऊन आला. माझ्याही बाबतीमध्ये थोडाफार तसच झालं. तो आतमध्ये गेला – त्याने पट्टी आणली – पट्टीमध्ये त्याने मला प्रश्न विचारायला सुरूवात केली, 'आप हां या ना कहीए'। त्याप्रमाणे मी त्याला हा किंवा ना हे सांगत राहिलो. पण माझी ती स्पेसिफिक पट्टी मिळेना! म्हणून मग ते आवरतं घेतात आणि मग सांगतात की, 'आपकी पट्टी मैं मंगाता हूँ' आणि त्याप्रमाणे तो आतमध्ये निघून गेला. मला म्हणला मी तुम्हाला फोन करेन. पण त्या मासिकाच्या पूर्णपणे वाचनामुळे रोज त्याचा परिपाठ असल्यामुळे मी माझी एक सवय ठेवली की, मी रोज त्याला फोन करू लागलो. या ८-१० दिवसांच्या फोनमध्ये आमची एका मैत्रीसारखे संबंध झाले. मी शशिकांत ओकांचा मित्र आहे हे जेव्हा त्यांना समजलं त्याच्याबरोबर सूत्र फार जोरात हलली आणि नवरात्राच्या पहिल्या दिवशी मला त्याचा फोन आला. आपली पट्टी साधारण पाच-सहा दिवसांमध्ये येईल तेव्हा मला अष्टमी – नवमीच्या दिवशी फोन करा. आतुरतेने मी वाट बघत राहिलो. तो दिवस उगवला. तो खंडेनवमीचा दिवस होता. सकाळी पूजा-अर्चा नवरात्राची आरती उरकून पत्नीला सांगितलं आज दुसरं काही काम करायचं नाही पहिल्यांदा नाडीकेंद्राला भेट द्यायचीय. आज अत्यानंदाचा दिवस आहे. ती म्हटली, 'जरूर जा'. त्याप्रमाणे मी तिथल्या शिवकुमार

नावाचे नाडी केंद्रामधले त्यांना फोन केला. फोन केल्यानंतर विश्वास बसणार नाही कानावर अशी वाक्य आली,''साब आ गयी आपकी पट्टी आ गयी'।

आता माझ्या कर्वेनगरच्या घरापासून कोथरूडच्या त्या नाडीकेंद्रापर्यंत अंतर हे हेलिकॉप्टर कापाव का मोनोरेलने जावं का काय कराव, किती फास्ट व्हेहिकल न्यावं काहीही समजत नव्हतं. तशाच परिस्थितीमध्ये माझी मोटरसायकल मी स्टार्ट केली आणि एकच ओकांचा चेहरा समोर आल्यावर वेग संथ झाला. 'अरे आता काय काळजी करतो आता तुला सगळा खजिना उलगडणार आहे'. असं करत मोटरसायकल पार्क केली आणि जिना चढायला लागलो एक – एक पायरी असं वाटायला लागलं कधी जाऊन मी त्याच्या समोर बसतो.

शंकरनगरीच्या नाडीकेंद्रामध्ये पोहोचल्यानंतर अनुभव फार चांगला होता. शिवकुमार स्वतः समोर उभा होता. त्याची नुकतीच पूजाअर्चा झालेली होती. नाडीकेंद्रात कोणीही नव्हतं. 'चलो आईये सर आपको पता चल गया होगा मैने आपको सुबह – सुबह क्यु बुलाया. क्योकी अभी कोई नही रहता. और अपना फ्रेशली रिडींग हो सकता है''ओक साब आपके भी दोस्त है'। मला खुप बरं वाटलं, मी अजुन ज्यांना भेटलोही नाही त्यांच्या नावाच्या सांगण्यामुळे आणि महाराष्ट्रीयन माणसाची सवय असते की स्वतःला एस्टाब्लिश करायच्या आधी बाकी आपण आपल्या पूर्वजांच्या उल्लेख करतो, मित्रांचा करतो, तसा मी ओकांचा केला आणि ते सक्सेसफूल झालं. लगेच त्यांनी खोलीत वगैरे घेतलं. उदबत्ती लावली आणि त्याने त्या पट्टया काढल्या आता तो म्हणाला, 'हो किंवा नाही ते सांगा'. आता मला नाही सांगायची काही जरूरच पडली नाही. माझ्या शिक्षणापासून, माझ्या जीवनक्रमापासून, आईवडीलांचे झालेले मृत्यू, अमुक – तमुक, माझ्या मिसेसचं नाव, माझं नाव, बहिणीचं, भावडांत कितव्या नंबरवर आहे ते. कोण भावडं कधी गेले याच्यासकट सगळी माहिती सटासट आली.

माझी प्रथम बहिण विधवा झालेली. तिच्या मुलाची ब्रेनची सर्जरी झाली. ऐकून मी अवाक झालो आणि एकच चेहरा दिसत होता तो म्हणजे शशिकांत ओक! दुसरं काही सुचत नव्हतं कारण या माणसामुळे मी नाडीच्या अनेक गोष्टी वाचून आलेलो आहे. जणू मला ओकांप्रमाणे सर्व ज्ञात आहे, अशा प्रकारे तिथे माझा सगळा आर्विभाव चालू होता. त्यामुळे ते खूपच अदबीने बोलत होते. पुढे वाचन चालू झालं तसे अनुभव येत गेले. खूप बरं वाटत गेलं. माझ्या चांगल्या गोष्टी त्याच्यामध्ये आल्या. पूर्ण पत्रिका आली आणि मी ज्योतिषी आहे हे जेव्हा त्यांना नाडीपट्टीतून समजलं मग त्यांनी मला आणखी काही गोष्टी ज्योतिषासंबंधीच्या सांगितल्या. असं सगळं आमचं वाचन पूर्ण झाल्यानंतर कांड आलं ते होतं नवग्रह मंदिरातल्या मी जायच्या ठिकणाचं त्याच्या क्रमाचं. बरं हे देखील ओकांनी फार अतिशय उत्तमरित्या लिहिलेलं आहे की जो क्रम तुम्हाला सांगितला असेल त्याचप्रमाणे जायचं, म्हणजे आलंगुडीपासून जर कांचनूर जवळ असेल आणि एक उलट दिशेला जायचे मंदिर असेलतर तो क्रम सोडून आलंगुडीहून डायरेक्ट कांचनूरला जातो. नाही चालणार. मध्ये त्यांनी जे ठिकाण दिलं असेल त्याठिकाणी तुम्ही तसच जायचं. असा माझा सगळा नवग्रह मंदिरांचाप्रवास ऐकून अतिशय तृप्त मनाने, ओंथबलेल्या अंतःकरणाने ती कॅसेट हातामध्ये घेतली, दक्षिणा ठेवली आणि जे काही त्यांनी सांगितलं होतं, मंडल पूजा वगैर सांगितली ते सगळं ऐकून मी अतिशय तृप्त होऊन नवरात्रीच्या नऊ दिवसातल्या देवीदर्शनाची स्वानुभूती की मी त्या नाडीकेंद्रात घेतली. त्यांना नमस्कार केला आणि ओकांना माझे आभार देतदेत मी बाहेर पडलो.

---

## 13.कै. कॅप्टन आनंद राव सांगतात नाडीमहर्षींची महती...



**Figure 6 कॅप्टन आनंद राव मुलाखत देताना**

वेलकम माय फ्रेंड्स,

आज मी तुम्हाला अशा एका विषयाबद्दल सांगणार आहे. ती गोष्ट ऐकून आपण चकित व्हाल. पण त्यासाठी तुम्हाला माझे एक काम करावे लागेल. असे आहे की एक मित्र आपली मदत मागतोय. त्याला आपले मार्गदर्शन हवे आहे. त्याला आपल्याकडून काही उत्तरे मिळवायची आहेत. पण त्यात एक अडचण अशी आहे की तो मित्र आपल्याला उद्या - परवा किंवा 1 वा 2 शतकानंतर भेटणार नसून 4 हजार वर्षांनंतर भेटणार आहे! ऐकून आपण चकित व्हाल. कदाचित मला वेडाचा झटका तर आला नाही ना? कारण इतक्यानंतरच्या काळानंतर त्याला मी कसा भेटणार असे वाटून दुर्लक्ष कराल.

मग आता माझ्या स्पष्टीकरणाकडे जरा लक्ष द्या. अन मग ठरवा की मी वेड्यासारखा बोलतोय का खरेच काही असे असू शकते. विचार करा की तुम्हाला अशी एक अदभूत, असामान्य दिव्य दृष्टी प्राप्त झाली की ज्याद्वारे आपण भविष्यकालात दडलेले अंतरंग पाहू शकता, अनुभवू शकता. तर मग?

होय, मी नाडीग्रंथांबद्दल बोलतोय आपल्या महर्षींनी प्राचीन काळात आपल्या प्रज्ञाशक्तीच्या जोरावर ज्या महाकाव्याची नोंद केली आहे!

आता मी तुम्हाला या नाडीग्रंथांचे आणखी एक वैशिष्ठ्य सांगतो. हे नाडी ग्रंथ भविष्य जगातील कोणालाही अनुभवता वा पहाता येतात. त्याला देशाचे, भाषेचे वा व्यक्तीच्या वर्ण-रंगाचे अन उच्च- नीचतेचे कसलेच बंधन नाही. आपण भारतीय असा किंवा नसा, नाडी ग्रंथ भविष्य आपल्याला अवलोकन करायला अडकाठी बनू शकत नाहीत. शशिकांत ओकांच्या नाडी ग्रंथ भविष्य पुस्तकात त्यांनी अनेक लोकांचे अनुभव सादर केले आहेत, त्यात जपानी,

चिनी, झेक, जर्मनी, अमेरिकन वा खाडी देशातील नागरिकांचे, तसेच ख्रिश्चन ते जैन, बुद्ध, शीख, मुस्लिम वा निधर्मीयांचे नाडी कथनाचे किस्से सादर केले आहेत. नाडी ग्रंथ भविष्यावर अनेकांनी त्यांच्या देशात त्या त्या भाषेत पुस्तके लिहिली आहेत. असे म्हणता येईल की शशिकांत ओकांनी नाडी ग्रंथ भविष्याला प्रकाशात आणून नाडी महर्षींच्या कार्याची मोठी सेवा व अनेक गरजूलोकांची सोय केली आहे.

अशा कामात विज्ञानवादी - रॅशनॅलिस्ट लोकांनी टांग आडवली नाही तरच नवल! त्यांना तर बुलफाईट खेळातील गुरकावणाऱ्या खोंडांना जसे लाल रंगाचे पडके टक्कर द्यायला ललकारते, तसे नाडी ग्रंथ भविष्य ह्या विषयाचे झाले! याबाबत नाडी ग्रंथ भविष्याच्या बाजूने शशिकांत ओकांना टक्कर देणाऱ्या बुद्धिवादी खोंडांची रग उतरवून द्यावी लागली. त्याचे कथन आपण वाचाल तर कळेल की घोड्याला जसे ब्लिंकर्स किंवा झापडे लावल्यामुळे त्यांना फक्त - टनेल व्हिजन - एकाच दिशेचे दिसते तसे ह्या बुद्धिवादी- रॅशनॅलिस्ट लोकांना फक्त त्यांची एकच बाजू दिसते व समजते. जर त्यांच्या खाक्याप्रमाणे ठरवलेल्या विचारात जर ते बसत नसेल तर त्याचा ते धिक्कार करतात, ते ही अनुभव न घेताच! आता नाडी ग्रंथ भविष्यात असे अनेक पैलू आहेत की त्यावर विज्ञानाने विचार करून त्यातील रहस्ये शोधावीत. म्हणून असे वाटते की ज्यांना य़ा नाडी ग्रंथ भविष्याचा आस्वाद घ्यायचा आहे ते घेतील. ज्यांना नाही घ्यायचा, ते अज्ञानाच्या अंधाऱ्या खोल गर्तेत रंगून दुर्लक्ष करतील.

---------------------------------------------------

(कै. कॅप्टन आनंद राव (स्पेलिंग प्रमाणे रोवे) एक मनस्वी व्यक्तिमत्व. आता कॅप्टन स्वर्गवासी झाले आणि त्यांच्या स्मृतींचा उजाळा झाला. पांढरेशुभ्र भुरभूरीत केसांचं टोपलं. निळसर झाक असलेले डोळे. कानाच्या खालपर्यंत आलेले कल्ले, चेहऱ्यावर सदैव हसरा भाव असे शिडशिडीत बांधा आणि स्फुर्तिदायक भाषेचा वापर करण्याची शैली. एक्याण्णवावं वर्ष चालू असतानादेखील कॅप्टन रावांचा उत्साह तरूणाला लाजवेल असा होता. जाण्याअगोदर अगदी दोन आठवड्यांपूर्वी ते तीन जिने चढून अत्री आणि अनुसूया यांच्या नाडीग्रंथांनी आशिर्वादासाठी सत्तर पायऱ्या चढून आले. तेव्हा महर्षी त्यांनी आशिर्वाद देताना म्हणाले, ‘अरे तरूण माणसा, कर या नाडीग्रंथांची सेवा. तुला आंतरिक आनंद हवाय ना... पहा काय होतं ते...’ आणि खरोखरच ते एक्याण्णव वर्षांचे तरूण महर्षींच्या ताडपत्रांच्या कथनाकडे बघून म्हणाले, ‘यस सर... आय वील डू इट..’ तो त्यांचा आवाज, त्यामधील गुढार्थ, तेव्हा कळला नव्हता. नंतर त्यांच्या अस्खलित इंग्रजीमधून त्यांनी नाडीग्रंथांचा केलेला गौरव जेव्हा व्हिडीओवर अवतरीत झाला, तेव्हा त्यांचे डोळे त्यांच्या कथनातील आदरभाव हा आज एक चर्चेचा विषय आहे. )

## 14. डॉ. आर एन. शुक्ल नाडीग्रंथांतील संकल्पनाचे विश्लेषण करतात



**Figure 7 नाडीग्रंथातील शांती-दीक्षेचे महत्व ओकांना विषद करताना डॉ. आर. एन. शुक्ल**

ओक - डॉ. शुक्ल सर सामान्याला नाडीग्रंथांची उपयोगिता काय?

शुक्ल सर - माझे असे प्रामाणिक मत आहे की ते सामान्यांना अत्यंत उपयुक्त आहेत. नाडी कथन सत्यच दिलेले आहे, जर काहींचे अनुभव योग्य नसतील तर त्याचे कारण जातकांच्या काही वेळा चुका त्याला कारणीभूत असतात. कारण त्यांनी हो-नाही करताना अनवधानाने, वा अज्ञानाने चुकीची पट्टी वाचली गेल्याने कथनात फरक होतो. शिवाय मी अशी नम्र विनंती करतो. की नाडी कथन ही गाईड लाईन म्हणून (विचारात) घ्या. त्यात वाहून जाऊ नका. आपले महर्षि वाईट घटना घडणार असेल त्याने खचून जाऊ नये म्हणून तर ती न सांगता किंवा पट्टी न मिळता ती घडवली जाते असे मी सहा लोकांबाबत अनुभवले आहे.

ओक - सर, नाडी ग्रंथ पहाताना विविध नवग्रहांच्या मंदिरांना भेटीसाठी दक्षिणेतील कुंभकोणम वैदिश्वरन कोईलच्या आसपासच्या विशिष्ठ स्थळी भेटी द्यायला जा असे सुचवले जाते. एक तर मंदिरांना भेट द्यायलाच हव्यात का? व त्याच ठिकाणी न जाता का अन्य ठिकाणी गेले तर नाही का चालणार? आपले विचार काय आहेत?

सर - फार चांगला प्रश्न विचारलात. काहींना ते पटणार नाही पण माझ्या मते जरूर त्याच ठिकाणी जावे. मंदिर हे एक ठराविक कंपने वा स्पंदने बाहेर टाकणारे ऊर्जा केंद्र आहे. आपल्या शरीरात अनेकदा काही ऊर्जांचा अभाव होतो. त्या त्या ऊर्जा तेथे जाऊन आपल्याला प्राप्त करता येतात. आपल्या मेंदूत अशी ऊर्जा स्थाने आहेत की जी ती ऊर्जा आत्मसात करू शकतात. माझा अभ्यास थोडा या बाबत कमी आहे, कदाचित ज्या भागात नाडी ग्रंथ

आढळतात त्या भागातली देवळे तेथील जनतेला माहिती व सोईची असल्याने ती सुचवली असावीत. उत्तरेतील काही ठिकाणे ही सुचवली जातात. तंत्र मंत्र आणि यंत्र असे म्हणतो. मंदिरे ही यंत्रे आहेत.

ओक – अनेकदा विविध मंत्राक्षरांचा जप करावा. असे सुचवले जाते. याचा वैज्ञानिक अर्थ काय?

सर – सांगतो. छान प्रश्न उपस्थित केलात. 22 वर्षापुर्वी माझ्या डोक्यात हा विचार आला. मी गायत्री मंत्रावर किंजवडेकर शास्त्रींसह 51 जणांकडून शास्त्रोक्त पद्धतीने तो म्हणवून प्रयोग केला. त्यातील उच्चारणातून किती स्पंदने निर्माण होतात याची गणना केली. ती आपल्या विज्ञानाच्या भाषेत भरली 2 लाख, 42हजार 216 हर्झ. इतकी कंपने आपल्याला यंत्रांवर मिळाली होती. नंतर अनेक अन्य मंत्रांवर काम करताना असे लक्षात आले की मंत्र हे ऊर्जा कंपनांना निर्माण करणारे स्त्रोत आहेत. प्रत्येक मंत्र स्थल, काल परत्वे जितकी ऊर्जा कंपने तयार करत असतात. ते त्यातील तज्ज्ञ ठराविक मंत्र कसा, केंव्हा व कुठे म्हणायचा ते सांगतात. अशा ऊर्जा निर्माण झाल्या की आपल्या शरीरातील 2,42,216 ऊर्जा केंद्रे दिलेली आहेत. ती बिघडली तर आपल्याला प्रॉब्लेम येतात व डिसीझ होतात. मंत्र म्हणून अशी ऊर्जा केंद्रे दुरुस्त करता येतात. जर काटेकोरपणे हे नियम पाळते तर.

ओक – सर सुचवलेल्या मंत्रांना म्हणणे सध्याच्या धावपळीच्या जगात शक्य होत नसेल तर तो तुमच्या वतीने आम्ही करतो असे नाडीवाले सुचवतात. असा आपल्यासाठी दुसऱ्याने केलेला मंत्रजप आपल्याला लागू उपयोगी पडतो का? त्याचे शास्त्रीय कारण काय?

सर – असे घडतच. आपल्या ऐवजी दुसऱ्याने केलेला जप आपल्याला उपयोगी पडतो. जर तज्ज्ञाने नियमपूर्वक केलेला असेल तर जप ठराविक ऊर्जा निर्माण करतो व त्यांच्या माध्यमातून त्या ऊर्जा आपल्याला मिळतातच. आज धकाधकीच्या मामल्यामधे सगळ्यांना वेळ नसतो. म्हणून तसे करायला काही हरकत नाही.

ओक – सर एक प्रश्न माझ्या मनात बऱ्याच वर्षांपासून आहे की जर आपल्या घरात विशिष्ट जागेत, कलश, नारळ, अक्षता आदि पूजा साहित्याची मांडामांड करून एका बाजूला आपण म्हणता त्या सारख्या शास्त्रोक्त मंत्र म्हणणाऱ्यांकडून मंत्रांची टेप वाजवली तर मगाशी आपण म्हणालात की इतरांनी केलेला मंत्रजाप आपल्याला फलदायी होतो तसे असेल तर असे टेप लावून ती ऊर्जा निर्मिती साधता येणार नाही काय? शिवाय मंत्रांनी जी ऊर्जा स्पंदने निर्माण होतात, ती आपल्या शरीराने रीसीव्ह करायला आपण तयार असले पाहिजे नाही तर त्या ऊर्जा मिळूनही अपेक्षित परिणाम साधला जाणार नाही. मग असे दररोज मंत्रांचे टेप काही काळ घरात वाजवून आपल्या शरीराला ती ऊर्जा मिळवायला तयार करता येईल व टेपमधील ध्वनिकंपनांमुळे कमी पडणाऱ्या ऊर्जेची शरीर भरपाई करू शकेल. आपले यावर काय मत आहे?

सर – आपण म्हणता ते योग्य आहे. काही लोक तसे करत ही आहेत. तरीही प्रत्यक्ष माणसाने मंत्र म्हणणे व मशीनवर ते म्हणणे यामुळे 30टक्के ट्रान्समिटींग लॉस उद्भवतो. तथापि यंत्रावरील मंत्र म्हणण्यातही फायदे होतातच असे माझे मत आहे. आपण चांगले रिसीव्हर व्हा. ऊर्जा स्पंदने येतच राहतील, ती रिसीव्ह करायची कला, मन एकाग्र करून मिळवा.

ओक – सर आपण अनेक मंदिरात जातो परंतु तेथील व्यवस्था, गोंधळ, न समजणाऱ्या भाषेतील गाण्याचे, बोलण्यांचे आवाज, लांबलचक रांग, गाभाऱ्यातील अंधारी घुसमट, गरमी व घामाची चिकचिक याचे आघात होत असतात. त्यामुळे आपण या मंदिरात कुठून आलो असे वैतागाचे विचार येतात. अशा मानसिक अवस्थेत जर देवाच्या मुर्तीचे दर्शन झाले तर ते न झाल्याप्रमाणेच असेल. कारण सर, आपण म्हणता तसे मंदिरात आपण का जातो? तर तेथील मुख्य देवतेकडे आपण आपल्या ऊर्जाकेंद्रांना तेथील प्रक्षेपित होणारी ऊर्जा रिसीव्ह करायला मनाने सामोरे जात असलो तर त्या ऊर्जेचा लाभ आपणांस होईल. एका अर्थाने असेही म्हणता येईल की जर आपण आपली ऊर्जाकंपने त्या देवतेच्या मुर्तीवर सोडली तर तीच पुन्हा आपल्याला परत धनऊर्जा भरून कंपने परत मिळतील व त्यामधून आपले पुर्वकर्म शुद्ध होईल. आपल्याला जरी असे वाटत असेल की मी मला अमुक एक त्रास आहे तो सुटावा वा कमी

व्हावा म्हणून या नवग्रहमंदिरात आलो आहे पण खरे तर तो त्रास पीडा पुर्वकर्माने निर्माण झालेला आहे. ते पुर्वकर्म आपल्याला विविध मार्गांने त्रास देत आहे. ते ठीक करायला मला महर्षींनी सुचवले आहे म्हणू मी इथे आलो आहे. तेंव्हा मंदिरातील अनेक न आवडणाऱ्या गोष्टींकडे दुर्लक्ष करून मला दर्शनासाठी मनाने सिद्ध व्हावे लागेल. सर आपले काय म्हणणे आहे?

सर – खरे आहे. माझ्या शोध कार्यातून असे निष्पन्न होते की मंदिरे हे ऊर्जा स्त्रोत आहेत. म्हणून आपल्याला मंदिरांची उत्पत्ति का व कशी झाली, साईझ, शेप व मटेरियल हे विचारात घ्यायला हवे. त्या स्थपतींनी स्थलकाल परत्वे हे ऊर्जातत्व विचारात घेतले आहे. ऊदा. रामेश्वरला येणारी वैष्विक ऊर्जा ती कलकत्याला मिळणार नाही ती पुण्यात वा मुंबईत नसेल. कारण त्या स्थल परतवे बदलतात. शिवतत्व घुमटाकार आहे. त्याच्या बाहेर असलेले दीपस्तंभ, कळस हे त्या मंदिराचे ऐंटेना आहेत. त्यांचे कार्य विश्वातील ऊर्जा ग्रहण करणे साठवणे व प्रक्षेपित करणे असे आहे. आपण जर रिसीव्हर झालो किंवा सश्रद्ध मनाने तयार होऊन तर ती कंपने मिळवू शकतो. नव्हे आपल्या आपण ओढले जातो असा अनेकांना अनुभव येतो. काही जणांना रडायला येते. काहींचा देह कंप पावतो. बोटे थरथरायला लागतात, कान गरम होतात, ती लक्षणे आपल्या मनाने ऊर्जा रिसीव्ह करत असल्याची आहेत. अर्थात हे सर्व होईल जर आपण सश्रद्ध असाल तर.

ओक - सर आत्तापर्यंत आपल्या बोलण्यात विविध वैश्विक कंपने मोजमाप करता येतात असे आले, ही यंत्रे कोणती? ती कुठे उपलब्ध होतात? आपल्याला विशेषतः नाडीग्रंथांच्या संदर्भातील विविध मंदिरात पुन्हा जाऊन त्या ठिकाणची कंपने वा ऊर्जा मोजायला येतील का?

सर – आपल्याकडे या यंत्रांचे जनरल नाव फ्रिक्वेंन्सी मीटर असे आहे. वैज्ञानिक पद्धतीमधे ऊर्जा कक्ष वा कंपने गॅमा, अल्फा, क्ष किरण अगदी रडारची कंपन संख्या मोजणारी यंत्रे असतात. फोटो मीटर, पोलो मीटर अशी त्यांची काही नावे. ही यंत्रे बाजारात मिळतात.

ओक – सर असे वाचले आहे की काही कॅमेरे विशेषतः किर्लियॉन असे ऐकतो. ते काय?

सर – सांगतो. मी एसेक्समधे असताना दोन हजार लोकांवर प्रयोग करून जर मुर्तीतील दगडातून वा धातूच्या मुर्तीतून कंपने मोजता येतात, तर मग मानवाची कंपने अशी का मोजता येऊ नयेत या विचारातून किर्लियॉन या शोधकाने एक कॅमेरा बनवला. परंतु त्याचे त्वचेवर अपायकारक परिणाम दिसून आल्याने तो प्रकार मागे पडला. आता नव्या पिप (पॉलीफेजकॉंट्रास्ट इंटरफियरन्स फोटोग्राफी) कॅमेऱ्याच्या मदतीने व्यक्तीचे तेजोवलय किंवा ऑरा पहाता येतो,

ओक – ओ हो...त्याला औरा म्हणतात होय....सर नाडी केंद्रातून याचा उपयोग करता येईल का?

सर - होय... खरे तर आला आपली मुलाखत ही आवरा असे वाटते. असो. तर प्रत्येक वस्तू चेतना-चैतन्यमय असते. या कॅमेऱ्यातून ती कंपने वा आभा वलय बाहेर पडतात दिसतात. आपण विचारले तसे नाडीवर ही असे प्रयोग 100 टक्के करता येतील. नव्हे तसे करून अशी चेतना कंपने शोधली गेली आहेत. नाडीपट्टीची, नाडी पाहायच्या आधी, नाडीपट्टी सापडल्यावर, नंतर ती वाचल्यावर जातकाच्या आभा वलयात विविध फरक दिसतात व त्याचा अभ्यास करता येतो. माझे एक इंग्लिश मित्र जॉनसन, यांनी नाडीकेंद्रात जाऊन पहाणाऱ्यांचे, पट्टीचे ऑरा काढले. मला असे वाटते की या शास्त्रीय साधनसामुग्रीतून आपणास नाडीग्रंथांच्या वाचनाच्या वेळी आपल्या आंतरिक भाव-भावनांचे चढउतार त्यात नोंदलेले पहायला मिळतात. सामान्यांनी या आधुनिक साधनांच्या उपयोगितेतून नाडी ग्रंथांना पहावे व लाभ घ्यावा.

ओक - धन्यवाद सर.आपण या कार्यशाळेत येऊन आम्हाला नाडी ग्रंथाच्या विविध पैलूंवर प्रकाश टाकल्याबद्दल...

---

## 15. ग्रुप कॅप्टन राकेश नंदांची प्रेरणा । अगस्त्य महर्षींच्या मुर्तीची स्थापना




Figure 19 ग्रुप कॅप्टन राकेश नंदा आपले नाडीग्रंथांचे अदभूत अनुभव हिंदीतून सांगताना

ओकांशी राकेश नंदांची भेट पुण्याच्या जयप्रकाश खळदकरांमुळे झाली. त्यानंतर फिरोज मिस्त्रीसोबत फिल्म शूटींग करता करता मैत्री दृढ झाली. तेंव्हा राकेश चेन्नईच्या मिनुमबाक्कम विमानतळावर सेनेच्या हवाईमार्गाने होणाऱ्या माल व ट्रूप वाहतूकीचे नियंत्रण करणाऱ्या युनिटचे कमांडिंग ऑफिसर होते. त्यांना प्रो. ए एन के स्वामीनी मीनाक्षी नाडीकथनातून पुढील 10 वर्षे आपण भारताच्या दक्षिणेतील भागात नोकरी कराल असे म्हटले होते. तेंव्हा त्यांना मनातून असे वाटून गेले होते की दर दोन वर्षांनी बदली देशाच्या कुठल्याही भागात होते, सलग इतकी वर्षे अगदी ठरवूनही शक्य होणार नाही.

आज दि. 14 सप्टेंबर 2012ला पुन्हा ते चेन्नईला मिनाक्षी नाडी केंद्रात गेले असता मला मुद्दाम फोन करून म्हणाले सर, अदभूत घटनांची मालिकाच माझ्या जीवनात घडताना महर्षींचे कसे आभार मानावेत हे समजेनासे झाले आहे. चेन्नई नंतर नागपुर व नंतर बंगलोर असे करत मी खरोखरच बरोबर 10 वर्षे भारताच्या दक्षिण भागात राहिलो व ते पुर्ण होताच दिल्लीला आता पोस्टींगवर आहे. बंगलोर कॅंटच्या वास्तव्यात रेल्वे स्टेशनच्या हद्दीतील ऑफिसच्या जागेत शिरडीच्या साईबाबांचे सर्वधर्मस्थल - मंदिर पहाता पहाता निर्माण झाले. त्याचे उदघाटन करायला रिटायर्ड चीफ ऑफ एयर स्टाफ, एयर चीफ मार्शल फॉली मेजर आले होते. नंतर त्या मंदिरात विविध धर्मांच्या मुर्तींचे व फोटोंचे आगमन आपसुक झाले. साईंच्या मुर्तीच्या स्थापने नंतर तेथे मध पाझरू लागला. एकदा आरतीच्या वेळी खण्ण कन आवाज होऊन एक सोनेरी नाणे साईंच्या मुर्तीपाशी अवतरित झाले. मला (ओकांना) मिळालेल्या एका ताडपट्टीच्या गुंडाळीला साईबाबांच्या मुर्तीसमोर ठेवले असता अचानक ताडपट्यांवर विभूतीचे एकदा अवतरण झाले होते.

लोकांना वाटेल की राकेश नाडीग्रंथांवरील भक्तीमुळे फार वेडे झाल्याने ऑफिसच्या कामाकडे त्यांचे दुर्लक्ष होत असेल. वस्तुस्थिती नेमकी उलटी आहे, ते ऑफिसच्या कामात अत्यंत दक्ष व तत्पर आहेत याची पावती त्यांना मिळालेल्या ऑल इंडिया कॉम्पिटिशनची ट्रॉफी त्यांच्या युनिटला मिळाली यावरून सिद्ध होते. ते हवाईदलात एकमेव ऑफिसर आहेत की त्यांना नेव्हिगेटरचे विंग दिले गेले आहे. वयाच्या 38-40 काळात त्यांनी पाठीला 40 किलोचा फॅन बांधलेल्या मोटराईज्ड ग्लायडिंग करून विक्रम केला आहे. आर्मीतर्फे बेस्ट सर्विस



Figure 20 **चतुर्भुज मोबाईल धारी व गळा पाचवा शोभतसे।**

चे कमेंडेशन मिळाले. ऑफिस व्यतिरिक्त मेसमधे झालेल्या सालसा नृत्यातील प्राविण्यात त्यांना प्रथम पारितोषिक मिळाले, तर बिलियर्ड्समधे हवाईदलाच्या ऑफिसरने आर्मीच्या लोकांना नेहमी मिळणारा मान हवाईदलाला मिळवून दिला. लोकांना तत्परतेने नाडीग्रंथांची माहिती मिळावी यासाठी ते 4 तर कधी 5 मोबाईल बाळगून असतात. असो.

असे हे राकेश मला म्हणाले, 'सर, मी बंगलोरचे टेन्युअर संपवून बदलीवर जाईन त्या आधी नाडीमहर्षींच्या कार्याचे प्रतीक म्हणून काय करता येईल?' तेंव्हा कल्की अवताराच्या मुर्तीची स्थापना करायला शेकडो लोकांना निमंत्रण होते. त्या वेळी पुण्याच्या ईश्वरनजींनी त्या सोहळ्यात भेट दिली. त्या धामधुमीत राकेशनी मला फोनवरून ईश्वरन आले आहेत म्हणून फोन त्यांच्या हातात दिला. मी ईश्वरनजींना त्या सर्वधर्मस्थळात अगस्तींची मुर्तीची स्थापना करावी असा मनोदय व्यक्त केला. 'पाहू काही करता येते का' म्हणून त्यांनी फोन खाली ठेवला. आश्चर्य असे की त्यावेळी ईश्वरन यांच्या शेजारी एक व्यक्ति बसलेले होते त्यांनी ते संभाषण ऐकून मी मूर्ती बनवतो, अगस्त्यांची मुर्ती बनवून देऊ शकेन म्हणून सांगून राकेशला आश्चर्यात टाकले. झाले. पुढील काही महिन्यात अगस्त्यमहर्षींच्या मुर्तीची स्थापना झाली. ईश्वरनजींना काही कारणाने

बंगलोरला स्थापनेला उपस्थित राहणे शक्य नव्हते. राकेशनी मला त्या स्थापनेला मुख्य अतिथी म्हणून पाचारण केले व अगस्त्यांची मुर्ती मंगलमय मंत्रध्वनींच्या गजरात स्थापित झाली.



## 16. प्राचार्य विलास चिपळूणकर आपले अदभूत अनुभव कथन करताना.



Figure 8 प्राचार्य विलास चिपळूणकरांची मुलाखत घेताना राजेंद्र पाठक.

कोल्हापुरजवळ पैजारवाडीच्या स्व. चिलेदेव महाराजांचे आशीर्वादित आणि अनेक (औद्योगिक प्रशिक्षण संस्था) आयटीआयचे निर्माते, प्राचार्य आणि महाराष्ट्र शासनाचे विविध सन्माननीय पुरस्कार प्राप्त श्री. विलास चिपळूणकरांनी अत्री महर्षींच्या जीव नाडीच्या मार्गदर्शनाप्रमाणे अनेकांच्या पुर्वकर्मांचा निचरा करून त्यांची जीवने सुधारायला मदत केली. ते म्हणतात, 'माझी पत्नी वकील आहे. ती नाडीकेंद्रवाल्यांचा खोटेपणा पकडून त्यांनी धडा शिकवायला म्हणून गेली होती. परंतु आलेल्या अदभूत प्रत्ययामुळे तिने व स्वतः चिपळूणकरांनी नाडी महर्षींच्या कार्याला वाहून घेतले.

चिपळूणकर म्हणतात, 'अत्रीं महर्षींनी नाडीपट्टीतून मला सांगितले आहे की कधी कधी तुला वाटेल की तुझ्यासारख्या साधारण व्यक्तिने असे आपणाहून लोकांना खडसावून, वेळप्रसंगी गालावर थपडा देऊन त्यांची कर्मे सुधारायचा तुला काय अधिकार? ऐक, तुझा हात प्रत्यक्ष (चिले)देवांनी धरलेला आहे. म्हणून तू त्यांच्या आदेशाप्रमाणे निश्चिंतपणे कार्य करत रहा.'

ते म्हणतात, 'एकदा मला एखादे रुद्राक्ष आपल्याकडे असावे अशी इच्छा झाली. नंतर बाजारातून विकत आणलेल्या उदबत्तीच्या पुड्यातून अचानकपणे एक रुद्राक्ष मिळाला. अत्री महर्षींना विचारता ते म्हणाले, 'होय तो आम्हीच तुला पाठवला होता. तो पंचमुखी आहे'. पुढे नरसोबाच्यावाडीला एक जन्मांध व्यक्ति आहेत कराडकरबुवा. त्यांनी सहज बोलताना म्हटले, 'अहो तुमच्याकडे रुद्राक्ष आला आहे त्याला भगव्या घाग्यात ओवून धारण करा'. आता त्या जन्मांध औलियांनी असे सांगून मला आश्चर्यात टाकले.'

असेच एकदा वाडीला तुळशीकरांच्या पुस्तकाच्या दुकानात ते मालक म्हणाले, 'सर हे पुस्तक आपण घ्यावे. तो जाडजूड ग्रंथ होता प्राचार्य अद्वयानंद गळतगे सरांचे 'विज्ञान आणि चमत्कार'. चारशे रुपयांची किंमत वाचून, इतके पैसे बरोबर नाहीत असे वाटून पुस्तक घ्यायला संकोचलो, तर तुळशीकर म्हणाले की मला माझ्या (बेलसरे)गुरूंचा आदेश आहे की ते पुस्तक आपल्याला द्यावे. पैशाचा प्रश्न येतोच कुठे? नंतर त्या पुस्तकामुळे माझी गळतगे सरांशी ओळख झाली अन् नंतरच्या प्रत्यक्ष भेटीत घसट वाढली. असेच एकदा शशिकांत ओक जयसिंगपुरला माझ्या घरी राहायला आले होते, त्यातून आमची ओळख दृढ झाली.

।। जय चिले देव।।

## 18. विक्रम फडके सांगतात आपले नाडीग्रंथांचे अनुभव



**Figure 9 विक्रम फडके सांगतायत ओकांना आपल्या आयुष्यात नाडीग्रंथांचे स्थान**

विक्रम फडके आपल्या आयुष्यातील नाडी ग्रंथांचे मार्गदर्शन व त्यामुळे आलेले अदभूत अनुभव विषद करताना म्हणतात, 'माझे वडील अकाली गेल्याने माझ्यावर अठराव्या वर्षी घराची व धंद्याची जबाबदारी येऊन पडली. वडिलांना वसई व सफाळ्यात  लोक राजा म्हणून ओळखत व मान देत. राजाचा मुलगा म्हणून माझीही शान राजकुमाराची होती. अहो साधे समोर ठेवलेला पाण्याचा पेला भरून हातात प्यायला द्यायला नोकर चाकर होते. अशा थाटातील आयुष्यात मी सैरभैर झालो. त्यात विवाह करुन बसलो. वाचायचा प्रचंड नाद. ओक सरांचे ते पुस्तक हाती आले.  मी विविध नाडीकेंद्रातून भविष्य पाहून आलो. नंतर एकदा  डोंबिवलीत ओक सरांचे भाषण होते ते ऐकून उत्सुकते पोटी पुन्हा नाडी भविष्य पाहिले व हळूहळू त्यांच्या संपर्कात आलो. शांतीदीक्षा करायच्या राहून गेल्या होत्या त्या पुर्ण करायला पैसे नव्हते तरीही त्या केल्या व मग दिवस पालटले. पत्नी व मुलगी आनंदाने घरी राहायला आली. धंद्यात थोडा जम बसला. काही कोर्ट केसेचे निकाल लागून आज अशी परिस्थिती आहे की माती जरी हातात घेतली तरी तिचे सोने होईल. नाडी अवलोकन व नंतर शांती-दीक्षा करण्या आधी नेमके याच्या उलटे होत असे!'

त्या कसोटीच्या काळात मला वाईट व्यसन वा सवई लागल्या नाहीत ही देखील महर्षींची कृपा आहे असे वाटते. अन्यथा माझ्या भरकटलेल्या जीवनात अशा लोकांशी संपर्क व ओळख मला स्वप्नातही अपेक्षित नव्हती. त्यामुळे नाडीमहर्षींची सेवा करण्याच्या उद्देशाने मी ओक सर व हैयोंहैयैयोंच्या संपर्कात आहे.

## 19. श्री. अशोक लचके यांची मुलाखत



Figure 23 श्री अशोक लचके सांगतात त्यांच्या निर्धारित गायत्री मंदिराचे नाडीतील कथन

'ओम बाबाजी', अशी फोनवरून साद आली की समजावे हे अशोक लचके बोलतायत. कार्यशालेत ते आपला नाडीग्रंथांचा अनुभव कथन करताना म्हणतात, 'आम्ही 98सालच्या सुमाराला भक्तीमार्गावरील कै. वसुंधरा गाडगील मॅडमच्या घरी विंग कमांडर ओकांच्या मुखातून नाडीग्रंथांच्या अदभूत गाथा ऐकायला जमत असू. आपल्या असे भविष्य कथन केव्हा ऐकायला मिळेल असे नेहमी वाटे. पुढे अनेक नाडीकेंद्रांचे पुण्यात आगमन झाले. मराठी माणसांला नाडीग्रंथांचे वेळोवेळी अवलोकन करायची सुसंधी प्राप्त झाली.' माझे एक स्वप्न होते की पुण्यात गायत्रीमातेचे मंदिर हवे. त्याला दुजोरा मिळाला नाडीवाचनातील विविधकथनांमधून. त्यात म्हटले गेले होते की असे पुर्वमुखी मंदिर असेल. त्यात 12 राशींचे खांब, जागा उंचीवर असेल, पाण्याचा प्रवाह वाहात असेल, 27 नक्षत्रांचाही त्यात समावेश असेल. मंदिराशिवाय अन्य धार्मिक कार्याची व पुस्तकालयाची व शांततेत साधनेची सोय असेल. मग तसे घडायसाठी मी अनेक खटपटी करून जागा मिळवली आणि आता तर गायत्रीमातेची मुर्ती बनून प्रत्यक्ष घरी आली. मधल्याकाळात महाअवतार बाबाजींची कृपा झाल्याने काळ्याविद्येचा प्रभाव हळू हळू नष्ट होऊन आता या वयातही चिरंजीव विपुलच्या सहकार्याने मंदिरस्थापनेचे कार्य अविरत चालू आहे.

Figure 24गायत्रीमातेची मुर्ती...

## 20.श्री.गणेश भक्त व नाडी प्रेमी श्री. प्रदीप रास्ते यांच्या हिंदी भाषेमधील मुलाखतीवर आधारित

**मुलाखतकार - शशिकांत ओक व प्रकाश पेंडसे**



Figure 10 **श्री प्रदीप रास्ते यांची मुलाखत घेतात प्रकास पेंडसे व शशिकांत ओक**

ओक – प्रदीपजी, आपला नाडीग्रंथांशी परिचय केंव्हा व कसा झाला?

रास्ते – त्याचे असे झाले की मी 2004 ते 2006च्या दरम्यान काही कारणांनी विवंचनेत होतो. त्यावेळी सिंहगड रस्त्यावरील माणिकबाग नाडीकेंद्रात गेलो होतो. तिथे माझी पट्टी निघाली. पण नंतर त्याकडे दुर्लक्ष झाले. पुढे 2010 मधे माझे ओळख श्री. सुभाष हावऱ्यांशी झाली. त्यांनी पुन्हा नाडीग्रंथ पहा म्हणून थेरगावच्या केंद्रात नेले. तिथे वैद्यनाथनकडून पट्टी वाचून घेतली.

ओक - का हो ते सुभाषजी ते तर नव्हेत ज्यांना नऊ हार्टअटॅक आले होते? नंतर माडी महर्षींच्या आदेशानुसार शांती-दीक्षा केली व इतके ठणठणीत झाली की ते विसरून ही गेले की ते एक वेळ मृत्यूच्या दारात जाऊन परतले आहेत?

रास्ते - हो हो, तेच ते. आपण म्हणता तसे त्यांनी तो किस्सा सांगितला व म्हटले कि तुम्ही काही सांगायचे नाही फक्त हो-नाही म्हणा. तसे करत शेवटी माझी पट्टी निघाली. नेहमीप्रमाणे माझे, पत्नी, आई-वडील सर्व नावे, शिक्षण, व्यवसाय, जन्मदिनांक व कुंडली तंतोतंत बरोबर आली. इतकेच नव्हे तर माझ्या मुलीचा विवाह झाला असून तिला संतानप्राप्ती नाही याची काळजी आपल्या आहे असे ही म्हटल्यावर माझ्या मनातील ती बाब महर्षींनी अचुक ओळखली होती याची जाणीव झाली. नंतर त्यांनी वैदीश्वरकोईलला जाऊन काहीग्रह दर्शन करायला सांगितले होते, म्हणून तब्बल आठ दिवस राहून प्रत्येक वाराप्रमाणे निवांतपणे आम्ही नवग्रहांचे दर्शन घेतले. त्यानंतर जावई-मुलीनेही दक्षिणेत जाऊन नवग्रहमंदिर दर्शन घेतले व शांती दीक्षेचे सोपस्कार केले. त्यामुळे आपल्या संबंधीचे पुर्व वृतांत अगदी अचुक असतात यात काही वाद नाही.

ओक – वा, वाराप्रमाणे त्या त्या ग्रहाच्या मंदिरांना भेटी हे मात्र मला नवीन आहे!

रास्ते - तिथली आणखी एक मजा सांगतो. एक जपानी मुलगी तिथे भेटली. तिच्याशी बोलताना ती म्हणाली, 'मी जपानी लोकांचे अंगठ्याचे ठसे आणते व त्यांच्यासाठी शांती दीक्षेचे सोपस्कार करायला येते-जाते.' माझ्या मुलीला व जावयाला जपानी अस्खलित येते म्हणून मी मुलीला तिच्याशी बोलायला दिले. 15 मिनिटांच्या संभाषणात कळले की ती गेली 6 वर्षे दर तीन चार महिन्यांनी भारतात येते. मला त्या गोष्टीचे आश्चर्य वाटले. तिला म्हणालो, 'का ग तुमच्या लोकांची नावे पण मिळतात की काय ?' तिच्या बरोबर येणाऱ्या एका भारतीयानी विचारले, 'काहो ही बोलतेय ते खरे आहे काय? ते म्हणाले, 'हो. अगदी खरे आहे. शिवाय ती ध्यान धारणे प्रगत आहे. साधनेला बसली की तीन तीन तास ध्यानाला बसते'.

ओक - नंतर पुन्हा आपण कधी दक्षिणेत यात्रेला गेलात होतात का?

रास्ते - हो, पुन्हा वैदीश्वरन कोईलला गेलो तेंव्हा वाटले, आपण कौशिक गोत्राचे म्हणवतो तर कौशिक महर्षींची सुक्ष्म नाडीपट्टी पहावी. त्याप्रमाणे ती निघाली. त्यात मला माझ्या पुर्वजन्मातील घटना व कर्मदोषांचे वर्णन आले. नंतर मी त्यातील शांतीदीक्षा करायला त्याच्या आपसपासच्या देवालयांना भेटी देऊन आलो.

ओक - धन्यवाद रास्तेजी.

या दरम्यान नाडी ग्रंथप्रेमी व स्नेही श्री. प्रकाश पेंडसे यांनी संभाषणात भाग घेतला.

प्रकाश पेंडसे – प्रदीपजी, आपल्या गणेश मुर्तींच्या बाबतच्या छंदासंदर्भात काही उल्लेख नाडीपट्टीत आले काय?

रास्ते – सांगतो. मी गेली सहा वर्षे भगवान गणेश उपासना करत आलो आहे. म्हणून मी हा प्रश्न नाडी महर्षींना 5-6 वर्षांपुर्वी विचारला होता की मी केलेला 21 ग्रंथांच्या प्रकाशनाचा संकल्प पुर्ण होईला का? कारण त्याला येणारा खर्च सध्या आवाक्याबाहेर आहे. त्यावर महर्षींनी उत्तर दिले की अरे या कामासाठी तुझी नियुक्ती झाली आहे. हेच तुझे जीवित कार्य आहे. तू करत रहा. योग्य मदत व सहकार्य मिळत राहील. इतकेच नव्हे तू या नाडी ग्रंथांची सेवा म्हणून आमच्यावरही लेखनकार्य करशील. त्याप्रमाणे नंतर माझा एक विशेषांक ग्रंथ - गणेश उपासना स्त्रोत्रसंग्रह प्रसिद्ध झाला. अक्कलकोटच्या स्वामी समर्थ महाराजांच्यावर दोन विशेषांक ग्रंथ प्रसिद्ध झाले. आता मी गणेशावर 21 ग्रंथांच्या प्रकाशनाचा संकल्पातील दुसऱ्या ग्रंथ प्रकाशनाच्या मार्गावर आहे. त्या संपुर्ण ग्रंथमालेचे नाव आहे ब्रह्मणस्पती विश्वग्रंथ माला. गणेश सहस्त्रनाम त्यावर आधारित पहिला ग्रंथ प्रकाशित झाला आहे. आपल्याला फक्त गणेश पुराणातील गणेशसहस्त्रनाममाला माहित आहे. परंतु मला शोधकरून नंतर सहा गणेश सहस्त्रनामावल्या शिवाय माता सरस्वतीवरील दोन अशा आठ सहस्त्र नामावली उपलब्ध झाल्या त्या सर्वांवर मी गणेश सहस्त्रनामावली अष्टक प्रसिद्ध केले. यापुढील ग्रंथ 'गणेश गीता' नावाचा आहे. त्यावरही पेपर व नियतकालिकातून अनेकांच्या स्तुत्य म्हणून प्रतिक्रिया येत आहेत.

पेंडसे – आपण गणेशाचे दुर्मिळ फोटो प्रसिद्ध करायचा संकल्प केला आहेत त्याबद्दल सांगा ना.

रास्ते - महाराष्ट्र व अन्य उत्तर भारतातली भागात गणेशांचे व मंदिराचे फोटो काढले जाऊ देतात पण दक्षिणेत फोटो काढायची परवानगी मिळत नाही. तरीही मी अशा काही मुर्तींचे फोटो मिळवले आहेत. उदाहरणार्थ चिदंबरम येथील नरमुख बालविनायक मंदिर. आणखी एके ठिकाणीचे आदि गणेशाची काळ्या पत्थरातील मुर्तीचे फोटो मिळवले. असे हे गजवदनाऐवजी मानवी चेहरा असलेले गणेशांचे फोटो, स्वामी मलई, तंजावूर, त्रिची अश्या अनेक ठिकाणचे फोटो मी संग्रहीत करून प्रकाशित केले आहेत. असे 1100 प्रतिमांचे व मुर्तींच्या स्थानांचे फोटो संग्रहित करायचे ठरत आहे.

मुलाखत संपवायच्या आधी मला संधी द्या की मी शशिकांत ओकांबाबत काही सागूं इच्छितो. काही महिन्यांपुर्वी पेंडश्यांबरोबर मी त्यांच्या घरी भेटायला गेलो. त्याच्या नाडीग्रंथांवरील कार्य – जे एक मिशन म्हणून ते

करतायत कि लोकांना निदान असे नाडी ग्रंथ आपल्याकडे उपलब्ध आहेत याची जाणीव लोकांना करून देणे. त्यांच्याकार्यामुळे आज अनेकांना नाडीग्रंथांतून मार्गदर्शन मिळवता येत आहे. त्यांचे प्रयत्न खरोखरच स्तुत्य आहेत. मला त्यात जितकी मदत करता येईल तितकी करायची इच्छा आहे.

ओक – प्रदीपजी आपल्या माझ्याबद्दलच्या उदगारांबद्दल व मुलाखत दिल्याबद्दल आपले व श्री. प्रकाश पेंडसे सरांचे मनापासून धन्यवाद.

-----

## 21.प्रखर नाडी ग्रंथप्रेमी श्री. प्रकाश पेंडसे



**Figure 11 अंनिसला सळो कि पळो करणारे श्री प्रकाश पेंडसे ओकांसमावेत**

नाडीवरील कार्यशाळेत श्री. प्रकाश पेंडसे यांनी ओकांची मुलाखत घेतली. पेंडसे हे बहुश्रुत व्यक्तिमत्व. पुर्वी
अंनिसच्या साप्ताहिक मीटींगना ते हजर राहात असत. अनेकदा चर्चेत त्यांच्या कार्यातील त्रुटी सडेतोडपणे दाखवत असत. 1995साली गणपती दूध प्याल्याच्या घटनेमुळे अंनिसच्या निषेध खलित्यांना फार महत्त्व आले होते. नाडीग्रंथातील मजकुरात तमिळभाषेत नाव वगैरे काही लिहिलेले नसते असे पेपरमधून परिपत्रक काढून अंनिसने 30 सप्टेंबरला एक मोठी मीटींग आयोजित केली होती. केबल मिडिया, पत्रकार व अंनिसच्या तोंडाळ सदस्यांनी आपटे प्रशालेचा हॉल खच्चून भरला होता. त्या मीटींगला श्री.पेंडसे हजर होते. माझ्या भाषणानंतर उपस्थित तमिल जाणकारांकडून अंनिसने पुरावा म्हणून आणलेल्या फोटोतील मजकूर तमिळ भाषेत असल्याचे तेथल्या तिथे त्यांनी व डॉ. वि. ह. कुलकर्णींनी लेखी पुरावे मिळवले अन अनुभव न घेता परस्पर नाडी ग्रंथांना पुण्यात बसून खोटे ठरवायची अंनिसची खेळी वाया गेली.

नंतर श्री. पेंडशांनी नाडीग्रंथांचे अवलोकन केले व मुलांच्या नोकरी व व्यवसायाच्या संबंधी अचुक मार्गदर्शन मिळवले.

---

**22.**

## 23. श्री. व सौ सुनीता पडवळ आपले अदभूत अनुभव कथन करतात...



**Figure 12श्री. व सौ. सुनीता पडवळ आपले अदभूत कथांचे वर्णन करताना**

2004 मधे जीवनात कसोटीचा काळ होता. नाडीग्रंथांतून काही मार्गदर्शन मिळले नाही म्हणून मी नाडीकेंद्रावर पोलिस कारवाई करायला म्हणून गेले होते. शांती-परिहार तेंव्हा केला नाहीत आता तरी करा असा सल्ला मिळाला. अविश्वास होता. काही केले नाही. पुढे 2008 ला मुलासाठी मैत्रिणीच्या सल्ल्याने पुन्हा एका *नाडीकेंद्रात पट्टी पाहिली त्यावेळी त्याला सांगितलेली शांतिदीक्षा करा. वाटले तर मी पैसे देते म्हणून मैत्रिणीच्या पाठपुराव्यामुळे आम्ही साऊथला गेलो. तेथे मुलाचे परिहार झाले अन त्याला आश्चर्यकारक फरक पडला जो त्याआधी काही ऑपरेशन्सनेही झाला नव्हता! श्री पडवळ म्हणाले की मुलाच्या पाठोपाठ मी ही परिहार केला आणि मलाही असा अनुभव आला की आता आम्ही नाडीग्रंथाचे व ओक सरांचे आभार कसे मानावेत असे वाटू लागले. आज अचानक कार्यशाळेच्या निमित्ताने ओक व अन्य नाडी ग्रंथप्रेमींची भेट झाली आनंद वाटला. शांती दीक्षा करा मग नाडीला नावे ठेवा असा माझा अनुभवांती सल्ला आहे

– सौ. सुनीता व श्री. प्रकाश पडवळ.पुणे

* नाडीकेंद्र – श्री आर. मुत्थु. अगस्त्यार नाडी, 26 मित्तल सोसायटी तळमजला, प्रतीकनगर, सिद्धिविनायक मंदिराजवळ, विश्रांतवाडी. मो. 9561084292.



Figure 24 प्रा. गळतगे कार्यशाळेत मार्गदर्शन करताना, सोबत प्रिं. चिपळूणकर, विक्रम फडके व ओक.

## 24. ज्ञान तपस्वी प्राचार्य अद्वयानंद गळतगे सरांविषयी माहिती सांगतायत शशिकांत ओक

श्री. प्रकाश पेंडशांनी गळतगे सरांची नाडी ग्रंथांशी कशी ओळख झाली व त्यांनी या विषयात काय काय योगदान केले यावर ओकांची मुलाखत घेतली. त्यात ओक सांगतात, 'गळतगे सरांची प्रथम भेट, माझ्या वाचनात पैलतीरचे काही दिवाळी अंक आले. त्यात प्राचार्य अद्वयानंद गळतगे सरांचे बुद्धिवादी व निरीश्वरवादी लोकांवर व संस्थावरील तडाखेबंद भाषेतील लेख वाचून मला त्यांना भेटावे असे वाटले. अन मी कोल्हापुरातील पैलतीरच्या प्रा. कृष्णा गुरवांना भेटलो. 'पश्यंती' बंगल्यात चर्चा झाल्यावर त्यांनी मला निपाणीच्यापुढे भोज नावाचे खेडे आहे तेथे हे गळतगे शेतात राहतात.आत्ताच जाल तर शेवटची बस पकडून भोजला जाता येईल असे म्हणून अक्षरशः पिटाळले! नंतर कानडी मुलुखातील बसच्या घडका खातखात मी भोजला व नंतरचे 3-4 किमी एकांच्या मोटरसाकलवरून त्यांच्या शेतातील घरात पोहोचलो. तेंव्हा त्यांचे मोतीबिंदूचे ऑपरेशन झाल्याने ते डोळ्याला काळाचश्मा लाऊन होते. मी त्यांना मराठीतील नाडीवरील पुस्तक दिले व एक टेप वाजवून दाखवून नाडी ग्रंथांची तोंड ओळख करून दिली. दृष्टी आली की मी सवडीने वाचून अभिप्राय कळवेन असे म्हणून त्यांनी बोळवण केली. नंतर मला त्यांचे एक सविस्तर पत्र आले त्यात त्यांनी डॉ. जयंत नारळीकरांना पाठवलेले पत्र ही जोडले होते. त्यावरून हे काही वेगळेच व्यक्तिमत्व आहे याची खात्री मला झाली. नंतर त्यांनी पुढारीत लेख लिहून डॉ. नरेंद्र दाभोलकरांनी केलेल्या आक्षेपांवर सडेतोड मत दिले होते.

ही गोष्ट सन 1995ची. माझी बदली 96 मधे श्रीनगरला झाली. त्यानंतर सन 1998 मे-जूनमधे सर श्रीनगरच्या सहलीला आल्याचे कळले म्हणून मी त्यांना भेटायला सेक्युरिटीमुळे फार त्रासाचे असूनही काही लटपटी करून दाललेकमधे एका हाऊस बोटीवर भेटलो. त्या वेळी त्यांनी मला प्रथम पाहिले. नंतर मी पुण्याला बदलीवर आल्यानंतर 98च्या डिसेंबरात त्यांनी व मी नाडीकेंद्रांना भेटी द्यायला चेन्नईची यात्रा केली. त्यात सरांची पट्टी सापडली. त्यात त्यांच्या कुटुंबियांसमावेत माझे ही नाव त्या ताडपट्टीत वाचायला मिळाले. शिवाय या जातकाला आपले भविष्य जाणण्यापेक्षा नाडीग्रंथांवर शास्त्रीय शोधकार्य करायचे आहे असे लिहून आले होते. त्या नंतर त्यांनी नाडीग्रंथांवरील अंनिसच्या खोडसाळ व विकृत प्रचाराला असे धारेवर धरले की त्यामुळे अंनिसवाद्यांची भूमिका पराजित झाली. त्यावर आधारित बोध अंधश्रद्धेचा नावाच्या पुस्तकाला त्यांनी प्रस्तावना लिहिली होती.

---

## 25. महर्षी अत्री जीव नाडी आणि पुज्य इंद्रदेव महाराज



श्री. हिराभाई बुटाला कोकणातील खेडमधील सुप्रसिद्ध उद्योजक व अनेक शैक्षणिक संस्था चालक आणि नाडी महर्षींचे आशीर्वादित व्यक्तिमत्व. आजवर त्यांच्या प्रेरणेने हजारोंच्या संख्येने नाडी ग्रंथांचे अवलोकन करायला लोक प्रवृत्त झाले आहेत. त्यांच्या राजकारणातील निरलस सेवेबद्दल त्यांना इंदिरा गाधी पुरस्काराने सन्मानित केले गेले आहे.

पुण्यात झालेल्या अधिवेशनात दिले गेलेले गौरव चिन्ह एक 'शिडाची होडी' असे होते. मानवी जीवन एक होडी किंवा नाव. स्वप्रयत्न व बुद्धी अशा दोन वल्हयांनी ती कष्टपुर्वक हाकारताना मानवाने नाडीग्रंथांच्या अवलोकनाचे शीड लावले तर जीवन प्रवाह यात्रा सुरळीत व उपयोगी होते. असा प्रतीकात्मक संदेश यातून दिला गेला.

साधू-संताच्या व नाडीग्रंथाच्या मार्गदर्शनामुळे भारतभर अनेक धार्मिक स्थलांना भेटी व उदार देणग्या देऊन त्यांनी ईश व देश सेवेचा आदर्श घालून दिलेला आहे. अशा श्रद्धावान श्री. हिराबाई बुटालांच्या पुढाकाराने पुढील कथन केले जात आहे त्यांच्याबद्दलची गोष्टही यात समाविष्ट आहे.

त्याचे असे झाले की, दि. 25 मे 2011, बुधवारी सकाळी, श्री. हिराभाई बुटाला आपल्या पत्नीसह सकाळ-सकाळी 7.30 च्या सुमारास मला आमच्या विमाननगरच्या घरी भेटायला आले. दरवर्षीप्रमाणे त्यांच्याकडून आम्हाला रत्नागिरी हापूस आंब्याची पेटी न चुकता येते. तशी एक पेटी त्यांनी आम्हाला दिली आणि त्यांच्याकडून आम्हाला ते सध्या पुण्यात का आलेत याचे कारण समजले. आळंदीला एका भागवत सप्ताहासाठी पूज्य इंद्रदेव महाराज प्रवचन करण्यास आले आहेत व त्यांच्या प्रवचनाचा लाभ घेण्यासाठी ते आले होते. त्यांनी पूज्य इंद्रदेव महाराजांना आपले गुरू मानले आहे. श्री. हिराभाई म्हणाले, 'नुकतेच आम्ही दक्षिण भारतातील विविध मंदिरांना आणि नाडीग्रंथ केंद्रांना भेटी देऊन आलो. त्यात प्रमुख नाडीमध्ये त्यांना त्यांच्या गुरूंचा उल्लेख आणि वर्णन आले.'

'त्यांच्या गुरूशी म्हणजेच पूज्य इंद्रदेव महाराजांची नाडीपट्टी शोधली जावी असे त्यांच्या मनात फार होते. आता तुम्ही व पूज्य इंद्रदेव यांची गाठभेट व्हावी आणि तुम्ही त्यांना नाडीग्रंथाबद्दल माहिती देवून यापुढे नाडीग्रंथांच्याबद्दल त्यांचे व महर्षींचे विचार जाणून घ्यावेत अशी तळमळीची इच्छा आहे.' असे म्हणताच मी त्यांना म्हणालो, "भाऊ! (भाऊ त्यांना सगळे आदरानं म्हणतात.) मी आज मोकळा आहे. आळंदीला जाऊन त्यांचे भागवत प्रवचन जरूर ऐकेन. त्यावर हिराभाईंनी असे ठरवले ते खेडला परत न जाता दुपारी बारा-एक पर्यंत पुन्हा माझ्याकडे येवून तेथून पुन्हा मला व पत्नीला घेऊन दुपारी दीडच्या प्रवचनाच्यावेळी तेथे जावे आणि प्रवचन संपल्यावर त्यांची भेट घ्यावी. त्याप्रमाणे ते व मी त्यावेळी सोबत त्यांची मोठी बहीण कारने निघून दुपारी पावणेतीनला आळंदीला पोहोचलो. महाराजांची ओळख करून दिली गेली. सुश्राव्य प्रवचन ऐकण्याचा लाभ मिळाला. त्या प्रवचनात त्यादिवशी श्रीकृष्णाच्या बालपणाबद्दल काही कथा पूज्य इंद्रदेव महाराजांनी सांगितल्या. मधे-मधे भजनाच्या निमित्ताने श्रोतृवर्ग उठून भारावून आपल्या देहबोलीतून नृत्य करून वा टाळ्या वाजवत त्या भजनात रमला.



**Figure 13 भगव्या वस्त्रातील इंद्रदेव महाराज नृत्य महोत्सावात सामिल**

काही उत्साहाने स्टेजवर चढून इंद्रदेव महाराजांना या नृत्य महोत्सवात सामील करून घेतले आणि त्या संपूर्ण गोकुळोत्सवात गायन, वादन, नृत्य आणि वक्तृत्व यामुळे माझ्यासारखा प्रथम दर्शन घेणारा त्या प्रवचनात रंगून गेला.

त्यांनी त्यामध्ये केलेली कथने व अन्वयार्थ फारच रंजक आणि विचार करायला लावणारी होती. मथुरेला दही-दूध आणि दूधाचे पदार्थ विक्री करण्यास नेणे हे त्यावेळच्या आर्थिक कारणाचे मूळ होते. घरची मूलेबाळे यांना उपाशी ठेवून असे पदार्थ बाजारात विकणे गैर आहे असे दर्शवून देण्यासाठी त्या गोपिकांच्या घरातून दूधाचे विक्रीचे पदार्थ - दही, लोणी, तूप त्यांच्यातच वाटून घरच्यांना समाधानी करण्याचे उद्देश साध्य झाले. उरलेले पदार्थ नेत असताना खराब न व्हावेत व जवळ विकले जावेत म्हणून याचीही व्यवस्था बालकृष्णांनी युक्तीने केली. आदी विचार अद्याप वाचलेल्या कृष्णचरित्रापेक्षा वेगळे विचारधन वाटले. अन्यथा कृष्णाच्या बाललीला गोकुळातील लोकांच्यामध्ये थोडीफार भांडणे लावून देण्याचा फक्त चेष्टा आणि मस्करी प्रकार असावा असे वाटत राहते. असो!

रात्री त्यांची पुन्हा भेट घेतली, त्यावेळी इंद्रदेव महाराजांचे महाराष्ट्रातील शिष्य श्री. माधव तिवाटणे आणि अन्य एकजण उपस्थित होते. त्या चर्चेत असे ठरले की, इंद्रदेवजी महाराजांच्या अंगठ्याचे ठसे घेऊन नाडी पट्टया शोधायचे काम विविध केंद्रात चालू करावे आणि अत्रि-अनुसुया महर्षी यांच्या जीवनाडीचे कथन याठिकाणी म्हणजेच आळंदीच्या गजानन महाराज भक्तनिवासात केले जावे. त्यासाठी आम्ही लोकांनी पुढाकार घेवून महर्षिंच्या ताडपट्ट्यांना येथे आणावे. शक्यतो दि. 26 ला. कारण  इंद्रदेवमहाराज त्या तारखेनंतर अन्य ठिकाणी रवाना होणार आहेत,

मी त्यानंतर दि. 26 गुरूवारी सकाळीच ईश्वरजींचा फोन फिरवला. 'मी ओक बोलतोय पुण्याहून.' प्राथमिक माहिती देवून त्यांना मी विनंती केली की, जर आपण परवानगी दिलीत तर अत्रीजीवनाडीद्वारे श्री. हिराभाई बुटाला यांच्या गुरूंच्यासाठी महर्षीचा आदेश घडवण्याची इच्छा व जबाबदारी आमची आहे. तरी आपण तशी परवानगी डहाणूकर केंद्रातील श्री.

वडीवेल मुदलीयार यांना द्यावी. ईश्वरन म्हणाले, 'महर्षिंच्या या पट्ट्या कुठेही बाहेर नेऊन वाचायची परवानगी नाही. ज्याला-त्याला आपले प्रश्न-समस्या यावर महर्षिंचे मार्गदर्शन हवे असेल त्यांनी केंद्रात येणे गरजेचे आहे. तरीही तुम्ही स्वतः आज अशी इच्छा व्यक्त केल्यामुळे मी माझ्या गुरूंची परवानगी घेईन आणि तुम्हाला थोडा वेळात सांगेन.'

काही वेळाने ईश्वरनजींचा फोन वाजू लागला. ते म्हणाले, ‘आमच्या गुरूंनी तशी परवानगी दिलेली आहे. तेव्हा तुम्ही श्री. मुदलीयार आणि त्यांच्या समवेत श्री. राजन या दुसऱ्या नाडी वाचकाला हिंदीमध्ये व्यवस्थित सांगण्यासाठी बरोबर घेवून जा. मी त्यांना आताच तसे सांगतो.’ त्याप्रमाणे मी माझी कार काढून डहाणूकर कॉलनीतील केंद्रात दाखल झालो आणि त्यावेळी गाडीत श्री. मुदलीयार म्हणाले, ‘ईश्वरनजींचा फोन आल्यावर आम्ही अत्रिनाडीमधून आजच्या या कार्यक्रमास जाण्यासाठी मार्गदर्शन मागितले. त्यावेळी त्यांनी नाडीपट्ट्यातून म्हटले, "हे अनुसये, मी कालपासून जरा चिंतेत आहे. कारण काल रात्री (बुधवार दि. 25 मे ला) काही व्यक्ती मला या केंद्रातून बाहेर काढून एका व्यक्तीचे भविष्यकथन ऐकू इच्छितात. अद्याप अशी परवानगी मी कोणालाही दिलेली नाही."

“बरोबर आहे!“अनुसया म्हणाल्या, "मग आता काय?",

"पाहू",अत्रि महर्षि म्हणतात. "जर ते मला या ताडपट्ट्यामधून या बाबत काय करावे अशी परवानगी विचारतील तर मी त्यांना म्हणेन की बुधवारी रात्री चारजणांनी त्यांच्या गुरूबाबत मला तिथे नेण्याचे चर्चिले. ते सर्व माझे ग्रंथप्रेमी आहेत. त्यामुळे सध्याची परंपरा सोडून त्यांच्या विनंतीला मान देऊन तेथे येईन आणि योग्य ते कथन करीन. शिवाय ज्या व्यक्तीबाबत ते कथन असेल ती व्यक्तीदेखील अत्यंत धार्मिक व अध्यात्मात पुढे गेलेली असल्यामुळे अशा व्यक्तीचे कथन करण्याचा आनंदही मला मिळेल.’

‘हे अनुसुये, म्हणून मी या नाडी वाचकाला असा आदेश देतो की, तेथे बरोबर जाताना त्यांनी मोठे हार, फुले, काही फळे आणि मिष्ठान्न आपल्या बरोबर नेवून त्यांना अर्पण करावेत आणि यथायोग्य दक्षिणा देऊन त्यांचा सन्मान करावा.’

‘त्यानंतर मग त्यांनी विचारलेल्या प्रश्नांची उत्तरे मी आनंदाने देईन.’ हे कथन वाचून श्री. मुदलीयार यांचे समाधान झाले आणि त्याप्रमाणे आम्ही वाटेत फळे, फुले, मिठाईचे पुढे, हार विकत घेऊन आळंदीच्या गजानन महाराज भक्तनिवासात दुपारी साडेबारापर्यंत पोहोचलो. मध्यंतरीच्या काळात फोनवरून आमच्या येण्याची वार्ता वेळोवेळी तेथे पोहोचत होती. आम्ही पोहोचताच खोलीत अन्य भाविकांना दूर केल्यावर आणि ग्रंथांच्या पट्ट्यांना आदरपूर्वक स्थानबध्द करून श्री. मुदलीयार यांनी हार, फुले आणि मिठाई देऊन इंद्रदेव महाराजांचा सन्मान केला आणि काही दक्षिणा पुजेच्या खडावावर ठेवून वाचनाला सिध्द झाले.



**Figure 14 अत्रि महर्षीद्वारा इंद्रदेव महाराजजींचा गौरव करताना नाडीवाचक मुदलियार व राजन**

महाराज बराच वेळ विचारात गुंतलेले वाटले. नंतर डोळे मिटून कवड्यांचे दान टाकले व म्हणाले, "हे श्रध्देय अत्रीमहर्षी, माझ्या पाचव्या वर्षापासून धर्मग्रंथ साधनेला सुरूवात झाली. नवव्या वर्षी वेद आणि अनेक धर्मग्रंथ मला

मुखोद्गत झाले. आजवर माझ्याकडून प्राचीन सनातन धर्मातील कथाकथनातून व चर्चांतून ईश व जन सेवा घडत आली. हे इतक्या बालपणापासून विचारधन मला कसे प्राप्त झाले? याचे रहस्य काय?

पाने उलटली गेली आणि एका ताडपत्रावर लक्ष केंद्रित करून श्री. मुदलीयार वाचायला लागले. या तमिळ वाचनाच्यामधील अर्थ श्री. राजन यांच्या हिन्दी कथनाने आम्हाला कळू लागला. महर्षि म्हणाले, 'आज *अगस्त्य मुनींच्या सदयम किंवा शततारका या जन्म नक्षत्रचा दिवस - हे साधो, इस कलियुग में आपका जीवितकार्य तय है। कृष्ण परमात्मा की भक्ती, उपदेश का प्रसार तथा प्रचार का कार्य आपका जीवन कार्य है। या संदर्भात तुमच्या पुर्वजन्माची एक कथा आहे. ती अशी. पूर्वजन्मात आपण आपल्या गुरूंचे पट्टशिष्य होतात आणि आपण अध्यात्म आणि धर्मग्रंथांचे अध्ययन केले. तेव्हा एक शिष्य म्हणून आपणांस गुरूंना मिळणाऱ्या लोकप्रियतेची ईर्शा वाटून मला असे कधी प्राप्त होईल असे मनोमनी वाटले. त्यावेळी त्या शिष्याचा अल्पमृत्यू झाला. काही काळाने त्याच शिष्याने तुमच्या रूपात जन्म घेतला आहे म्हणूनच तुमच्या या अल्पवयात अशी प्रभावी वक्तृत्वाची देणगी आपणास मिळाली. आपणास त्या जन्मात जो मानसन्मान, लोकप्रियता मिळवण्याची इच्छा होती ती यापुढील काळात प्राप्त होईल. आपणाला भगवान विष्णूंची कृपा आहे म्हणून आपल्या नकळत आपण आपल्या भक्तांना वेगवेगळ्या रुपात दर्शन देता. मात्र भविष्यकाळात लोकप्रियते बरोबर लोकनिंदा व अपप्रचाराला ही सामोरे जावे लागणार आहे. या बाधांना दूर करायसाठी उपाय सुचवतो तो जरूर करावा. पंचमहाभूतातील वायूतत्वाच्या म्हणजेच कालहस्तीच्या मंदिरात ५१ दिवे लावावेत. नंतर अग्नी तत्वाचे मंदिर तिरुवन्नमलाईच्या मंदिरात ५१ दीप लाऊन अर्चना करावी. म्हणजे लोकापवादाचा संसर्ग होणार नाही.'

पुढचा प्रश्न विचारण्याच्या आधीच महर्षिंनी असे सुचवले या व्यक्तीला उद्देशून एकांतात उपदेश करावयाचा असल्याने यापुढील कथनात इतरांनी सहभागी होऊ नये. त्याप्रमाणे आम्ही तेथून उठून गेलो आणि पुढील प्रश्न एकांतात विचारले गेले आणि त्याबद्दल चर्चा करण्याचे आम्ही टाळले. नंतर पुन्हा आम्हाला आत बोलावण्यात आले. तेव्हा इंद्रदेव महाराज आनंदी होते. आम्ही त्यांचा निरोप घेण्याआधी त्यानी नाडीग्रंथांना अभिवादन, नमस्कार केला व आम्हाला सर्वांना आशिर्वाद देत आपले समाधान व्यक्त केले. कथन पार पडले याचे समाधान आम्हाला झाले. यापुढील काळात काही अन्य महर्षीचे कथन ऐकल्यावर आपल्याला आणखी मार्गदर्शन मिळायचा लाभ होईल. त्याबद्दल चर्चा योग्यवेळी कथन केली जाईल.

दि. १२ जून 2011चा ताजा कलम - वरील कथनानंतर लेखक शशिकांत ओक यांनी नाडीवाचकांना त्यांच्या केंद्रावर पोहोचवले. त्यानंतर अत्री महर्षींच्याकडे आजच्या कथनाच्या संदर्भात मला काही आदेश आहे का? अशी कवड्याटाकून विचारणा इच्छा व्यक्त केली. त्या वेळी श्री मुदलियारनी मला त्यादिवशी निघायच्या आधी अत्रीमहर्षींनी काय आदेश दिले ते सांगणारे नेमके पान काढून वर सांगितल्याप्रमाणे काय काय म्हटले होत ते सर्व परत वाचून दाखवले. पुढे महर्षी अत्री म्हणाले, 'आजच्या कथनाला तुला हजर राहण्याचा योग होता. कारण या पुढे नाडी ग्रंथांवर काव्य-शास्त्र-विनोद आदी कला क्षेत्रातून म्हणजे भाषेच्या म्हणजे काव्याच्या, व्याकरणाच्या अंगानी लेखन, नाट्यरुपांतर व सिनेक्षेत्रातून संधी येतील. त्यात धार्मिक क्षेत्रात भरीव कामगिरी करणाऱ्या व विष्णूची भक्ती करणाऱ्या श्रीमंताकडून मदत होईल. इंद्रदेव बाबांकडील महर्षींच्या कार्याचे ऐवज मिळतील. त्यावर तुला लेखन करायचे भाग्य आहे. त्यात तुला ए व एस नावाने सुरु होणाऱ्यां व्यक्तींची मदत होईल. त्यात साधारण एक वर्षात तुला उत्तरोत्तर यश येईल. अस्तु.

या कथनानंतर काही दिवसांनी म्हणजे जून ९ला श्री. माधवराव तिवाटणेंनी भृगुफलाची काही हस्तलिखित पाने नेट वरून पाठवली! त्यावर अभ्यासकार्याला सुरवात झाली आहे (लेखन काल - १२ जून २०११)

* दि 9-10 ऑक्टोबर 2012च्या रात्रीचा ताजा कलम – हा लेख वाचून प्रकाशनासाठी हातावेगळे करणे चालले होते. त्याआधी दुपारच्या वेळी मला श्री. अगस्त्य महात्म्य नावाची डॉ. अनिस सहस्त्रबुद्धेंकडून अगस्त्य महर्षींनी लिहवून घेतलेली पोथी पोस्टाने प्राप्त झाली होती. तिचे यथासांग वाचन अगस्त्यमहर्षींच्या जन्म नक्षत्रावर

करावे असे वाटून मी अनेक ग्रंथ व संदर्भ शोधले पण ते नक्षत्र मिळेना. आत्ता या लेखात, अत्री महर्षींनी सहज संदर्भ म्हणून आज अगस्त्य महर्षींच्या जन्मनक्षत्राचा दिवस म्हणजे सदयम किंवा शततारका हे नक्षत्र असल्याचे सुचवले ते वाचून मला हव्या त्या संदर्भावर मला कसे बोट धरून नेले गेले याचा प्रत्यय आणून दिला गेला.

धन्यवाद!

समाप्त.

---

## 25. अत्री जीव नाडीचे श्री. नवनाथ कुंभारांना आलेले दिव्य अनुभव -

निवेदक - प्रखर नाडीग्रंथ प्रेमी भक्तिमान श्री. नवनाथ कुंभार (मो. 9158996317)

माझी नाडीग्रंथ भविष्याची ओळख झाली ती विंग कमांडर श्री. शशिकांत ओक सरांच्या १९९८ च्या ग्रहांकित दिवाळी अंकातील "दैवी मार्गदर्शक नाडी ग्रंथ रचना" या लेखामुळे. कित्येक दिवस तो अंक माझ्या संग्रही होता, परंतु नाडीभविष्य म्हणजे कसली ती हाताची नाडी तपासून भविष्य सांगणार या गैरसमजातून तो लेख वाचनात नव्हता. नंतर मे २००४ च्या भालचंद्र मासिकात श्री. डॉ. श. वि. घुले, नशिक यांचा याच विषयाचा नाडीवाचक श्री. विजयकुमार स्वामी यांची मुलाखत असलेला लेख वाचण्यात आला. त्यात श्री. विजयकुमार यांचा संपर्कक्रमांक होता. तो वाचून माझी नाडी भविष्य पहाण्याची इच्छा अजूनच तीव्र झाली. त्याला कारणही तसेच होते.

आज मी वयाच्या २८ व्या वर्षी पहिल्याप्रथम अगस्ती नाडीचे अवलोकन केले त्याला जवळ-जवळ ६ वर्षे होत आली. या काळात महर्षींनी दिलेले उपाय चालू ठेवले. त्यानुसार त्यांनी वर्तवलेली भविष्येही तंतोतंत खरी ठरली. अनेक लोकांना माझे अनुभव सांगून त्यांनाही अडचणीत मार्गदर्शन करून नाडीपट्टीचा अनुभव घेण्यास सांगितले. गावातील बऱ्याच लोकांनी अगस्ती नाडीचे अवलोकन केलेले आहे. त्याबाबत ते समाधानीही आहेत. फारच अडचणीच्या काळात महर्षी अत्रींच्या जीवनाडीचे करावे तितके कौतुक अपुरे आहे. कुणाला कुणाला त्यांनी कुठलीही दक्षिणा न घेता मार्गदर्शन केलेले आहे. माझ्या कंपनीतील सहकारी मित्राचा मित्र घरातून अचानक बेपत्ता झाला होता. त्याचे आईवडिल अतिशय चिंतेत होते. एकच मुलगा तो ही बेपत्ता असं म्हटल्यावर कुठल्या आईवडिलांना गप्प बसवेल. अनेक उपाय झाले परंतु पत्ता काय लागत नव्हता. मला एकदा त्याने याबद्दल विचारले असता मी सरळ अत्रिजीव नाडीचा अनुभव घेण्यास सांगितले तसे त्यानी ईश्वरन् यांच्याशी संपर्क साधला. फक्त तीनच प्रश्नात त्यांनी हा महत्त्वाचा प्रश्न निकाली काढला होता. मुलाच्या वयाइतके दिवे कुलदेवतेस लावण्यास सांगुन ४८ दिवसांच्या आत तो परत येईल असे सांगितले त्यानुसार तो परत आलादेखील.

### भाग 1 :-- अत्री जीवनाडीतील ग्रामदेवतेबद्दल आलेला दिव्य अनुभव

काटेबारसची यात्रा



**Figure 15 जुने शिवमंदिर व काट्यांचा बिछाना**

२८ फेब्रुवारी २००६. जीवनातील एक संस्मरणीय दिवस. नाडीसंहितेच्या अत्री जीव नाडीच्या माध्यमातून निरेपासून 5- 6किमी दूरच्या आमच्या गुळुंचे गावच्या श्रीज्योतिर्लिंगाच्या आगळ्या-वेगळ्या "काटेबारस" यात्रेबद्दल ऐतिहासिक व पौराणिक माहितीसाठी जिज्ञासू वृत्तीने काढायचा प्रयत्न चालु केलेला. २८ फेब्रुवारीच्या अगोदरही आम्ही जीवनाडीच्यासाठी वेळ ठरवलेली, परंतु महर्षींच्या आदेशाप्रमाणे दहा दिवसांनी पुन्हा येण्यासाठी नाडी वाचकांनी सांगितले, त्याप्रमाणे ठरलेल्या दिवशी दुपारी ३.३० ला मी व माझ्याबरोबर दोन मित्र गेलेलो. तसे पाहिले तर आम्ही सर्वजण या क्षेत्रात नवीनच. तेथे गेल्यावर नाडीकेंद्रातील नाडी वाचकांनी या अत्री जीवनाडी बद्दलची माहिती सांगितली व कवड्यांचे दान टाकण्यास सांगितले. हे दान टाकण्यापूर्वी कुलदेवतेचे नामस्मरण व इष्टदेवतेचे नामस्मरण करण्यास सांगितले. त्यानुसार मी श्रीतुळजाभवानी माता व श्रीज्योतिर्लिंगाचे स्मरण करुण दान टाकले. त्यानुसार जे दान पडले त्याप्रमाणे जी पट्टी निघाली ती वाचण्यास प्रारंभ केला. मला प्रथम तुमचा प्रश्न काय आहे असे

विचारल्यानंतर मी आमच्या 'काटेबारस 'यात्रेबद्दलचा प्रश्न विचारला असता जीवनाडीतील पट्टीत महर्षि अत्री व माता अनसूया यांचा जो संवाद झाला तो पुढीलप्रमाणे:-

"आज आपल्यापुढे फारच महत्वाचा माणूस प्रश्न घेऊन आलेला आहे. हा प्रश्न त्याचा वैयक्तिक नसून तो समाजकार्यासाठी हा प्रश्न घेऊन आलेला आहे. प्रश्न खूपच महत्वाचा आहे. माझ्याकडे येणारा प्रत्येक जण काही न काही प्रश्न आपल्या स्वार्थासाठी विचारतात पण हा धार्मिक सेवेचा प्रश्न आहे. त्याच्या मनात अजूनही खूप प्रश्न आहेत ते सर्व प्रश्न त्यांच्याकडून विचारुन घेण्याचा आदेश त्यांनी नाडी वाचकांनी दिला व त्या सर्व प्रश्नांची समाधानकारक उत्तरे देण्याचे आश्वासनही दिले. त्यानुसार मी माझ्याकडे असलेल्या सर्व प्रश्नांवर महर्षींनी माता अनसूयेस सांगितले की येथील श्रीज्योतीर्लिंगाचे जे देवस्थान आहे ते "स्वयंभू" असून त्याबद्दल जी माहिती यांनी विचारली आहे ती माहिती यांना त्यांच्याच गावातील ६९ वर्षाचा ब्राह्मण देईल. त्या ब्राह्मणाबद्दलची यथोचित माहितीही त्यांनी सांगितली, त्याच्या घराची वास्तूरचना सांगितली व त्या ब्राह्मणाकडे जाऊन त्यांना पान, सुपारी व वस्त्रदान करुन त्यांना हे सर्व प्रश्नांची माहिती विचारली असता तो जे उत्तर देईल ती उत्तरे तुमच्या प्रश्नांची उत्तरे असतील. ग्रामदेवता त्या ब्राह्मणावर प्रसन्न असल्याचे त्यांनी नमूद केले. यावर अनसूया मातेने महर्षींना प्रतिप्रश्न केला की, "स्वामी हे लोक तर आपल्याकडे आलेले आहेत, असे असताना आपण त्यांना दुसऱ्याकडे का पाठविता आहात?" महर्षींनी उत्तर दिले की, या देवस्थानाबद्दलची माहिती सांगण्याचा अधिकार फक्त त्या ब्राह्मणालाच आहे. माझ्या हातून हे काम होणार नाही. त्याच ब्राह्मणाला त्यांनी गाय देण्यास सांगितले. तसेच ग्रामदेवतेस गाय व बछडा सोडण्याची सूचनाही त्यांनी केली.

आमच्या पुढील प्रश्नाप्रमाणे त्यांनी मंदिर संकुल जीर्णोद्धाराच्या दृष्टीने काही सूचना दिल्या त्या अशा की, यापुढे हे फार मोठे मंदिर होणार असून आगामी काळात या मंदिरास यात्रेस जागतिक पातळीवर प्रसिद्धी मिळणार असून येथे येणाऱ्या प्रत्येक भाविकाचे कल्याण झाल्याशिवाय राहणार नाही. लवकरच या मंदिराच्या जीर्णोद्धाराचा शुभारंभ होणार असून या पुनर्निर्माणासाठी १०८ लोकांचे ट्रस्ट करुन तुम्ही येथे आलेले लोकही या ट्रस्टचे मेंबर होणार असल्याचे सूचित केले. याच पुनर्निर्माण कार्यासाठी महर्षींनी स्वतः पहिली देणगी होनाच्या रुपात (आताचे १०१/- रु) व पानसुपारी देणार असल्याचे सांगितले. तसेच या देवतेच्या वार्षिकोत्सवातही मोठ्या प्रमाणात वाढ होणार असल्याचे सांगून पूज्य महर्षी अत्री व माता अनसूया यांचा संवाद अंतर्धान पावला.

वरील प्रकारचा अनुभव हा एक दिव्य अनुभव असल्याने आम्हाला अतुलनीय आनंद झाला. जीवनाडीतील आदेशाप्रमाणे तेथील नाडीवाचकांनी आम्हांस पानसुपारी देणगी रु १०१/- श्रीफल, वस्त्र व फळे देऊन उत्तमरित्या आदरातिथ्य केले. अशा प्रकरचा आदेश नाडीवाचकांना पहिल्यांदाच आल्याचे नाडीकेंद्रचालक श्री. ईश्वरन् यांनी कबूल केले व या देवस्थानाला लवकरच भेट देण्याचे निश्चित केले व आम्हाला निरोप दिला.

या जीवनाडीबद्दल जेवढे लिहू तेवढे थोडेच आहे. ही घटना हृदयात साठवून ठेवताना आम्ही सर्वजण रोमांचित झालो होतो. अंगावर शहारे आल्याचे जाणवत होते. तर अत्यांनंदाने अश्रूंना फक्त वाट देण्याचेच उरले होते. नाडी महर्षींनी अशाप्रकारे केली आदरतिथ्य मनावर कायमस्वरुपी ठसा उमटवून गेले. हा दिव्य अनुभव लिहताना एक वेगळाच आनंद होत आहे. ग्रामदेवतेविषयीची धडपड व प्रेरणा यासाठी महर्षींनी कुठलीही दक्षिणा न स्विकारता आमचे काम हे समाजकार्य असल्याने या कामासाठी त्यांनीच प्रथम दिलेली देणगी या दैवी देणगी व्यतिरिक्त भौतिक स्वरुपातील कुठलीही देणगी श्रेष्ठ असू शकत नाही याचा आम्हाला प्रत्यय आला. यापाठीमागे आमच्या ग्रामदेवतेच्या अदृश्य आध्यात्मिक शक्तीची प्रचिती पुनः

आली. भाग 1 समाप्त.



**श्री राम संकुल, श्री गणपती, श्री विठ्ठल, रुक्मीणी व नंदी मुर्तीची स्थापना झालेवर**

Figure 27 महान श्रद्धवान श्री हिराभाई बुटाला सन 2007मधे पुण्यात झालेल्या नाडीग्रंथावरील अधिवेशनातील गौरवचिन्ह स्वीकारताना.

## भाग 2 :-- अत्री जीवनाडीतील ग्रामदेवतेबद्दल आलेला दिव्य अनुभव

चैत्र प्रतिपदा (गुढीपाडवा). साडेतीन मुहूर्तांपेकी एक मुहूर्त. याच दिवशी अत्रीजीव नाडीतील आदेशाप्रमाणे आम्ही सांगितलेल्या दर्शनाप्रमाणे गुळुंचे गावातील पूज्य ब्राह्मणाकडे गेलो. त्यानंतर महर्षींनी सांगितल्याप्रमाणे पान-सुपारी देऊन आम्हाला जे प्रश्न पडले होते ते त्यांना विचारले. त्यांनीही प्रश्नांची उत्तरे यथायोग्य दिली. जाण्यापूर्वी आम्ही महर्षींनी सांगितलेल्या वर्णानाची खात्री करुन घेतली होतीच. आम्ही जे प्रश्न ग्रामदेवतेविषयी विचारले ते पुढीलप्रमाणेः

१) या गावाच्या ग्रामदेवतेची काटेबारस यात्रा कधीपासून सुरु झाली?

साधारणतः सन १६७६ पासून म्हणजे जवळ-जवळ ३०० वर्षांपासून, छत्रपतींच्या काळापासून ही यात्रा सुरु झाल्याचे त्यांनी सांगितले. त्यास दुजोरा म्हणून त्यांचेकडे उपलब्ध असलेले २७७ एकर जमिनीचे बक्षिसपत्र व त्यावर असलेली तारीख कार्तिक शु. दशमी शके १६५१ दाखवले आणि या यात्रेची सुरुवात केली ति दांगट लोकांनी असे सांगितले.

२) अनेक ठिकाणी श्रीशंकराची यात्रा महाशिवरात्र किंवा श्रावण महिन्यात होत असते. परंतु या ठिकाणची यात्रा कार्तिक महिन्यात शुद्ध द्वादशी या तिथीला होत असते या तिथीचे महत्त्व काय?

हरि व हर यामधे भेद नाही. कार्तिक महिना हा श्रीविष्णू व श्रीशिव या दोघांनाही प्रिय आहे. याच महिन्यात वैष्णवांच्या महाएकादशी असतात. कार्तिक मास हा सर्व तीर्थ आणि यज्ञ यापेक्षा आधिक पवित्र असल्याचे स्कंद पुराणात म्हटले आहेत.

३) श्रीज्योतिर्लिंगाबरोबर इतर दैवतांचा संबंध काय?

या ठिकाणी श्री गंगामाता व श्री पार्वतीमाता यांचेही वास्तव्य आहे. त्यांचीही प्रतिके याठिकाणी आहेत. मंदिरात पूर्वीपासून १२ दिवस लोक उपासना करतात. पूर्वीपासून कीर्तन फक्त एकादशी दिवशी किन्हईचे हरिदास बुवा यांचे होते. त्यापुर्वी फक्त भजन होते. १९७४ साली याच ब्राह्मणांच्या कानात घटस्थापनेदिवशी अनाहत नाद एकू येऊ लागला आणि त्यानंतर त्यांनी सेवा करण्यास सुरुवात केली. १२ दिवसांच्या उपासना काळात श्रीज्योतिर्लिंगाचा छबिना निघतो. ठिकठिकाणी आरत्या होतात. त्यात प्रामुख्याने आतील गाभाऱ्यात श्रीशंकराची, मंडपात श्रीरामाची, श्रीगणपतीची, श्रीविठ्ठलाची, श्रीतुलसीमातेची, श्रीरामदासाची, श्रीदेवीची, श्रीतुकाईदेवीची, श्रीमारूतीची, श्रीबोल्हाईची, श्रीत्र्यंबकेश्वराची व नंतर मंत्रपुष्पांजली.

या बारा दिवसांच्या काळात रोज लघुरुद्र (अभिषेक) तसेच रोज झेंडूच्या फुलांची माळ अर्पण करण्यात येते. कलश ते लिंगापर्यंत. या झेंडूच्या माळांची सर्व फुले एकत्र केली जातात. व ती फुले ताटात घेऊन काटेबारस दिवशी श्रींच्या सोबत घालवीत नेतात. मानाच्या काठीला परत घेऊन आल्यानंतर बाभळीच्या काट्यांना ज्या ५ प्रदक्षिणा घालतात त्या पूर्ण झाल्यानंतर हे सर्व काटे मंत्रभारित होतात. व हीच फुले मागील वर्षाचा जो भस्म (काटे जाळून टाकल्यानंतर) आहे त्यात मिसळतात. भक्तगण काटेमोडवण करून आल्यानंतर जी विभुति गुरव टाकतो तेच हे भस्म.



**Figure 32 जीर्णोद्धार झाल्यावर दिसणारे नवे शिव मंदिर**

एक वर्ष उलटल्यानंतरही अजून जिर्णोद्धाराच्या कामाचा शुभारंभ काही होत नव्हता. आम्हीही अजून धीर सोडला नव्हता. या कामी पुन्हा काही आदेश येतो का ते पाहण्यासाठी दि २१/०८/२००७ महर्षींकडे गेलो. या जीर्णोद्धराच्याकामी कुठल्या राजकीय पक्षाची मदत होईल असा प्रश्न विचारला असता घड्याळाच्या चिह्नाच्या पक्षाची मदत होईल असे उत्तर आले. नंतचा प्रश्न होता तो ज्या लोकांनी यात्रेची सुरुवात केली त्याच्या माहितीसाठी विचारला. यावर कुंभाभिषेक केल्यानंतर याचे उत्तर आपोआप मिळेल असे उत्तर आले. ते लोकही परत येतील असेही सांगितले. पुढील प्रश्न होता तो भवानी तलवरीबद्दलचा, जी परदेशात म्युझियममध्ये आहे. त्यावरचे महर्षींचे उत्तर असे होते, छत्रपती शिवाजी महाराज हे महापुरुष या महाराष्ट्रात होऊन गेले. फार मोठे शौर्य त्यांनी

गाजविले. या शौर्याची आठवण म्हणून ही तलवार तेथेच राहिली पाहिजे. तलवार म्हणजे भवानीमातेचा आशिर्वाद आहे. छत्रपतींच्या नावाचा जगात प्रचार व प्रसार झाला पाहिजे. अशी भवानीमातेचीच इच्छा असून ती परत येणार नाही असे उत्तर आले. पुढचे दोन प्रश्न माझे वैयक्तिक स्वरूपाचे होते.

यानंतर बरोबर एक वर्षानंतर, ज्या लोकांचा या जीर्णोध्दराच्या कामाकडे कल होता त्यांच्याकडे सूत्रे गेली व त्यांच्या सहकार्याने काम जोरात सुरु झाले. २००८ सालच्या पहिल्याच सोमवारी जीर्णोद्धाराचा शुभारंभ झाला. याकरिता साधारणतः ५ कोटी ७५ लाख रुपयांचा आराखडा तयार करण्यात आला. प्रामुख्याने मंदिराच्या प्रवेशद्वाराचा परिसर, मंडपासह आतील परिसर व यात्रेचा मुख्य सोहळा पहाणेसाठीचे भव्य स्टेडियम याचा समावेश आहे. त्याप्रमाणे मंडपाचे काम पूर्णत्वास गेलेले असून स्टेडियमचे कामही जवळ-जवळ पूर्ण होण्याच्या मार्गावर आहे. कामात अजुनही छोट्या छोट्या तांत्रिक अडचणी येतात. परंतु बाबांच्या आशिर्वादाने त्याही दूर होतात.



**जग प्रसिद्ध यात्रा काटे बारस पाहण्यासाठी बांधलेले स्टेडीअम गुळुंचे**

Figure 16 **गुळूंचेमधील काटेबारस पहायला दुरवरून येणाऱ्या भाविकांसाठी नवे स्टेडियम**

२०१० च्या गुरुपौर्णिमेला मी व माझा मित्र श्री. शशिकांत निगडे कर्तव्याच्या जाणिवेतून गुरूंना वंदना करण्यासाठी गेलो होतो, माझ्या काही वैयक्तिक प्रश्नांची उकल मला करुन घ्यायची होती. त्याप्रमाणे महर्षी अगस्तींना वंदन करुन अत्री जीवनाडी पहाण्यास सुरुवात केली. मे २००९ च्या आदेशाप्रमाणे मी गणेशरक्षा पूजा करुन घेतली होती, त्याचे फळ म्हणून श्रीशंकराचे दर्शनाचा योग सांगितला होता. त्याप्रमाणे तसा योग आलाही. तोच प्रश्न महर्षींना केला, महर्षी त्यावेळेस तिरुवण्णामलै नामक तीर्थक्षेत्राच्या प्रदक्षिणामार्गात होते. या प्रश्नाने त्यांना आनंद

झाला व त्यांनी सांगितले की, "आज या ठिकाणी अनेक लोक भगवान शंकराचे आशिर्वाद घेण्यासाठी जमलेले आहेत. अनेक ऋषीमुनी ही याठिकाणी आलेले आहेत. रमण महर्षींचा आश्रमही याठिकाणी आहे. भगवान शंकराचे वास्तव्य या ठिकाणी आहे ते ज्योतिस्वरुप. त्यावेळेस आपला प्रश्न पोहचतो. मला आनंद वाटतोय की कलियुगातही असा प्रश्न विचारणारे लोक आहेत. आपल्याला यापुढेही भगवंताचे दर्शन होणार आहे. भगवान शंकराचे आशिर्वाद यापुढेही आपल्याल मिळणार आहेत. नंतरचे प्रश्न खाजगी स्वरुपाचे होते. शेवटचा प्रश्न विचारल्यानंतर मात्र आदेश आला तो श्री. ईश्वरन् यांना, की त्यांना व मला मिळून एक मंगलकार्य आज करायचे आहे. आम्ही लोकांनी जे जीर्णोद्धराचे कार्य हाती घेतले आहे त्या कार्यासाठी रु. ५,०००/- ची देणगी आपल्याकडे आलेल्या व्यक्तीला देऊन त्याचाही गौरव वाढवायचा आहे. त्याप्रमाणे श्री. ईश्वरन् यांनी ताबडतोब खिशातून ५ हजार रुपये काढून माझ्याकडे सुपूर्द केले. मीही लगेच ते दुसऱ्या दिवशी सोमवारच होता, त्यादिवशी गावातील या कामी पुढाकार असलेल्या व्यक्तीकडे घडलेल्या घटनेसह सांगून सुपूर्द केले. त्यानंतर दुसऱ्याच आठवड्यात दर्शनाला गेलो असता मा. सुप्रिया सुळे व श्री. अजितदादा पवार यांच्या फंडातून याच कामासाठी १० लक्ष रु. चा फंड उपलब्ध झाल्याचे समजले. यावरून महर्षींची किती कृपा आमच्यावर आहे ते लक्षात येते. सध्या येथील कामेही वेगात सुरु आहेत. काही तांत्रिक अडचणींना त्यांच्या आदेशाप्रमाणे काही उपाय करण्याचे बाकी आहे. परंतु नजिकच्या काळात तेही आम्ही पूर्ण करणार अशी खात्री आहे.

## 26. नाडी ग्रंथ प्रेमींचे त्रिशूल

### अत्री महर्षींची लाडकी व्यक्तिमत्वे -

**1) अतूट श्रद्धाभावी शिव प्रसाद बोडस –**

"ये तू माझ्या स्थानाशी. मी तुला काही देणार आहे." इति अत्रि महर्षी व माता अनुसुयेचा आदेश ऑगस्ट २००८ मिळाल्यामुळे शिव प्रसाद बोडसांची त्यानंतर तीन महिन्यांनी ऑक्टोबरमधील हिमालय यात्रा एका अनोख्या स्तरावर होणार याची त्यांना खात्री होती.

पंचकेदारेश्वराची यात्रा करून झाल्यावर त्याचे अन्य मित्र पुण्याला परतले अणि शिव प्रसाद पुन्हा 'चमोली' या गावावरून माता अनुसूयेच्या मंदिरापाशी पोहोचले. त्या मंदिरापासून अत्रि गुफा ५-६ किमी दूर व उंचावर असल्याचे कळल्याने त्यांनी एक गाईड बरोबर घेतला होता. पट्टीचे ट्रॅकर असलेल्या बोडसांना चढण नवे नव्हते. पण या मार्गावर जरा जास्तच दमछाक होत होती. कारण वाटेत एका अत्यंत अरुंद घळीतून जाताना ओणवे सरपटत जावे लागले होते. तेंव्हां त्यांना काहीतरी अदभूत होणार याची तीव्रतेने जाणीव झाली. पुढे अत्री महर्षींचे स्थान आले. त्यांची मूर्ती अर्धी जमिनीत गाडलेल्या अवस्थेत पाहिली. गाईड शिवाय तेथे कोणीच नव्हते. काही अनोखे घडेल असे वाटून ते रात्रभर तेथे राहिले. पहाट झाली. काहीच घडले नाही म्हणून एक दिवस जास्त थांबण्याचे त्यांनी ठरवले. तरीपण काहीच घडले नाही. अत्री महर्षी काहीतरी देणार अशी दृढ भावना असूनही काहीच घडले नाही. शेवटी त्यांनी बद्रीनाथला परतताना वाटेत एका मोटरगाडीत दोन वयस्कर व्यक्तींची गाठ पडली. बोलण्याबोलण्यातून तोंडओळख झाली. बद्रिनाथच्या मंदिरापाशी, 'कुठे एकटे राहाता, रहा आमच्या बरोबर' म्हणून आग्रह झाला व बोडसांची त्यांच्या बरोबर वर्णी लागली. पंचतारांकित, शाही राहण्याची सोय बद्रिनाथाचे दोन फुटावरून दर्शन, जेष्ठपुजाऱ्यांच्या घरी देवाला वाहिलेल्या नैवेद्याचे ताट, बोडसांना मिळण्याचा मान असा स्वप्नातही अपेक्षा नसताना मिळालेला यजमानपदाचा सन्मानपुर्वक मान सर्व त्यांना भारावून टाकणारे होते. बोडस विचारात पडले. वाटेत सहज भेटलेले ते लोक कोण होते बोडसांचे. कोणीही नाही. नंतर नीट चौकशी करता कळले की त्यांच्यापैकी एक होते युपी सरकारच्या ऑडिट डिपार्टमेंटचे प्रमुख व दुसरे होते केदारनाथ मंदिराचे प्रमुख पण निवृत्त पुजारी. त्यांच्यामुळे मिळालेल्या आदरातिथ्याने भारावून गेलेले बोडस परतले पुण्यात.

अत्रींच्या नाडी केंद्रात आशीर्वादासाठी कवड्यांचे दान त्यांनी टाकले तेंव्हा माता व महर्षी म्हणाले, 'काय कसा काय वाटला पाहुणचार? अरे मी काय देणार गुप्तावस्थेतून! पण तुला देण्याची परस्पर व्यवस्था आम्ही लावू शकतो याची चुणुक तुला मिळाली. या प्रमाणे काहींना प्रेरणा देऊन किंवा काहींना वेळीच कुकर्मापासून परावृत्त करून कर्म सिद्धांताची सांगड आम्ही घालतो. अवघड असते पण शिवाच्या आज्ञेबाहेर काय आहे? नाही का शिव प्रसाद?'

2) **<u>एक अजब रसायन</u>** - विजय सबनीस

अत्यंतिक श्रद्धा, प्रगाढ भक्तिभाव आणि तत्परतेने महर्षींनी दिलेल्या आदेशांचे तंतोतंत पालन या गुणांचा समुच्चय म्हणजे विजय सबनीस होत. शिवाय समर्थ उद्योजक, व्यवसायिक फायनान्सशियल सल्लागार, हे एक अजब रसायनच म्हणावे लागेल.

गोव्यातील शांता दुर्गा त्यांची कुलस्वामिनी. मराठी माणसाला अभिमान वाटेल अशी फार महत्वाची घटना त्यांच्या सोबत घडली. तमिळनाडूत जाऊन त्यांना विविध धार्मिक पूजा-अर्चा करवून घेऊन त्यांच्या सारख्या एका गैर तमिळ व्यक्तीच्या हातात अत्री जीवनाडीच्या ताडपट्ट्या सुपुर्त केल्या गेल्या. त्यांनी तितक्याच मोठेपणाने त्या श्री. वैद्यनाथन या सुयोग्य नाडीवाचक तज्ज्ञाच्या हाती सोपवून त्या ताडपट्ट्यातील तमिळकथन लोकोपयोगी व्हावे याची

काळजी घेतली आहे. असे हे विजयजी अत्रि महर्षींच्या जीव नाडीला वाहून घेतलेले. अनेकोअनेक घटनांचे व अदभूत कथनांचे भांडार म्हणजे विजय सबनीस!

3) **एक प्रचंड उत्साहमुर्ती -** श्री. उमेश गोखले –

विनम्र, श्रद्धावंत व कार्यकुशल उमेशजींनी कोल्हापुरातील एक औलिया व्यक्ती म्हणून मान्यता पावलेल्या सचिनमहाराजांच्या आदेशानुसार व महर्षी अत्री व माता अनसूया यांच्या आशीर्वादाने कोल्हापुरात अगस्त्यबोहर नाडी केंद्र स्थापनेचा पाया भरला.

राजारामपुरीतील नाडी केंद्र सदैव भरलेले असते. श्री. वैद्यनाथन यांच्या बरोबर अत्री जीवनाडीचे महिन्यातून काही दिवस आगमन झाले की त्यांच्या भेटीला गर्दीकरून येणाऱ्या व्यक्तिंची सोय लावायचे जिकीरीचे काम उमेशजींनाच जमते. त्यांच्या प्रेरणेने अत्रींच्या मार्गदर्शनातून अनेकांच्या जीवनाला आकार मिळाला. त्याचे श्रेय अनेकजण त्यांना देतात.

शब्दांकन – शशिकांत ओक

---

## 24 . नाडीग्रंथांवरील अभिनव विलक्षण किस्से १ - १७ डिसेंबर २००९

स्थळ - श्री. ईश्वरन यांचे डहाणूकर कॉलनीतील केंद्र
त्यांच्या केंद्राचा वर्धापनदिवस ते दरवर्षी १७ डिसेंबरला हवन व गणेशयागाच्या सोहळ्याने संपन्न करतात. महाप्रसाद नंतर गरजूंना वस्त्रदान वगैरे कार्यक्रम संपल्यावर यावर्षी जे घडले ते विलक्षण म्हणावे लागेल.

त्याचे असे झाले की पिंपरी-चिंचवड भागातील श्री केबल टीव्हीवर या कार्यक्रमाचा भाग वेळोवेळी दाखवला जातो. त्याचे संचालक श्री. प्रवीण येलमार आपली टीम घेऊन दरवेळी हजर असतात तसे ते यावेळी ही आले होते. सर्व लोक पांगल्यावर आम्ही काही जण गप्पा मारत होतो. त्यावेळी मला अचानक आठवले की नुकतीच मी दक्षिण भारताची सफर संपवून परतताना विंग कमांडर (आता ग्रुप कॅप्टन) राकेश नंदानी मला एक ताड़पत्रावरील लिखाणाचे पॅकेट नाडीग्रंथांचा अभ्यास करायला मदत म्हणून आवर्जून हाती दिले होते. पट्टया नाडी ग्रंथांच्याच आहेत की आणखी कशाच्या त्याचा शोध घ्यावा व कळवावे. असे त्याने मला ते सुपूर्त करताना म्हटले होते.

घरून निघताना मी लक्षात ठेऊन त्या पॅकेटमधील पट्ट्यांना ओवलेली नाडी सोडवून त्यातली पटकन निघेल अशी वरचीच एक पट्टी सॅम्पल म्हणून कागदात अलगद गुंडाळून बरोबर घेतली होती. कार्यक्रमानंतर श्री केबलच्या प्रवीण येलमारांनी, 'सर, आपण एक इंटरव्ह्यू द्यावा' असे सुचवले. मी तोपर्यंत बरोबर आणलेली ताडपट्टी काढून ईश्वरनजींच्या हाती दिली व त्यांच्या केंद्रातील नाडीवाचकाकडून त्यातील मजकूर वाचायला विनंती केली. त्यावर नाडीवाचक सेल्वमोहनन यांनी नाडीपट्टी हातात घेऊन मोठ्याने त्यातील मजकूर वाचायला सुरवात केली. थोडेसे थांबून त्यांनी सांगितले की ही नाडी ग्रंथाची पट्टी असून त्यात एका व्यक्तीचे जनरल कांडाचे कथन आहे. आमची उत्सुकता वाढली. नाडीवाचक सेल्वमोहननी ती पट्टी पुन्हा पहिल्यापासून वाचायला चालू केले, तेंव्हा श्री. ईश्वरन त्या पट्टीतील तमिळ मजकुराचा मराठीत अनुवाद करून सांगत होते.

त्यात त्या व्यक्तीची जन्मदिनांकाची नोंद अशी होती - सिद्धार्थी संवत्सर, वैकासी मासम्, तमिल तिथी-२२, सित्तरै नक्षत्रम्, कन्नी रासी, मेष लग्नम्. मंगलवार. नवग्रहांची मांडणी अशी सांगितली होती – मेष लग्नम तेथे शुकिरन व मंगल, माडत्तील (वृषभेत) सुर्य, मिधुनम्मत्तिल पुधम् (बुध), कर्काटकात्तील अरसन(गुरु), सिम्मत्तील राघूम् (राहू) व शनी, कन्नीत्तिल तिंगल (चंद्र), कुंबमत्तिल केतुम.

आपल्या सध्याच्या कॅलेंडरप्रमाणे तो दिवस सांगताना मोहनन म्हणाले, सिद्धार्थी संवत्सर म्हणजे (सन १९७९-१९८०), त्या मधील वैशाख महिन्यात (१५ मे ते १५ जून पर्यंत) तमिळ तिथी २२, साधारण ६ किंवा ७ जून १९७९ ही तारीख असावी. लगेच मी माझ्या मोबाईलवर सन १९७९च्या जूनच्या ६ तारखेला 'बुधवार' असल्याचे लक्षात आणुन दिले. त्यावर सेल्वमोहनन म्हणाले, 'बरोबरच आहे. सुर्य जेथे आहे त्यावरून ६ तारखेच्या मध्यरात्रीनंतर पर्यंतच्या काळातला हा जन्मला असावा. म्हणजेच भारतीय कालमापनाप्रमाणे सुर्योदयापासून सुर्योदयपर्यंत वार मंगळवार असेल'. त्यापुढे श्री ईश्वरन यांनी म्हटले, 'ज्या दिवशी या पट्टीचे वाचन होईल त्यावेळी तो व्यक्ती ते ऐकायला प्रत्यक्ष हजर नसेल. त्या दिवशी त्याच्या आयुष्याची ३०वर्षे ६ महिने व ११ दिवस झाले असतील'.

**त्यावरून आम्ही गणित घातले ते असे -**

| | दिवस – महिने - साल |
|---|---|
| **जन्मदिनांक –** | **०६ - ०६ - १९७९** |
| **आयुष्य -** | **११ - ०६ - ३०** |
| **नाडीपट्टी वाचनाची तारीख –** | **१७ - १२ - २००९** |

**<u>आश्चर्यकारकपणे नेमक्या त्याच तारीखेला त्या व्यक्तीच्या अपरोक्ष हे वाचन बरोब्बर दिनांक १७ डिसेंबर २००९ लाच होत होते.</u>**

मागे वळून विचार करता - या पट्टीचे गूढ अधिक वाटू लागले.

विंग कमांडर राकेश नंदा मला सहज नाडीपट्ट्चे पॅकेट देतो काय!

मिळाल्याच्या दुसऱ्या दिवशी आठवणीने मी त्यातील नेमकी तीचपट्टी सहजपणे हाती घेतो काय!

इतरांची नाडी पट्टी वाचायला नकार देणारे नाडीवाचक नेमके त्याच वाचनाला काहीही खळखळ न करता तयार होतात काय!

त्यातील मजकुराची वही बसल्या बैठकीला करून माझ्या हाती देतात काय!

आणलेल्या ताडपट्टीतील एका अज्ञात व्यक्तीच्या नाडी पट्टीवाचनाची निघालेली ती अचुक तारीख निघते काय!

शिवाय हे सर्व शूटींग होऊन ते लोकांसमोर सादर होते काय!

सर्व ऐकून उपस्थित थक्क झालो!!

त्यानंतर याच कथनावर आधारित चर्चेचे व्हीडीओ शूटिंग दिनांक 19 Dec 2009 ला प्रसारित झाले. आपल्यापैकी काहींनी ते पाहिले देखील असेल. त्या पट्टीचा स्कॅनफोटो तयार झाला. वही तयार झाली. त्याची सीडी नाडीग्रंथावरील कार्यशालेसाठी उत्सुकांना पहायला तयार ठेवली आहे.

या ठिकाणी नाडी ग्रंथांची एकांगीपणे टिंगल-टवाळीकरून नाडीपट्ट्यांना थोतांड म्हणून हिणवणाऱ्यांना ही पट्टी सत्यान्वेशण करायला उद्युक्त करेल अशी आशा वाटते.



Figure 31 **नवीन मंदिराचे गर्भगृह**

## 25. ब्रह्मर्षींची कहाणी महर्षींच्या मुखानी

.... ब्रह्मर्षी डॉ. प.वि. वर्तक यांच्या पंचाहत्तराव्या जन्मवर्षपूर्तीच्या सोहळ्याच्या निमित्ताने नाड़ी ग्रंथ भविष्यकर्ते अत्रि महर्षींनी या महान विभूतीसाठी काय लिहून ठेवले असेल याची उत्सुकता सर्वांना आहे....



Figure 34 हीच ती ताड पट्टी...

अत्रि जीव नाडीतील मार्गदर्शन - श्री. बाबुजी भागवतांच्या पुढाकाराने दि. 23 ऑक्टोबर 2007 साली थेरगाव चिंचवड येथील वसिष्ठ कौशिक नाडी केंद्रात डॉ. प.वि. वर्तकांसाठी अत्रि जीवनाडी पाहायचे ठरले. साधारण तासाभराच्या वाट पहाण्यानंतर आत बोलावले गेले. व्हीडिओ कॅमेरा व अन्य मांडामांड झाल्यानंतर प्रश्न विचारले गेले. काही कौटुंबिक होते. सुरवातीला प्रॉपर्टी पाडून नवी करण्याने लाभ होईल का या प्रश्नाचे उत्तर देताना अनुसूया अत्रींना म्हणते की नटराजाला नमन झाले. आज एक महत्वाची व्यक्ती माझ्या कथनाचा लाभ घेण्यास आली आहे. गुरूचा स्थान बदल झाला की 15 नोव्हेंबर 2007 नंतर ती पाडून नवी करायला घ्यावी. त्याआधी गाय व वासराचे दर्शन घेऊन त्यांना चारा घालावा. गुरुवारी दत्तांचा आशीर्वाद घ्यावा. पुढील प्रश्न होता संशोधनाच्या कार्याला राष्ट्रीय सन्मान मिळेल का पूर्वजन्माच्या पुंण्यामुळे मोक्षाचे अधिकारी असलेल्या या महान आत्म्याला त्यांनी केलेल्या - पुस्तके लेखन, भाषणे व अन्य समाजाकार्यामुळे लवकरच मानसन्मान घडेल. गौरव होईल. राजकीय मान्यवर ही येतील. इतकेच नव्हे मृत्यूनंतर तीन पिढ्या नाव काढतील. शेवटचा प्रश्न विचारे पर्यंत सूर्य अस्ताला जात होता. त्याचा - पक्षी कोटरांकडे परतायला लागलेत - असा सूचक उल्लेख करत तरीही एका घरगुती प्रश्नाचे उत्तर देऊन डॉ. प.वि. वर्तकांच्या ब्रह्मर्षीपदाचा मान राखत या जीव नाडीची सांगता अत्रीं व अनुसूया यांनी केली. त्यावेळी एका अत्यंत महान आत्म्याच्या नाडीभविष्य कथनासाठी उपस्थित राहिल्याचे समाधान उपस्थितांना लाभले.

संकलक - शशिकांत ओक.

## 27.अगत्यार जीव नाडीचे अनुभव



Figure 17 अगस्त्य महर्षींची कलापुर्ण मुर्ती

**(याठिकाणी मधुसूदन घाणेकरांनी सादर केलेले नाट्यरुपांतर घालावे,)**

एकदा श्री. हनुमत दासन यांच्याकडे एक मध्यम वयाचे ग्रहस्थ चिंताक्रांत मुद्रा घेऊन आले. म्हणाले, "माझा मुलगा मरीन इंजिनीयर आहे. तो सध्या नेदरलँडमधे शिपवर आहे. तेथे त्याला वरिष्ठांचा फार त्रास होत आहे. जीवे मारण्याच्या धमक्यांपर्यंत पाळी आली आहे. काही उपाय सुचवा."

हनुमत दासम यांनी अगत्यार जीव नाडीची पाने उलटून वाचनाला सुरवात केली. महर्षींनी त्याच्या कामाचे स्वरूप सांगितले, "त्या मुलाला हा त्रास गेले दोन वर्षांपासून होता. आता त्याच्या आयुष्याला धोका आहे. त्याने नोकरीचा राजिनामा द्यावा" अशी सध्याची माहिती सांगितली. ती ऐकून त्या ग्रहस्थांची खात्री झाली की ते आपल्या मुलाबद्दलच बोलत आहेत. पण नोकरीचा राजिनामा देण्याच्या आदेशाने त्यांचा गोंधळ झाला. ते म्हणाले, "ते कसे शक्य आहे? माझा मुलाला ही नोकरी करायला फार आवडते. इतक्या वर्षांनंतर पुढल्या काही महिन्यात तर त्याला चीफ इंजिनियरची बढती मिळणार आहे असे तो म्हणत होता."

दासन म्हणाले, "महर्षी म्हणतायत, त्याच्या वरिष्ठांना ते ठरवू दे."

चिंतेत पडलेले ग्रहस्थ म्हणाले, "विचारून सांगतो." काही तासात धापा टाकत परत आले व म्हणाले, "माफ करा. मगाशी बोलताना त्याला जीवे मारण्याच्या धोक्याविषयी पुढे काय ते राजिनाम्याच्या विषयांतरामुळे विचारायचा राहून गेले." त्यावर नाडी वाचून दासन म्हणाले, "महर्षी म्हणतात, ह्याच्या जिवाला का धोका आहे ते सांगतो. हा नोकरीला लागला तेंव्हा व्यवस्थित होता.पण नंतर कुसंगतीमुळे व मोहाला बळी पडल्याने स्मगलिंग करू लागला. त्यातून त्याने बराच पैसा व प्रॉपर्टी विकत घेतली. घरच्यांना ती नोकरीत घाम गाळून मिळवली असल्याचे तो अभिमानाने सांगत असे. पुढे त्याच्या वरिष्ठांना त्याच्या चलाखीची कल्पना आली. त्यांनी त्याच्या कडून फार मोठ्या रक्कमेची मागणी केली व ती पुरी न केल्यास त्याला मारून समुद्रात फेकून देण्याची धमकी दिली. "ते ऐकून हादरलेले ते ग्रहस्थ म्हणाले, "महर्षींनी यावर काही उपाय सांगावा."

महर्षी म्हणाले, "त्याने आधी त्याची गैरमार्गाने मिळवलेली सर्व रक्कम व प्रॉपर्टी वरिष्ठांना परत करावी. अशा कुकर्मातून मिळवलेल्या पैशातून काही दैवी उपाय करायला मी सांगणार नाही. त्याच्या कष्टाच्या कमाईतून त्याने आपल्या कुलदेवतेला पूजा व अर्चना करावी नंतर 'तिरुकडायूरला' अभिरामी अम्मन मंदिरात जाऊन दीप लावावा व तेथील कार्तिकेयाच्या मूर्तीला गुलाबाच्या फुलांचा हार घालावा. हे सगळे त्याला तेथून करता येणे शक्य नाही. त्याच्या ऐवजी ही कामे त्याच्या आईवडिलांनी आजच्या रात्रीच्या आत करावीत. अन्यथा त्याच्या जिवाला काहीही बरे-वाईट होऊ शकते. त्याची हमी मी घेऊ शकत नाही."

ते ऐकून त्याचे कुटुंब त्वरेने कामाला लागले. काही दिवसांनी ते ग्रहस्थ परत भेटावयास आले तेंव्हा त्यांच्या बरोबर त्यांचा मुलगा होता. तो म्हणाला, "माझ्या वरिष्ठांनी पैसे घ्यायला संपूर्णपणे नकार दिला. माझ्यावरील बालंट गेले व मला प्रमोशन पण मिळाले! शेवटी मी

गैरमार्गानी कमावलेली रक्कम भारतात परतल्यावर गोरगरिबांत वाटली! प्रॉपर्टी अनाथालयाला दान केली!" अशा तऱ्हेने महर्षींची कृपा झाल्याने धन्य वाटून पाया पडून ते लोक गेले!

महर्षींना कुकर्मांचा वाटणारा तिटकारा व चांगल्या जीवात्म्याबद्दलची कळकळ यातून दिसते.

एका जोडप्याला मुल नव्हते, तेंव्हा महर्षींनी सांगितलेले उपाय केले संतती झाली. पण त्याआधी दैवीउपाय करूनही संततीचा लाभ का झाला नाही याची काही कारणे सांगताना महर्षी म्हणाले,

'१) पूर्वी केलेल्या पूजा विधीपुर्वक व त्याच क्रमाने केल्या गेल्या नव्हत्या.

२) पुजाकरताना पैशाचे गणित मांडून फारच कोतेपणा केला तो नडला.

३) ज्या पुजाऱ्याने मंत्र म्हणून पूजा सांगितली त्याने गडबडगुंडा करून काम आटपले.

४) पुजा करते वेळी स्वच्छता व पावित्र्य पाळले गेले नाही. '

**(संपादक - यावरून असे सुचवावेसे वाटते की नाडी ग्रंथ भविष्य पाहून शांती-दीक्षेचे सोपस्कार करूनही योग्य तो परिणाम का झाला नसावा याची कारणे या कथनावरून आपापली शोधावीत.)**

एकदा एक जण श्री.दासन अगत्यार जीव नाडीपट्टीत पाहून जे सांगतात ते खरेच असते का? त्यातील ज्योतिष खरे होते का? त्यात सांगितलेल्या दैवी उपायांनी खराच काही उपयोग होतो का की सगळी बनवाबनवी आहे? असे प्रश्नांचे किडे वळवळत परीक्षा करायला आला. दासनना म्हणाला, "माझा असल्या गोष्टींवर विश्वास नाही. मी देवाला मानत नाही. या नाडी ग्रंथ भविष्यावर तर माझा बिलकुल विश्वास नाही. तरीही तुमच्या महर्षींची कसोटी घ्यावी व जमलेच तर माझ्या समस्येचे निराकरण करावे म्हणून मी इथे आलो आहे."

त्यावर दासन म्हणाले, "जर तुझा नाडी ग्रंथ भविष्यावर विश्वास नाही. महर्षींच्या शब्दावर आस्था नाही तर इथे येऊन का वेळ व्यर्थ घालवतोस ?"

"इथून जर काही उपाय सापडले तर मी त्यांच्यावर विश्वास ठेवायला तय़ार आहे. म्हणूनच ते पहायला मी आलो आहे. तरी मला काय ते मार्गदर्शन करावे. कारण दीड महिन्यापूर्वी मला

कॅन्सर झाल्याचे कळले. तेंव्हापासून औषधपाणी चालू आहे. पण मी बरा होऊन वाचेन का? हे विचारायला आलो आहे."

"जर तुला उपाय हवे असतील तर अगस्ती महर्षी जे करायला सांगतील त्यांच्या वर संपूर्ण विश्वास हवा." त्यावर तो म्हणाला, "हो हो मी विश्वास ठेवेन."

दासन म्हणाले, "तू माझ्या समाधानासाठी तोंड देखले म्हणून मला काय उपयोग? मी फक्त महर्षींच्या शब्दांना कथन करणारा नाडीवाचक आहे. ते काय म्हणतात, ते मी सांगेन ते तुला ऐकले पाहिजे."

"हो पण माझी एक अट आहे की मी उपाय वगैरे करणार नाही. पण मला बरे करा अशी माझी विनंती आहे. " दासन त्याच्या उद्धटपणावर रागावले व विचार करु लागले की महर्षींनी सुचवलेले उपाय याला सांगावेत तरी कसे?

"बर बघतो ते काय म्हणतात ते". असे म्हणून दासन वाचायला लागले.

"एक व्यक्ती राजा रामचंद्रांचे नाव घेऊन देशावर राज्य करण्याच्या इराद्याने उडी घेत आहे. अयोध्या नगरीतील मंदीर बांधण्याच्या आवेशाने काही दारुड्या, मवाली, पैसे चारून जमवलेल्या लोकांना हाताशी धरून लोकांना बहकवले जात आहे. असत्याची कास धरणारे देशावर राज्य करत आहेत. आपल्या जवळच्या नातलगांना धडधाकट असूनही रोगी आहोत असे म्हणून त्यांच्या नावाची मालमत्ता गिळंकृत करण्याची चाल खेळली जात आहे. फसवले जात आहे."

दासनांच्या लक्षात आले की मजकूर तुटक व असंबंद्ध असून समोर बसलेल्याच्या संदर्भात हा लागू नाही. म्हणून त्यांनी त्याला पुन्हा कधीतरी ये म्हणून कटवला. जाताना तो म्हणाला, "पाहिलेत, मी म्हटले नाही असे बाष्कळ काहीतरी तुम्ही सांगता भविष्य म्हणून. बर मग मी उद्या येतो. "

दुसऱ्या दिवशी...

कालच्या वाचनावर भाष्य करताना महर्षी म्हणाले, "काल मी जे म्हटले की रामाच्या नावाचा बहुरुपी देशावर राज्य करू इच्छितो तो म्हणजे 'एन टी रामाराव'. ज्याने रामाचे रोल सिनेमात केले व तेलगू देसम नावाची पार्टी काढली आहे. उद्याच्या पेपरात ती बातमी वाचायला मिळेल. पुढे मी रामजन्मभूमी वादाविषयी बोललो. तिसरी गोष्ट होती जो तुझ्या समोर बसला होता त्याच्या बद्दल. तू माझा वाचक असूनही तुला माझे शब्द कळले नाही. त्या समोर बसलेल्याला

कॅन्सर वगैरे काही झालेला नाही. घरच्यांची सहानुभूती मिळवणे व आपल्या प्रेमपात्राच्या नावावर प्रॉपर्टी करायच्या उद्देशाने ही त्याची चाल आहे. पण मला फसवून त्याला काय मिळणार?

हे खडे बोल ऐकून ती व्यक्ती थोडी वरमेल असे दासनना वाटले. ते पुढे वाचून म्हणाले, “माझ्या भविष्य कथनाची सत्व परीक्षा घ्यायला हा देवावर विश्वास नसलेला आला आहे. नाडीवाचका, माझ्या कथनावर विश्वास ठेव की हा काही काळाने पुन्हा माझ्याकडे येणार आहे! विचार काय कारण? त्या वेळी त्याला तोच रोग खरोखरच झाला असेल. जो रोग त्याने सध्या खोटेपणाने झाल्याचे पसरवले आहे.

हे सर्व वाचून श्री.हनुमत दासना वाटले आता तरी हे ऐकून तो महर्षींची आपल्या कुकर्माबद्दल क्षमा मागेल. पण झाले उलटेच. तो उर्मटपणाने म्हणाला, “हे सगळे भविष्य कथन मी खोटे ठरवीन. आणि उठून चालता झाला!”

तीन महिन्यानंतर...

एक दिवस एका माणसाला दोन जण बखोट्याला धरून आणताना दिसले. त्याला चालता येणे शक्य नव्हते. विचारपूस करता त्यापैकी एक म्हणाला, “याना पॅरॅलेसिसचा अटॅक आला आहे. त्यांना धड बोलताही येत नाही. म्हणून त्यांनी एका चिठ्ठीवरील मजकूर वाचून दाखवला. “अगस्त्य महर्षींनी पुर्वी सांगितलेले कथन अगदी सत्य झाले.

“मग मी आता काय करू?” दासननी विचारले. “आता काही तरी करून यांना वाचवा अशी विनंती आहे”. दासन विचारात पडले. पट्टया काढून वाचायला लागले. महर्षी त्यात म्हणाले, “हा आलेला माणूस तोच आहे, ज्याने कॅन्सर झाल्याचे खोटे सांगितले होते. आता त्याला पोटातला ट्युमर झाला आहे. त्याची ही प्राथमिक अवस्था आहे व माझ्याकडे बरे होण्याच्या उद्देशाने आला आहे. म्हणून मी त्याला एक औषध सांगतो त्याने तो बरा होईल. ती जडीबूटी कोणती, ते औषध बनवायची कृती व डोस कसा घ्यायचा ते ही सांगेन!” महर्षी पुढे म्हणाले, “याने आपल्या भावाबहिणींची मालमत्ता हडप करण्याचा घाट घातला होता. पुर्वीच हा माझे आशीर्वाद घेऊन गेला असता व कुकर्मे केली नसती तर ही वेळ त्याच्यावर आली नसती. बर असो. ह्या जडीबूटीच्या झाडाचा शोध सदुरगिरीपर्वतावर[2] घ्यावा. सांगितलेले औषध काटेकोरपणे बनवून घ्यावे. ”

त्यानंतर त्याने ते औषध घेतले व पॅरॅलेसिस व ट्यूमर मधून बरा झाला व निरोगी जीवन जगू लागला. महर्षींच्या लेखी विश्वास ठेवणारा वा न ठेवणारा असा दुजा भाव नाही. शरण आलेल्या कोणावरही ते कृपा करु शकतात. हे या उदाहरणावरून दिसून येते.



**18 सदुरगिरीच्या संतानमहालिंगम मंदिराचा परिसर**

1 ‘नाडी ग्रंथ भविष्य- चला नवग्रह यात्रेला’ या मासिकाच्या आकारातील पुस्तकात (पाने- ५६, किंमत ५० रुपये) सविस्तर माहिती, महाराष्ट्रातील सर्व नाडी केंद्रांचे पत्ते, फोन नंबर, फी व अन्य माहिती दिलेली आहे. इच्छुकांनी लेखकाशी ०२०४००३७४६८ किंवा नितीन प्रकशन पुणे यांना फोन क्रमांक – ०२०२४४८३५१६//१७ वर संपर्क करावा.

2 प्रस्तूत लेखकास सदुर (चतुर – चार शिखरांच्या) गिरी पर्वतावर जाऊन संतान (चंदनाच्या झाडांच्या जंगलातील) महालिंगम शिवाच्या मंदिरात साधना करण्याचा आदेश भृगु ऋषींनी दिला

होता. त्याप्रमाणे १३-१४ किमी खडी चढाई पाय़ी चालून तेथे पोचता येते. १८ सिद्धांनी तप केल्याच्या गूहा व घबघबे, यामुळे आपण हिमायलाची यात्रा करत असल्याचा आनंद मिळतो. अनुष्ठान करू इच्छिणाऱ्यांनी जरूर भेट द्यावी असे स्थान आहे. हे ठिकाण मदुराईच्या दक्षिणेस १२० किमी व विरुडूनगर रेल्वेस्टेशनपासून ५०-६० किमी दूर आहे.

****************************************************************************************

## 28. ऋषी नेसन - फिरोज मिस्त्रीच्या घरी नाडीमहर्षींचे आगमन



**महर्षींनी फिरोजला ऋषी नेसन (तमिळमधे ऋषींचा आवडता किंवा प्रिय) अशी पदवी दिली आहे.**

'कॅन आय टॉक टू विंग कमांडर शशिकांत ओक, प्लीज? पाचगणीच्या संजीवन शिक्षण संस्थेच्या ऑफिसातील खणखणणाऱ्या फोनवर मी **'**हो' म्हणताच. विचारणा आली, 'आम्ही तुम्हाला पाचगणीला येऊन तात्काळ भेटू इच्छितो, केंव्हा येऊ?'

'उद्याच' मी उत्तरलो आणि दुसऱ्या दिवशी सकाळी 9 - 9.30 ला एका कारमधून 2 जण उतरले. एक वयस्क हातमिळवणी करत म्हणाले, 'मी फिरोज मिस्त्री व हा माझा मुलगा नॉश. पुण्याहून आलोय.' हाय करत हसऱ्या चेहऱ्याच्या तरुणाने हात जोडले. 'साला, तुमको मिलने के लिए कितना स्ट्रगल करना पडा!' म्हणत बेघडक शिवीच्या वाक्याने आपण टिपिकल पारशी आहोत असे दर्शवून त्यांनी अशा थाटात सुरुवात केली की जणु काही आम्ही एकमेकांना फार पुर्वी पासून ओळखत होतो! नंतरचे 3-4 तास ते बोलत होते अन् मी ऐकत होतो. विषय होता नाडी ग्रंथांवर एक डॉक्युमेंटरी तयार करण्याचा. 'ग्लोबल व्हिलेज' थीमवर नॉशला वैदीश्वरन कोईल खेड्यातील नाडी केंद्रे व मंदिरे आणि एकंदरीत नाडी केंद्रांची ओळख करून द्यायची होती. नॉशने यापुर्वी बनवलेल्या काही डॉक्युमेंट्रीजना ऑस्ट्रेलियन टीव्हीवर पारितोषके मिळाली होती. त्यामुळे तो यासाठी मला तज्ज्ञ म्हणून दक्षिणेत त्यांच्या बरोबर येण्यासाठी विनंती करायला आला होता. काम तातडीचे होते. मी त्यात सहभागी व्हायचे किंवा नाही

हा प्रश्नच नव्हता. पण मी ज्या ठिकाणी काम करत होतो त्यांच्या कामाच्या गरजा पुर्णकरून मला रजा मिळवणे शक्य दिसत नव्हते. शिवाय नॉशला ऑस्ट्रेलियाला परतीचे वेध लागले होते. इतक्या दूरवर जायचे तर रेल्वेचे रिझर्वेशन  मिळवायला अवधी हवा होता. 'थिंक ऎन्ड टेल फार्स्ट मॅन'... म्हणत ते परतले. रजा म्हटली की बॉसच्या कपाळावर आठ्या अन् 'नाही' असे छापील उत्तर मला हवाईदलातील प्रदीर्घ नोकरीत नेहमीचे झाले होते. इथे तर प्रकार वेगळा होता. माझ्यावर भिस्त ठेऊन काही गोष्टी आखल्या गेल्या होत्या. त्यामुळे रजा हा विषय बाद होता.

पण अशा काही घटना अदभूत घडल्या व पुढल्या 10 दिवसात मी 4 जानेवारी 2004 ला फिरोजबरोबर चेन्नईला जाणाऱ्या ट्रेनमधे होतो! नॉश परदेशी गेला होता व फिल्म शूटिंगचे काम वडील फिरोजने अंगावर घेतले होते! चेन्नईत माझा



Figure 34 डॉ प.वि. वर्तक व होशियारपूरचे भृगुशास्त्री शामाचरण त्रिवेदी

हवाईदलातील सहकारी ग्रुप कॅप्टन (त्या वेळी विंग कमांडर) राकेश नंदा 'सर आपकी इजाजत हो तो मैं भी शामिल होना चाहता हूँ' असे म्हणून त्याने आपल्या कारमधे शूटींगच्या सामानासकट सोय केली व आम्ही वैदीश्वरन कोईलच्या वाटेवर निघालो होतो. जणू काही आमचा हा कार्यक्रम महर्षींनी खूप आधीपासून ठरवला होता!

आश्चर्य असे की आम्ही कष्टाने तयार केलेली ती प्रदीर्घ डॉक्युमेंटरी फिल्म नॉशला वेळेवर मिळाली नाही व ते काम तसेच राहिले. मात्र त्यानंतर आमची दोस्ती हळू हळू घट्ट होत गेली. त्या आमच्या शूटिंगच्या दरम्यान महर्षी भृगु नाडीत आम्हाला सदुरगिरीला जाण्यासाठी आदेश आला. अनेकांना विचारत विचारत शेवटी सदुरगिरी स्थानाचा पत्ता लागला. फिरोज, त्याचा भाऊ शहारुख व मी सदुरगिरीला पोहोचलो. स्थान किती दुर आहे माहित नाही, रस्ता माहित नाही, संपुर्ण जंगलातील वाट, विचारायला कोणी सापडत नाही आणि जो कोणी एक्का-दुक्का भेटे त्याला आमची भाषा आड येई. असा संकटाच्या वेळी एक पांढऱ्या रंगाचे श्वान आमच्या बरोबर बरोबर सारखे येऊ लागले. त्याच्या सोबतीने आम्हाला 10-12 किमीचा चढ, त्यात प्रचंड पाऊस, उफाणलेले ओढे, थंडीचा कडाका आदि समस्या सुखरूप पार करता आल्या. जणू काही महर्षींनी आमची परीक्षा पहायला व सोबतीला त्याला नेमले होते. त्या अनोळखी कुत्र्याशी प्रेमाने जवळीक साधण्यातून फिरोजचे कुत्र्यावरील प्रेम दिसून आले. त्याच्या बंगल्यातील जाडजूड 'जिमी' हा तर त्यांच्या घरचा सदस्यच झाला होता. असो.

एकदा एका वाचनात तुझ्या घरच्या सदस्याचे नुकतेच निधन झाले असे म्हटले गेले. फिरोज मनांत म्हणला, 'आता तर कोणी घरचे नातेवाईक गेल्याचे आठवत नाही'. मग हे कोण असावे? घरी पत्नीने जिमीची आठवण करून दिल्यावर, ज्या लाडक्या जिमीचे कालांतराने नुकतेच देहावसान झाले होते त्याची आठवण त्यांना झाली. 'अरे भाई, वुई हॅव लव्हड् जिमी मोअर दॅम अवर चिल्ड्रन' म्हणताना त्या दोघांना भडभडून आले होते. त्या जिमीची रक्षा घेऊन महर्षींनी त्याला दक्षिणेतील एका कालभैरवाच्या मंदिरात ती विसर्जित करायला सांगितले होते. ते त्याने मनोभावे केले. कालभैरवाचे वाहन 'श्वान' आहे हे फिरोजला तेथे गेल्यावर मुर्तीपाहून लक्षात आले. 'जिमीची तू केलेली सेवा तो तुझ्यापुढील जन्मात तुझा पुत्र होऊन तो फेडेल' असे फिरोजला सांगण्यात आले आहे.



**Figure 19 कालभैरव नाथाचे वाहन श्वान**

त्या नंतरच्या प्रदीर्घ मैत्रीत फिरोज व माझ्या संदर्भात अनेक थक्क करणाऱ्या घडामोडी झाल्या. मध्यंतरीच्या काळात फिरोज आणखी दोनवेळा सदुरगिरी चढून आला होता. त्यात त्याला अनेक गुहात साधना करणारे लोक भेटले. चिरंजीव नॉश हा कसलेला गिर्यारोहक आहे. तो भारतात आला की प्रथम हिमालयाच्या 18 हजार फुटावरील शिखरांवर चढायला जातो. नंतर घरी पुण्याला येतो. असा त्याचा खाक्या. एकदा नॉशबरोबर असताना फिरोझच्या चपला चोरीला गेल्या. त्या परत मिळायला नॉश कारणीभूत झाला. कारण तेथील वेगळ्या वाटेवरील गोरख(नाथांच्या) गुहेत तो एकटा गेला. त्याला तेथे त्या टाकून दिलेल्या अवस्थेत मिळाल्या. असो.



Figure 20 गुहेपाशी दीप प्रज्वलित करताना फिरोज

असेच एकदा नाडी रीडिंगमधे आले की आम्ही महर्षी तुझ्या घरी भेटीला येणार आहोत. आता प्रश्न असा होता की जे महर्षी फक्त नाडीपट्ट्यातून अस्तित्वात आहेत असा अनुभव येतो ते प्रत्यक्षात कसे येऊ शकणार? त्याचे उत्तर नंतर काही काळाने मिळाले. त्याचे असे झाले की शहनाझ नामक फिरोजच्या पत्नीने मोठ्या आनंदाने व कष्टाने ब्रह्मकमलाचे रोपटे त्यांच्या बंगल्यातील बागेत लावले होते. त्याला दरवर्षी विवक्षित काळात फुले येतात ती ही मध्यरात्रीच्या वेळी. एका वेळी फार फार तर 5-6 कळ्या येतात असा त्यांचा अनुभव. पण पावसाळ्याच्या दिवसात एकाच रात्री 18 कळ्या वेलीवर उमलायला आल्या नंतर आणखी 4 अशा 22 फुलांचा त्या दिवशी फुलोरा होता. नाडीग्रंथांतील 'आम्ही तुझ्या घरी भेटीला येणार आहोत' याची शहनाझला आठवण झाली व तिने फिरोजला

Figure 41 सद्गु



नाडीशास्त्री शिवषण्मुगम व अन्य नाडीवाचकांना घरी बोलावले. मध्यरात्री त्या फुलांच्या बहर, रंग व सुगंध अवर्णनीय होता. त्या फुलांना महर्षींच मानून त्यांची साग्रसंगीत पुजा केली. त्यावेळी मुख्य नाडीशास्त्री शिवाने ध्यान करून सांगितल की 18 सिद्धर म्हणजे महर्षी तर आले आहेत पण त्याच बरोबर फिरोजचे व शहनाझचे मृत आई-वडीलही

या निमित्ताने आले होते. महर्षींनी आपला शब्द खरा केला व आमच्या पितरांना ही शांती दिली हे त्यांना मिळालेले मानसिक समाधान अपार होते. नंतर फिरोजला अन्य वाचनातून ‘आम्ही तुझ्या घरातील पाहुणचाराने तृप्त झालो’ असे कथन आले तेंव्हा फिरोजची पुन्हा खात्री झाली की त्या रात्री ब्रह्मफुलांच्या रुपाने नाडी महर्षींच आले होते.

---

## 29.नाडीग्रंथांवरील अभिनव विलक्षण किस्से - किस्सा श्रीनगरच्या

*ओंम श्री शुक उवाच, भारतवर्षे एवम् गतिकाले को योग तस्य किंम फलम ओं श्री. भृगु उवाच एवम ग्रहगति काले मनोरथ इति योग प्रभावे परमवचा, (मनोरथ या नावाच्या योगावर)) नंदवेद नंद९, वेद ४ (म्हणजेच ४९ व्यावर्षी) शशीकान्त या पितृ ज(नार्दन?) सत(लज)व्यास नदी मध्ये(दोआबात) चंचलपुरी, (होशियारपुरचे भृगुसंहितेतील नाव) चैत्रमासे (महिन्याच्या) तीज(तृतिया) – मंगळ(वारी) आज म्हणजेच दि. ३१ मार्च १९९८ ,हा जातक हे कथन ऐकायचा योग आहे. आदी आदी...*
*ते ऐकून मला धक्का बसला*

काश्मीर - श्रीनगरचा विमानतळ. मार्चचा महिना. दूर दूर पीरपंजालच्या पहाड्यांवर बर्फांचे साम्राज्य. हवेत थंडीची शिरशिरी. आधी पडलेल्या बर्फाचे थिजून घट्ट झालेले अस्ताव्यस्त ढीग. दुतर्फा रस्त्यावरील सफेदा झाडांचे खराटे झालेले. चिनारांच्या झाडाला हिरवे कोंभ निघालेले. गुलाब झुपक्यांनी येण्यासाठी कामाला लागलेले, सफरचंदांचे घोसले अजून आंबट हिरवे.

आमचा थंडीचा युनिफॉर्म, त्यावर कोटपरका नावाचा बोजड पण गरमागरम ओव्हरकोट. दरवर्षाचे हवाईदलाचे जीवघेणे एक्सरसाईज होऊन गेलेले.

आमच्या अकौंट्स सेक्शनमधे फायनान्शियल वर्षाच्या शेवटचे हिशोब जुळवण्यात कर्मचारी रंगलेले. दरमहा प्रमाणे करोडो रुपये वेतनाच्या वाटपासाठी आणून ठेवलेले. मी मंथ एन्डचे कॅश चेकिंगसाठी सर्व तयारीने बॉसची वाट पहात तयार. बुढा अब्दुल चपरासी नेहमीच्या प्रमाणे गरमागरम चहा उर्फ केहवा बनवायच्या कामाला लागलेला. सकाळी आठचा सुमार मी माझ्या ऑफिसमधे कामात गुतलेलो. तेवढ्यात विमानाची प्रचंड घरघर होत एक भले थोरले विमान आमच्या ऑफिसच्या शेजारी थांबले. तो होता व्हीआयपी बे. आर्मीचे बडे जनरल तेथून जात येत. आमचे एअर ऑफिसर कमांडींग 'बॉस' त्यांना सोडायला वा घ्यायला जाणे हा प्रोटोकॉलचा भाग होता. काही काळात त्या विमानाचे चालक फ्लाईगसूट मधे आमच्या व्हरांड्यात दाखल. माझा डेप्युटी त्यांचा कोर्समेट म्हणून भेटायला आलेले. पण त्यावेळी टेबलावर ठेवलेले करोडो रुपये पाहून ही वेळ मित्राला भेटायची नाही असे वाटून परताना मी त्यांना विचारले, 'कोण येतय?' म्हणाले, 'लेहहून चंदीगडला निघालो होतो. अचानक जीओसी इन सींना येथून घेण्याचा आदेश आला म्हणून वाटेत वळवले विमान. आता ते येतच असतील.'

Figure 45 हे महारिषी लोको, अमे आपणीज डीकरो छे... अमने आशीर्वाद आपो. (डीकरो - लेकरे)

थोड्याच वेळात एसेकॉर्ट्सच्या सायरनचे आवाज घणघणू लागले. काही गाड्यांचा ताफा विमानाजवळ येऊन थडकला. मला फोन आला बॉसचा. 'जनरलसाहेबांना निरोप देऊन येतो कॅश चेकिंगला. तयार रहा.'

मला दुरून दिसत होते. विमानाचे एक एकपंख हळूहळू गरगरायला लागले. बॉसनी कडक सॅल्यूट ठोकून

जनरलसाहेवांना रिसीव्ह केले. ते विमानात चढलेले पाहून आमच्या सेक्शनकडे बॉसची गाडी वळवली. रेड कारपेट हटवले गेले. मी सर्व पाहात होतो. बॉसना मी रिसीव्ह करायला मी फाटकापर्यंत गेलो. कडक सॅल्यूट ठोकून गुलाबाच्या बागेतील वाटेवरून चालताना सहज बोललो, 'सर मी या विमानातून जाऊ का?
त्यांनी माझ्याकडे नजर दिली. तोवर मला माझ्या विचारणेतील मुर्खपणा जाणवला.
ते कॅश ठेवली होती त्या स्ट्रॉगरूम मधे दाखल झाले. सिगरेट पेटवून समोरच्या नोटांच्या ढिगाकडे पहात, माझ्या डेप्युटीच्या मोजणीकडे लक्ष देत एक दीर्घ झुरका घेत माझ्याकडे पहात म्हणाले, 'जाओ.' मी ओशाळून तो विषय झटकत म्हटले, 'नो, नो सर'.
मंथएन्ड कॅश मोजणी सोडून मी त्या चालू झालेल्या विमानातून जाण्याची गोष्ट करणे म्हणजे करीयरवर आफत ओढवून घेण्याचे धाडस होते.
तिकडे विमानाची घरघर आणखी वाढलेली आवाजावरून कळत होते. मी काही झालेच नाही असे नाटक करत उभा होतो. तेवढ्यात बॉस पुन्हा म्हणाले, 'गो.'
मी 'नो सर' म्हटले. तर ते जरबेच्या आवाजात म्हणाले, 'बेटर गो. आदरवाईज यू विल मिस द प्लेन'.
तो टोन बॉसच्या ऑर्डरचा होता मी ताडले....
बॉस म्हणाले, 'रन मॅन!'
मी कोटपरका काढून टाकला. डोक्यावरची टोपी सांभाळत माझी छोटीशी एव्हर रेडी एअर बॅग अब्दुल घेऊन माझ्या मागे पळत, आम्ही विमानाकडे धावलो. विमान तोवर एअर ट्रॅफिक सिग्नलची वाट पहात थबकले होते. पंखांच्या तीव्रगतीने वादळी वातावरण तयार झाले होते. मी कॅप पकडून मागच्या दाराकडून विमानात पाय ठेवला अन् घप्प करत तो दरवाजा बंद झाला. माझ्या अगांतुक येण्याने जनरलांचे लक्ष माझ्याकडे वळले. मी त्यांना कडक सॅल्यूट केला. ते खुष नक्की नव्हते. मी विमानात स्थिर झाल्यावर इतरांशी बोलून चंदीगडला उतरल्यावर पुढे काय करावे असे ठरवत होतो. जनरलांच्या गाड्यांच्या ताफ्यातील एकातून मी चंदीगडच्या बस स्टँडला पोचलो. एक बस पठानकोटला जायच्या अगदी तयारीत होती. त्यात उडी मारून चढलो. करता करता होशियारपुर आले. तोवर हिवाळी संध्याकाळ व्हायला आली होती.
सायकल रिक्षात चढलो. 'कहा जाना बाबूजी? 'किसी भीरगू शास्त्री के पास ले चलो.' मी रिक्षावाल्यावर ठरवायचे काम सोपवत म्हटले.
'तो मोहल्ला गोकुल नगरवाले के पास चलते है' । एका टिपिकल पंजाबी घरापाशी त्याने सोडले.

'हांजी, क्या लेंगे थंडा या गरम?' वगैरे शाब्दिक पंजाबी आदरातिथ्य झाल्यावर, 'अब तो टायम खतम हो गया सी. कल आना' पंजाबी ढंगाचे हिंदी बोलत स्व.वेद प्रकाश यांचे चिरंजीव प. महाशिव मला म्हणाले.
मी एका दिवसासाठी आलो आहे. काहीही करून भृगुसंहिता पाहायला मिळावी अशी इच्छा आहे. मी डबल पैसै द्यायला तयार आहे. कृपा करून आत्ताच शोध चालू करा असा विनंती वजा आग्रह केला. त्यावर महाशिव म्हणाले, ' चलो जी, इतनीही जिद पर अटके हो तो आपको भी मदद करना पडेगा?
त्यांनी उठत एका भिंतीवरचे पोटली वजा एक गाठोडे माझ्यासमोरच सोडले. त्यात हस्तलिखित कागदाचे पिवळे जुनाट कागद अस्ताव्यस्तपणे भरलेले वाटले. पैकी काही माझ्या हातात सोपवत पं. महाशिव म्हणाले, ' ऐसे करना, आपकी जनमकुंडली के हिसाब से इसमें से आपका टेवा याने जनम कुंडली वाली परची को ढूँढना पडता है।'
लगेच मी कामाला लागलो. मला टेवा उर्फ माझी कुंडली माहीत होती. मला मिळालेल्या पत्रावळ्यावजा कागदातून मी पटापट नको असलेल्या परचा वेगळ्या करताना पाहून पं. खुष होऊन म्हणाले, 'आप ते बडी जल्दी सीख गए?"
साधारण ४०-५० परचे हाताळले असतील तेव्हड्यात एका पर्चीत मी माझे नाव 'शशीकान्त' लिहिलेले वाचले.
त्यापर्चीवरती काढलेली कुंडली तंतोतंत जुळणारी होती. मात्र चेहऱ्यावरून काही न दाखवता म्हणालो, ' देखो पंडतजी, इस परचे में कुंडलीके तारे मिलते लगते है क्या?

'लाईये, म्हणत ते पान त्यांनी हातात घेऊन त्यातील ग्रहमान चेक केले व म्हणाले, सही परचा लगता है। त्वाडा नाम शशिकांत तो नही?
मी 'हांजी' म्हणताच त्यांनी पुढे वाटायला सुरवात केली. मी त्यांना आपण हिंदीत भाषांतर करून न सांगता मुळ संस्कृतमधूनच वाचावे अशी विनंती केली. 'आजकल कोई संस्कृत जानता नही' अशी तक्रार करत त्यांनी वाचायला सुरवात केली.
ऒम श्री शुक उवाच, भारतवर्षे एवम् गतिकाले को योग तस्य किंम फलम ऒं श्री. भृगु उवाच एवम ग्रहगति काले मनोरथ इति योग प्रभावे परमवचा, (मनोरथ या नावाच्या योगावर)) नंदवेद नंद९, वेद ४ (म्हणजेच ४९ व्यावर्षी) शशीकान्त या पितृ ज(नार्दन?) सत(लज)व्यास नदी मध्ये(दोआबात) चंचलपुरी, (होशियारपुरचे भृगुसंहितेतील नाव) चैत्रमासे (महिन्याच्या) तीज(तृतिया) – मंगळ(वारी) आज म्हणजेच दि. ३१ मार्च १९९८ ला, हा जातक हे कथन ऐकायचा योग आहे. आदी आदी...
ते ऐकून मला धक्का बसला कारण ती परची मी माझ्या हातानी त्या पोटलीतील कागदातून काढली होती. बर ती देवनागरीतील असल्याने मी स्वतःती वाचू शकत होतो. त्यातील शशीकान्त व अन्य अक्षरे तर मराठी वाचणाऱ्या कोणालाही अगदी स्पष्टपणे वाचता येतील अशी होती. पंडीतजीच्या हातचलाखीचा प्रश्नच नव्हता.
सर्व घटना काही मिनिटांत झाल्या होत्या. माझ्या नावाची ओळख कशी द्यायची नाही हे सरावाने मी जाणून होतो. त्या दिवशीच्या सर्व अशक्यप्रायः घटना आठवून हे कथन ऐकायला मी येणार असे सिद्ध व्हायला काय काय घडत गेले ते आठवून मला अंगावर शहारे आले.
लेह हून चंदीगडला चाललेले विमान श्रीनगरला वाटेत आर्मीतील ले. जनरल करता अचानक डायव्हर्ट होते काय! मी त्यात जाऊ? असा सवाल टाकतो काय! माझे बॉस मला जा म्हणून आग्रहाने कसे म्हणतात काय! रिक्षावाल्याला ही




Figure 45 **महर्षी आले घरा । तोच दिवाळी दसरा ।।**

नेमके याच ठिकाणी मला नेण्याचे कसे काय सुचावे! सर्वच अदभूत होते!!
या घटनामालिकेत सर्वात महत्त्वाचे होते माझे बॉस! ते अन्य दुसरे तिसरे कोणी नसून चीफ ऑफ एअर स्टाफ - एअर चीफ मार्शल प्रदीप नाईक होते!

त्यांच्याशी नंतर बोलताना मी खोदून खोदून विचारले, ‘सर तुम्ही त्यादिवशी कोटीरुपयांची कॅश व अन्य कामे असताना मला जा म्हणालात तरी कसे? त्यांनी खांदे उडवून म्हटले, ‘'मला वाटले तू जावेस म्हणून म्हणालो असेन’'.

मी रिटायर व्हायच्या आधी २००३मधे नवी दिल्लीत त्यांनी घरी भेटायला बोलावले. तेंव्हा मला ते म्हणाले, 'शशिकांत, मी पाहून आलो बर का नाडी ग्रंथ सिकंदराबादला असताना!'
'बरच काही लिहिलय पाहू या काय काय होतय ते' असे वहिनी म्हणाल्या होत्या त्यावेळी!
नंतर योग्य वेळ आल्यावर ते कोणत्या स्थानावरून निवृत्त झाले आहेत यावरून त्या कथनाची प्रचिती येते.
सन १९९८ च्या कॅलेंडरवर ३१ मार्चला मंगळवारी तीज होती का नव्हती ते चिकित्सकांनी हवेतर ताडून पहावे.

## 30. किस्सा ३१ मार्चचा 2007चा - दक्षिण भारतातल्या नाडी केंद्रवाल्यावर कोर्टात फिर्याद

एका शंकराच्या मंदिरात उद्या जाऊन दोन दीप लावावेत. त्यानंतर अपेक्षित व्यक्ती वाटेत भेटतील...

...मी लांबून येताना पाहून नेहमी गल्ल्यावर दिसणारा मालक मोटर सायकलवरून घरी जायचे थांबवून वाटेत भेटला....

....त्याच सुमारास तिकडे सर्व माध्यमातून एक बातमी झळकली होती "वैदीश्र्वरन कोईल मधील एका नाडी केंद्रवाल्याने मृत व्यक्तीचे केलेले कथन खोटे ठरले म्हणून त्याच्यावर कोर्टात फिर्याद "

....माझ्या विचारांची बैठक दृढ होण्याला प्राचार्य अद्वयानंद गळतगे या ऋषीतुल्य महाभागांची वैज्ञानिक सत्यनिष्ठा व लेखणी कारणीभूत ठरली....

भाग १

उत्तर भारतातील होशियारपुरच्या किश्शाला अनेक वर्षे झाली. त्यानंतर मी हवाईदलातून निवृत्त झालो. पुण्यातील प्रतिष्ठित इंजिनियरिंग व मॅनेजमेंट कॉलेजात काही वर्षे काम केले. एक दिवस पदावरून विमुक्त व्हावेसे वाटले. झालो.

नाडीग्रंथांवर विचार करता करता वाटू लागले की हवाईदलातील माझ्या नोकरीच्या निमित्ताने मला नाडी ग्रंथांची अभावितपणे ओळख झाली. त्यातील ताडपट्यांमधे व्यक्तीचे नाव व अन्य माहिती कूट तमिळमधे कोरून कशी येते ती लबाडीने मिळवता येते की त्यात ती खरोखरच कोरून लिहिलेली असते. याविचाराने मी नाडी ग्रंथांकडे आकर्षित झालो. शोध घेता घेता हवाईदलाच्या कामाच्या संदर्भात मला जेथे कधीच जावे वा भेटावे लागले नसते अशा इंडॉलॉजिकल संस्था, प्रतिष्ठित लायब्ररीज् , अनेक विद्वान व अनुभवी लोकांशी संपर्क झाला.मधल्या काळात अनेक महर्षींनी मला नाडी पट्यांमधून काही मार्गदर्शन केले. ते अनुभवले. विविध मंदिरांना भेटी झाल्या. अशी अनेक स्थळे, शहरे पालथी घातली ज्यांचा माझ्या काहीही संबंध नव्हता. आलेले अनुभव प्रामाणिकपणे लोकांसमोर मांडावेत असे वाटून लिहित गेलो. आधी मराठी, नंतर हिंदी, इंग्रजीत माझ्याकडून पुस्तके लिहिली गेली. तर तमिळ व नुकतेच गुजराथीमधे अनुवाद झाले. विविध ठिकाणी माझी भाषणे झाली. नियतकालिकातून लेख प्रसिद्ध झाले. प्रसिद्धी माध्यमांनी मुलाखती घेतल्या. एक वेळ अशी आली की आता मला नाडीग्रंथांबद्दल काही सांगायचे उरले नाही असे वाटू लागले. मी नाडी ग्रंथांना पडताळून पहाताना आलेल्या कथनांच्या अनुभवांमुळे मी बावळट, भोळसट व अंनिस विरोधक असा माझ्यावर शिक्का बसला. सत्यस्थिती मात्र नेमकी याच्या उलटी होती, आहे. मी ही तितकाच विज्ञानवादी आहे जितके अन्य पुरोगामी विचारधारेचे लोक स्वतःला विवेकवादी मानतात. अंनिवाल्यांनी नाडी ग्रंथांना खोटे ठरवण्यासाठी जे जे काम करावे असे अपेक्षित आहे ते ते प्रयोग मी प्रत्यक्ष अनेकदा करून मग मला जे अनुभवाला आले ते लिहायला लेखणी उचलली. नाडीग्रंथांच्या ताडपट्ट्यात काही लबाडी न करता जर व्यक्तीचा माहिती १००टक्के अचुक येत असेल तर ती माझ्या विज्ञान निष्ठ विचारधारेच्या विरोधात तत्वतः जाते म्हणून मी

**या घटनामालिकेत सर्वात महत्त्वाचे होते माझे बॉस! ते अन्य दुसरे तिसरे कोणी नसून चीफ ऑफ एअर स्टाफ - एअर चीफ मार्शल प्रदीप नाईक होते!**

नाकारली, दुर्लक्षिली तर त्या नाकारण्यात सत्यानिष्ठेशी प्रतारणा होत आहे असे मला लक्षात आल्यावर मी सत्यनिष्ठ असणे या शिवाय मला दुसरा पर्याय नव्हता.

माझ्या विचारांची बैठक दृढ होण्याला प्राचार्य अद्वयानंद गळतगे या ऋषी तुल्य महाभागांची वैज्ञानिक सत्यनिष्ठा व लेखणी कारणीभूत ठरली. आज हे मला मुद्दाम नमूद करावेसे वाटते. असो.

मी सिंबॉयसिसमधून पदभार मुक्त झालो. अचानक वाटले की श्री. रमणी गुरुजींच्या तांबरमजवळच्या काक भुजंदरांच्या आश्रमात जन्मदिवसाचा वार्षिक सोहळा अनुभवायला जावे. व गुरुचरित्राचे पारायण ही त्या पवित्र ठिकाणी करावे.



**Figure 21 रमणी गुरुजींच्या आश्रमात**



**Figure 46 एयर चीफ मार्शल प्रदीप नाईक ग्रुप कॅप्टन सचिन तेंडूलकरना कमिशन प्रदान करताना**

मी आश्रमात पोहोचलो. नंदिकेश्वराचे विवाह, काकभुजंदरांचा जन्मदिवसाचा सोहळा पंचतारांकित बड्या हॉटेलातील दक्षिणात्य पद्धतीचा रोज बदलता मेनू तिन्ही त्रिकाळ १०००-१२०० उपस्थित लोकांसाठी सलग १५ दिवस अन्नदान - भंडारा, रोज संध्याकाळी विविध बड्या गायक, वादक, नृत्यकाचे कला सादरीकरण, विविध देशातून सोहळ्यास आलेल्यां अभारतीयांना भारतीय पोषाख, साडी व कुमकूम, केसांच्या अनेक आकर्षक वेण्या, गजरे सप्रेम भेट म्हणून देण्याइतक्या प्रचंड मोठ्या प्रमाणात एकट्या रमणी गुरुजींच्या निदर्शनाखाली तो सोहळा उत्तम रितीने पार पाडला जात होता. यासाठी ऐच्छिक दानपात्र होते. कोणावरही दंडात्मक वर्गणीचा भाग नव्हता. खुद्द रमणी गुरुजी या सर्वांचे श्रेय महर्षी काकभुजंदरांच्या नाडपट्टीतून मिळणाऱ्या आदेशांना देत होते, असतात.
यामधे आणखी एक व्यक्ती पण महत्वाची व अनोखी असते. ती म्हणजे रमणी गुरुजींचा द्वितीय पुत्र श्री. शंकरजी. मात्र तेथे उपस्थित फारच थोड्या लोकांना हे माहीत होते की या काळात काकभुजंदर महर्षींचे नाडी वाचन उपस्थितांसाठी नसले तरी श्री. शंकरजींच्या मुखातून अगस्त्यार महर्षी बोलतात. तेही रात्री १२ च्या नंतर.

सोहळा नेहमीच्या थाटात संपन्न होत होता. माझे वाचनही व्यवस्थित चालू होते. एकदा कळले की आज रात्री शंकरजींचे नाडीकथन होण्याची शक्यता आहे. आम्ही रात्रीची वाट पहात होतो, ओडोमॉस अंगाला चोपडून. १२.३० च्या सुमारास सतरंज्यांची मांडामांड झाली. एका ठिकाणी शंकरजी विराजमान झाले. गायनाच्या महफिलीत मुख्य गायक जसे सरसाऊन बसतात तसे शंकरजींनी आसन ग्रहण केले.
आणि ....पं. भीमसेनजी जसे ताना घेताना हातांची आवर्तने वा हावभाव करतात तसे करत एकदम तमिळभाषेत शंकरजी बोलायला लागले. त्यांच्या धाटणीवरून ते गात होते. डोळे मिटलेले. तमिल जुनी व काव्यमय होती. ते विविक्षित एकाकडे पाहून गात वा सांगत होते असे वाटत नव्हते. ती वाणी त्यांच्या नेहमीच्या टोनची नक्कीच नव्हती. काही काही शब्द कळतायत असे वाटत होते. २० मिनिटांनी ते थांबले तेंव्हा कळले की त्या कथनातील वचने उपस्थित स्त्रियांना उद्देशून होती. आता त्यांनी परतावे, मात्र उरलेल्या पुरुषांनी आणखी काही काळ थांबायला सांगण्यात आले. स्त्रिया पांगल्या. गुरुजी उठून थोडे पाय मोकळे करून आले. तेवढ्यात गरमागरम कॉफी सर्वांना मिळाली. पुन्हा सगळे सरसाऊन बसले. आलेल्या अनुभवामुळे मी शंकरजींच्या जवळ बैठक मारली. पण मला आधीच्या जागेवर जाण्याचे अनुभवींनी सुचवले.
आता अगस्त्य महर्षी पुहा आगमन करून शंकरजींच्या मुखातून एका एकाला उद्धेशून सांगू लागले. माझ्यावर बोटाने इंगीत करत शंकजींनी अगस्त्य कथन केले. हळु हळू सर्वांची वेळ आली. नंतर मला माझ्या संबंधी काय बोलले गेले ते सांगण्यात आले. ते थोडक्यात असे होते, " एका शंकराच्या मंदिरात उद्या जाऊन दोन दीप लावावेत. त्यानंतर अपेक्षित व्यक्ती वाटेत भेटतील. त्यांना माझ्याकडून नाडीसंबंधात मार्गदर्शन केले जाईल. नाडी ग्रंथांच्या संदर्भात माझ्यातर्फे भावी कामगिरी काय असेल याचे कथन योग्य वेळी विविध महर्षींच्या नाडीग्रंथांतून मिळेल " कथन संपले.



Figure 47 अन्नछत्रातील पंगत

दुसऱ्यादिवशी मी गुरुजींचा निरोप घेऊन तिरुवन्नमलईतील शिव मंदिराला जायला लागलो. शंकरजी म्हणाले, 'अगस्ती म्हणालेत की रस्त्यावर तुला लोक भेटतील. ते कसे घडते ते मला समजून घेण्याची खूप इच्छा आहे. परत येऊन मला सांगावे'.

तिरुवन्न मलाईला हॉटेलात पोचून गुरूचरित्राच्या पारायणातील भाग वाचनात तो दिवस गेला. तोवर कानावर आले की उद्या दिनाक ३१ मार्च २००७ काही कारणानी स्टेट स्पॉन्सर्ड 'तमिळनाडू बंद' घोषित झाला आहे. दुसरा दिवस उजाडला. मी पहाटे उठून सहाला चहा पिण्याला गेलो तर रस्त्यावर एकही हॉटेल, दुकान, टपरी उघडी नाही. मंदिराच्या समोर दाटीवाटीने बसणारे फुलवाले, इतर दुकानदार एकदम गायब होते. इतका कडकडीत बंद मी प्रथमच अनुभवत होतो. सकाळी ११ पर्यंत वाट पाहून मी मंदिरात गेलो तर शुकशुकाट. पुजारीही गायब. साध्या दोन पणत्या विकत मिळायला मारामार झाली. तेवढ्यात एक पुजारी आले. मी अर्चना करायची असल्याचे हातवार करून सांगितले. त्याने मला प्रसाद देताना मी विचारले, 'मला दोन दीप लावायचे आहेत मिळतील का?' त्याने आधी कोणीतरी लावलेल्या दोन पणत्या तेल वात घालून दिल्या. मी एक वात पेटवली. मदत म्हणून त्याने दुसरी पेटवली. दोन्ही दीप मुख्य गाभाऱ्यात लावलेले मी पाहिले. कथनाप्रमाणे काम झाले असे म्हणत मी परतलो. गोपुराची वेस ओलांडताना एकदम लक्षात आले. अरे तू फक्त एकच दीप लावलास! दोन नाही! जा परत. लाऊन ये! मी पुन्हा गाभाऱ्यात पोचलो तर पुन्हा कोणीच नाही! तो पुजारी ही गायब! मी थांबून वाट पाहून ही कोणाच्या येण्याची चिन्हे दिसेनात. मी तसाच परतलो.

एकदम मनात आले. उठावे व वैदीश्वरनकोईलच्या मंदिरात जावे. तेथे दीप लावावेत. चालत स्टँडवर आलो. एक बस नव्हती. पण अचानक जाण्याची सोय झाली. मजल दर मजल करत मी वैदीश्वरन कोईलला पोचलो. तोवर बंदचा प्रभाव संपून सर्व काही स्थिरस्थावर झाले होते. तात्काळ मंदिरात जाऊन मी भरपूर दीप लावले. रात्रीचे आठ वाजून गेले होते. पोटात कावळे कोकलत होते. म्हणून मी एका हॉटेलाकडे निघालो. त्याचा मालक पुर्वीचा हवाईदलातील असलेला. नेहमी गल्ल्यावर बसलेला असायचा. मी जेवायला त्याच्याकडे आवर्जून जात असे. मी लांबून येताना पाहून नेहमी गल्ल्यावर दिसणारा मालक आज मोटर सायकलवरून घरी जायच्या बेतात असताना वाटेत थांवून भेटला!

त्याच सुमारास तिकडे सर्व माध्यमातून एक बातमी झळकली होती "वैदीश्र्वरन कोईल मधील एका नाडी केंद्रवाल्याने मृत व्यक्तीचे केलेले कथन खोटे ठरले म्हणून त्याच्यावर कोर्टात फिर्याद "

क्रमशः पुढे चालू .....

## 31. किस्सा ३१ मार्चचा - दक्षिण भारतातल्या नाडी केंद्रवाल्यावर कोर्टात फिर्याद .

### भाग - २ --

**विचार करायला लागलो, कोण तू? तू इथे का आलायस? कोणी तुला बोलावले नसताना! तुझा आणि नाडी ग्रंथांचा काय संबंध? नाडी महर्षी कोणी काका का मामा लागतात तुझे? ना तुला तमिळ येत, ना तू नाडीकेंद्र चालक, कोण तुझे ऐकायला बसलय? एक वेळ अशी आली की सर्व व्यर्थ वाटून मी भिंतीवरील महर्षी अगस्त्यांच्या मोठ्या फोटोकडे प्रचंड विमनस्कपणे पहाता पहाता अश्रुंनी वाट शोधली.**

**...."प्रत्येक घराचा दरवाजा मला भिकारी समजून बंद करून हाकलून देतोय. मी भुकेला आहे. थंडीने शरीराला असंख्य वेदना होतायत. मला अशा परिस्थितीत आणायचे होतेत तर गुरुमाऊली मला पाठवलेत कशाला इथे अशा परदेशात? मी फार हताश झालोय! माझ्याच्याने जेवढे प्रयत्न करायला शक्य होते ते मी केले. यानंतर आता आपणच ठरवावे काय ते "असे म्हणत विवेकानंदांना अश्रू आवरेनात. रस्त्याच्या कडेला फुटपाथवर गुरूंचा धावा त्यांनी केला. अचानक ते बसले होते त्या समोरच्या घराचा दरवाजा उघडला गेला कोणीतरी विकल होऊन रस्त्यावर बसकण मारून आहे असे वाटून एका व्यक्तीने विचारपूस केली. त्या ह्रोत्या श्रीमती जॉर्ज डब्लू. हेल. त्यानंतर विवेकानंदांच्या संपुर्ण जीवनात कधीच अशी दैन्यावस्था आली नाही...**

**..."आय नो, तो योग्य ठिकाणी न गेल्याने तुला दीप लावायला जमणार नाही. नंतर तो नाडीवरील आलेले खोटे किटाळ घालवायला योग्य ते मार्गदर्शन करेल. आयुष्याच्या चौथ्या भागात नाडी ग्रंथांच्या संदर्भात भावी कामगिरी काय असेल याची त्याला अनुभूती येईल " असे तू गेल्यावर नंतरच्या अगस्त्य महर्षींच्या रात्रीच्या कथनातून आले होते."...**

**... माझ्या विचारांची बैठक दृढ होण्याला प्राचार्य अद्वयानंद गळतगे या ऋषी तुल्य महाभागांची वैज्ञानिक सत्यनिष्ठा व लेखणी कारणीभूत ठरली...**

त्याच सुमारास तिकडे सर्व माध्यमातून एक बातमी झळकली होती "वैदीश्र्वरन कोईल मधील एका नाडी केंद्रवाल्याने मृत व्यक्तीचे केलेले कथन खोटे ठरले म्हणून त्याच्यावर कोर्टात फिर्याद ".पुढे चालू ...

मी त्याबाबत विषय काढला काय नक्की झाले वगैरे विचारत. रस्त्यावर आम्ही गप्पा मारत उभे होतो. 'तो नाडीवाला शिव सामी हो' तमिळ हेल काढत तो म्हणाला, 'थांबा मी तुमची गाठ त्याच्याशी घालून देतो'. म्हणून त्याने मोबाईलवरून एकाशी संपर्क केला. काही वेळात एक जण मोटर सायकलवरून आला. तो होतो शिवसामीचा दोस्त. त्याला हिंदी व इंग्रजी येत होते म्हणून तो मला भाषांतरकार म्हणून कामाला येईल असे म्हणून व मला कॉफी पाजून हॉटेल मालक गेला. मी त्याच्या मित्राच्या मोटर सायकलवरून शिवसामीच्या केंद्रात पोचलो. एरव्ही मी त्या केंद्रात गेलो होतो. पण मालक शिवसामीशी कधी गाठ पडली नव्हती. ती नेमकी त्या दिवशी पडली. तो कारमधून बाहेर पडून रस्त्याने केंद्रात जात होता.

शिवसामीला भेटताच त्यावरील कोर्टकेसबद्दल एकदम विचारायला मला संकोच वाटला असता, पण बरोबरच्या माणसाने तोच विषय काढून त्याला बोलते केल्याने मला सोईचे झाले. पुढील अर्धातासात मी ती केस समजून घेतली. एका व्यक्तीने मृतमाणसाचा अंगठ्याचा ठसा पुढे करून नाडी पट्टी शोधली त्यातील कथन हे साहजिक खोटे असल्याचे सांगून कोर्टात फिर्याद केली. शिवसामीला ही ते पेपरमधूनच कळले होते. त्या पुढे काय करावे यासाठी सल्ला हवा होता. एका वकिलांची अपॉइंटमेंटही मिळवली होती. फिर्यादी शिवसामीला भेटून काही लाख पैसे मागून ती केस मिटवायला तयार आहे. असे संकेत देत होता. मामला नाडी ग्रंथांच्या खरे-खोटेपणाचा नसून सनसनाटी पसरवून, बदनामीला भिवऊन पैसे उकळण्याचा होता.

शिवसामी व मी एका प्रतिष्ठित वकिलांना भेटायला गेलो. ते मोठे प्रस्थ होते. कुठेतरी बाहेर जाण्यासाठी ते कारमधे होते. वाटेतून परत फिरून ते पेपर हातात घेऊन म्हणाले, 'प्ली ऑफ नो केस करून पहिल्याच हियरिंगमधे डिसमिस करून टाकू. काळजी नको'.

त्यावर मी त्यांच्याशी चर्चा करून सांगितले, "ही केस तशी न लढवता फिर्यादीने केलेला दावा खोटा आहे. कारण अंगठ्याचा ठशावरून नाडी भविष्य कथन केले जाते हेच मुळात चूक आहे. शिवाय विवक्षित व्यक्तीची नाडी ताडपट्टी शोधताना विचारलेल्या प्रश्नांना चुकीची व दिशाभूल करणारी उत्तरे देऊन नाडीवाचकांची फिर्यादीने फसवणूक केली

आहे. असा नाडी केंद्रवाल्यांनी दावा फिर्यादीवर ठोकायला हवा. कारण मृत व्यक्तीची खरी माहिती लपवून ठेऊन कुठल्यातरी एका नाडी पट्टीला ती त्या मृतव्यक्तीच्या वर्णनाशी जुळते असे खोटेच मान्य करून मृताच्या नाडीकथनाची वही व कॅसेट मिळवण्याचा सापळा रचला आहे. नाडी ग्रंथांना बदनाम करून पैसे उकळण्याचा हा सोपा धंदा वा मार्ग आहे. ज्याला फिर्यादी म्हणून उभे केले गेले आहे, तो एक वाया गेलेला दारुडा म्हणून गावात ओळखला जातो. त्याला पैसै चारून उभे करण्यामागे काही विरोधी विचाराच्या संस्था व हितचिंतक असल्याने या केसला अवास्तव प्रसिद्धी मिळवता आली आहे".

'आपण व शिवसामी यांनी त्या मृत व्यक्तीची खरी माहिती काढून त्यातील विसंगती कोर्टासमोर मांडावी आणि ज्या खऱ्या व्यक्तीची ती नाडी पट्टी असेल त्याला शोधून कोर्टासमोर उभे करून न्याय मागावा."

"ही केस शेवटपर्यंत लढवण्याचे आणखी एक महत्वाचे कारण असे की ही केस तमिळनाडूतील सिरकाळी या तालुक्याच्या कोर्टात चालणार आहे. त्यातील आरोपी, फिर्यादी, दोन्हीकडचे वकील व न्यायाधीश हे सर्व तमिळभाषी असल्याने व नाडी ग्रंथ भविष्य ही काय चीज आहे?, नाडी ग्रंथांच्या ताडपट्टीत व्यक्तीचे इतके अचुक संदर्भ खरोखरच मिळतात का? असतील तर ते शब्द कसे व कुठे शोधायचे? असे प्रश्नही उपस्थित करून, प्रत्यक्ष न्यायाधीश महाराजांना तमिळभाषेचे ज्ञान असल्याने याची शाहनिशा करणे सहज शक्य आहे. शिवाय वेळ पडल्यास त्या राज्यातील इंडॉलॉजिकल संस्थांना पाचारण करून त्याची साक्ष काढून ही नाडी पट्ट्यांची कोर्टकेस म्हणून भक्कमपणे लढवता येईल".

ते सर्व ऐकून वकील महाशय माझ्याकडे आश्चर्याने पहात म्हणाले, "तुम्ही कोण?"

मी विनम्रपणे माझे इंग्रजी पुस्तक त्यांना दिले. जाताजाता मी त्यांना विचारले, "आपण स्वतः नाडी ग्रंथ अवलोकन केलेत का? नसेल तर पहा व मग केस हातात घ्या. अन्थथा ही केस आपण न लढवलेली बरी".

---

पुढे ती केस २-३ वर्षे चालून फिर्यादींना आपले म्हणणे सिद्ध करता न आल्याने शिवसामीच्याबाजूने निकाल लागून संपली. माझ्या ऑक्टोबर २००९ एडिशनच्या इंग्रजी पुस्तकात त्या केसचे निकालपत्र एका प्रकरणात दिलेले आहे.

---

नंतर रमणीगुरुजींच्या आश्रमात शंकरजींना भेटून मला विवक्षित लोक रस्त्यात कसे भेटत गेले. सर्व कथन केले. मी त्यांना हेही सांगितले की मला एक वेगळी अनुभूती या दरम्यान आली. दुसऱ्या दिवशी सकाळी शिवसामीच्या एसी ऑफिसमधे मी एकटा बसलो होतो. तो यायची वाट पहात. कंटाळा आला बसून. विचार करायला लागलो, कोण तू? तू इथे का आलायस? कोणी तुला बोलावले नसताना! तुझा आणि नाडी ग्रंथांचा काय संबंध? नाडी महर्षी कोणी काका का मामा लागतात तुझे? ना तुला तमिळ येत, ना तू नाडीकेंद्र चालक, कोण तुझे ऐकायला बसलाय? एक वेळ अशी आली की सर्व व्यर्थ वाटून मी भिंतीवरील महर्षी अगस्त्यांच्या मोठ्या फोटोकडे प्रचंड विमनस्कपणे पहाता पहाता अश्रुंनी वाट शोधली. चाळा म्हणून मी टेबलावरील पुस्तक हातात घेतले सहज उघडलेले पान वाचायला लागलो....

"प्रत्येक घराचा दरवाजा मला भिकारी समजून बंद करून हाकलून देतोय. मी भुकेला आहे. थंडीने शरीराला असंख्य वेदना होतायत. मला अशा परिस्थितीत आणायचे होतेत तर गुरुमाऊली मला पाठवलेत कशाला इथे अशा परदेशात? मी फार हताश झालोय! माझ्याच्याने जेवढे प्रयत्न करायला शक्य होते ते मी केले. यानंतर आता आपणच ठरवावे काय ते "असे म्हणत विवेकानंदांना अश्रू आवरेनात. रस्त्याच्या कडेला फुटपाथवर गुरूंचा धावा त्यांनी केला. अचानक ते बसले होते त्या समोरच्या घराचा दरवाजा उघडला गेला. कोणीतरी विकल होऊन रस्त्यावर बसकण मारून आहे असे वाटून एका श्रीमंत प्रौढ व्यक्तीने विचारपूस केली. त्या विदुषी होत्या श्रीमती जॉर्ज डब्लू. हेल. त्यांनी त्यानंतर स्वामींची सर्वधर्म परिषदेला उपस्थित होण्याची सोय केली. त्यानंतर विवेकानंदांच्या संपुर्ण जीवनात कधीच अशी दैन्यावस्था आली नाही.

विवेकानंदावरील ते छोटेखानी इंग्रजी पुस्तक ठेवले गेले. नजर अगस्त्यमहर्षींचा चेहऱ्याकडे गेली. त्यांचे सुहास्य मला

माझ्या जीवनाकार्याची अनुभूती देऊन गेले असा भास झाला....

---

त्यावर शंकरजी म्हणाले "आय नो, तू योग्य ठिकाणी न गेल्याने तुला दीप लावायला जमणार नाही. नंतर तू नाडीवरील आलेले खोटे किटाळ घालवायला योग्य ते मार्गदर्शन करशील. आयुष्याच्या चौथ्या भागात नाडी ग्रंथांच्या संदर्भात भावी कामगिरी काय असेल याची त्याला अनुभूती येईल " असे तू गेल्यावर नंतरच्या अगस्त्य महर्षींच्या रात्रीच्या कथनातून आले होते."

## 32.तमिळमधे नाडीग्रंथ पुस्तकाची निर्मिती




Figure 48 अन्नछत्रातील पंगत

### तमिळ संगम

अनेक दिवसांनी या पुढील लेखन करायला हुरुप आला. त्याला हैयोहैयैयो काही अंशी प्रेरक आहे. नाडीकेंद्रावर एक कोर्ट केस झाली होती. त्या केसच्या निकालाची तमिळभाषेतील प्रत नाडीकेंद्रातर्फे मला नुकतीच मिळाली होती. त्या तमिळमधील कोर्टाचा निकालवाचून वाचून हैयोहैयैयोने त्याचे इंग्रजीत रुपांतर करून ईमेलने कळवले की त्यात कोर्टाने सबळ पुराव्या अभावी (फिर्यादीच्या त्रुटीपुर्ण व खोट्या पुराव्यांमुळे - हे माझे शब्द) नाडीकेंद्राच्या संचालकाला निर्दोष सोडले आहे. त्याचे असे झाले की 4 मार्च 2007 च्या पेपरातून सर्व भाषातून “तमिळनाडूतील नाडी भविष्यकेंद्राने केलेली फसवणूक उघडकीला - केंद्राच्या संचालकाला कोर्टात खेचले”. असे ठळक मथळ्यात छापून आले

होते. त्या घटनेला पीटीआयच्या अन् टीव्ही चॅनल्स व अन्य प्रसिद्धिमाध्यमांनी लाऊन धरल्याने ती बातमी वाऱ्यासारखी जगभर पसरली. इतकी प्रसिद्ध मिळाली की त्यामुळे नाडी ज्योतिष जगतात बरीच खळबळ माजली होती.

मला अनेक भागातून विचारणा येऊ लागल्या. 'बोला ओक, आता आपले काय म्हणणे ते? मला ही नेमके कळेना काय झाले आहे ते. शेवटी मी वैदीश्वरनकोईलच्या ज्यांच्यावर ती केस केली गेल्याचे वृत्त होते त्या शिवसामींना फोन लावला. तेंव्हा कळले की काही विरोधी विचाराच्या संस्थांनी एका फाटक्या व्यक्तीला पुढे करून त्याच्या हाती एका मृत माणसाचा अंगठाछाप देऊन शिवसामींच्या नाडी केंद्रावर पाठवले होते. नेहमीप्रमाणे हो-नाही करत नाडीपट्टी शोधल्यावर एका पट्टीतील वर्णनाशी जुळणाऱ्या मजकुराला त्या व्यक्तीने हो-हो म्हणून मान्यता दिल्याने व ती ताडपट्टी त्या अंगठेवाल्याचीच आहे असे सांगितले गेल्याने, त्या पट्टीतील मजकूर एका वहीत लिहून टेपसह तो त्या आलेल्या व्यक्तीला दिला गेला होता. नंतर त्या व्यक्तीच्या संगममताने नाडीग्रंथ विरोधकांनी आणखी एकाचा अंगठ्याचा ठसा देऊन त्याच्या वही व कॅसेटच्या आधारे असा दावा कोर्टात ठोकला की ज्याची पट्टी सापडली असा नाडी केंद्राने दावा केला आहे व त्याची वही आणि कॅसेट बनवून दिली तो वस्तुतः काही काळापुर्वीच मेलेला व्यक्ती होता. त्यामुळे नाडीवाले पैसे मिळवण्याच्या नादात नाडीभविष्य कथनाच्या नावाखाली फसववणूकीचा व्यवसाय करत आहेत. त्याला पायबंद घातला जावा म्हणून त्यांच्यापैकी महत्वाच्या व बड्या मानल्या जाणाऱ्या नाडी केंद्राच्या संचालकावर वैदीश्वरनकोईल या नाडी केंद्रासाठी प्रसिद्ध गावाजवळील सिरघळी किंवा सिरकाळी या तालुक्याच्या गावातील कोर्टात केस केली आहे.

मी जेंव्हा त्यांच्याशी बोललो तेव्हा ते म्हणाले, 'मला ही पेपर मधूनच ही बातमी कळली. अजून कोर्टातर्फे काहीच विचारणा आलेली नाही. आम्ही काही खोटेपणा केलेला नाही. पण ते कोर्टात शाबीत व्हायला हवे म्हणून आम्ही केस लढवायचा विचार करत आहे'. त्या दाव्याचा निकाल 29 जुलै 2009 रोजी नाडी केंद्राच्या बाजूने लागला. त्या कोर्टाच्या निकालाची प्रत मला शिवसामींनी आवर्जून पाठवली होती. शिवसामींच्या सांगण्यावरून या दाव्याच्या संदर्भात मी त्यांच्या वकीलांना काही मुद्दे सुचवले होते. ही केस विरोधकांनी परत घेण्याचा प्रयत्न केला तरी नाडीकेंद्रवाल्यांनी ती लढवली पाहिजे. कारण त्यातील फिर्यादी, आरोपी, दोन्हीकडील वकील व स्वतः न्यायाधीश हे सर्व तमिळभाषेचे जाणकार आहेत. कदाचित त्यापैकी काहींनी नाडी ग्रंथांचा अनुभव देखील घेतलेले असेल. त्यामुळे अशा केसेस तमिळनाडूतच लढवल्या गेल्या पाहिजेत व त्यामुळे न्यायालयातर्फे नाडीग्रंथांची कसोटी होऊन ताडपट्ट्यातील मजकुराच्या खरे-खोटेपणाची शहानिशा होऊन नाडीकेंद्रांच्या सचोटीला मान्यता मिळेल. तसेच गैरमार्गाने कोणी नाडीग्रंथांचा उपयोग करत असेल तर त्यालाही जरब बसेल. शिवाय असे अनेक मुद्दे होते ते ऐकून वकील म्हणाले, 'गरज पडली तर आम्ही आपणांस साक्षीदार म्हणून बोलावू'. अर्थात ती वेळ आली नाही. या कोर्ट केस बाबत नंतर पुढे सवडीने लिहू. असो.

हैयोंनी केसचे निकालपत्र इंग्रजीत सादर केल्याने माझे तमिळमधील पुस्तक कसे आश्चर्यकारकपणे तयार झाले, याचे कथन करायला हुरुप आला.

तर माझे मराठीतील पहिले पुस्तक सन 1994-95 च्या सुमारास मी अनेक नाडीकेंद्रांना सप्रेम भेट देत असे. त्यावेळी ते म्हणत, "सामी आपण आमच्याकडून नाडीग्रंथांची माहिती गोळाकरून हे पुस्तक लिहिलेत पण आम्हा तमिळलोकांसाठी एखादे पुस्तक केंव्हा तयार होणार?" त्यांची मागणी लवकरच पुर्ण होणार होती पण मला त्याची कल्पना नव्हती! मी त्यांना म्हणे, 'एक तर मला तमिळमधे भाषांतर करणारे लोक पाहिजेत. शिवाय इतका खर्च करायला माझ्याकडे पदरचे पैसेही नाहीत. त्यावर ते म्हणत, 'पैशाची काळजी नको. ते आम्ही पाहू. मात्र मला कोठल्याही नाडीकेंद्राचे पैसे घेऊन त्यांचे मिंधे व्हायचे नव्हते. त्यावर तोड काढली गेली की आपल्याकडे येणाऱ्या ग्राहकांपैकी कोणी जर नाडी ग्रंथांचा त्यांना आलेला अनुभव सांगून त्यांच्या धंद्याची-मालाची जाहिरातकरून आपल्याला आर्थिक मदत दिली तर मला चालेल. त्यावर ताबडतोब अनेक नाडीकेंद्रांनी त्यांच्याकडील नामीगिरामी

ग्राहकांचे फोननंबर दिले. त्यांच्याशी संपर्क केल्यावर त्यांनी आपले अनुभव मोठ्या आनंदाने सांगून आपल्यातर्फे कॉम्प्लीमेंटरी जाहिराती देऊन ती गरज पूर्ण केली.

आता प्रश्न होता. मराठीचे तमिळमधे भाषांतर कोण करणार? मी एक दिवशी ऑफीसमधे कोणाला तरी याबाबत फोनवरून सांगत होतो. ते तेथे उपस्थित असलेल्या एकांनी ऐकले व मला म्हणाले, 'आपल्याला अशा तमिळ माणसाची गरज आहे काय, जो मराठीतून भाषांतर करेल? माझ्या माहितीत एक ग्रहस्थ आहेत त्यांना विचारून पहा. असे म्हणून त्यांनी एका दुकानाचा पत्ता दिला. मी तात्काळ त्या दुकानाला भेट दिली. एक साठीतील काळेसे ग्रहस्थ होते. 'मी गोपाळ राव' असे मराठीत म्हणून त्यांनी आपली ओळख दिली. मी त्यांना माझी गरज सांगितली तेंव्हा ते म्हणाले, 'मी कारवारी भागातील मराठी बोलणारा आहे. आमच्या काही पिढ्या येथे गेल्या. तरीही आम्ही घरी मराठीतून बोलतो. पुर्वी मी दासबोधाचे तमिळमधे रुपांतर केले आहे. शिवाय मी हिंदीतून तमिळमधे रुपांतर करण्याचे काम करतो. आपल्याला माझे काम आवडले तर पुढचे पाहू'. म्हणून त्यांनी माझे पुस्तक वाचायला घेतले. थोडेसे मोठ्याने त्यानी त्यातील मजकूर वाचला तेंव्हा मी त्यांना म्हटले, 'आपण जर दासबोधाला रुपांतरीत केले आहेत तर हे काम फारच साधे आहे. आपण काम सुरु करावे'. ते म्हणाले, 'जरी मी मराठी वाचतो तरी आपण मला हिंदीतून याचा अनुवाद दिलात तर मला तो जास्त सोईचा होईल'. त्यानुसार मी स्वतः हिंदीत रुपांतर करायला लागलो. शिवाय माझ्या विज्ञानवादी मित्राच्या सासरेबुवांनी मला मदत केली. असे करत करत बराच भाग हिंदीत आपसुक तयार झाला. पुढे त्यांनी तमिळमधील रुपांतरित लेख माझ्या हातात दिले व म्हणाले, 'अहो इतकी वर्षे आम्ही इथे तामिळनाडूमधे राहतोय पण आम्हाला या नाडी भविष्याबद्दल जरा देखील माहिती नव्हती! माझी मुले मधल्याकाळात ते जाऊन पाहून आली व त्यातील अचुक माहिती आलेली पाहून चकीत झाली. आपण इतक्या लांबून येऊन या बद्दल कसे आकर्षित झालात? महर्षींच्या लोकसेवेपुढे माझी भाषांतराची कामगिरी तुच्छ आहे. मी आपणांकडून काही मोबदला घेऊ इच्छित नाही'.

त्यांनी केलेले तमिळ लेखन मी माझ्या ऑफिसमधील तमिळ जाणकारांना वाचायला देत असे. त्यांनी शेरा दिला अत्यंत समर्पक रुपांतर आहे. नाडीकेंद्रांच्या माहितीतील एका प्रिंटिंग प्रेसला छपाईचे काम देण्यात आले. इकडे छपाई चालू झाली. हजार प्रतीं विविध नाडीकेंद्रांना मोफत द्यायच्या असे मी ठरवले होते. उरलेल्या हजार विक्रीसाठी कोण घेणार असा प्रश्न होता. त्याच सुमारास मला चिपॉक स्टेडियमवर क्रिकेटमॅचच्या सेक्युरिटीच्या संदर्भात एका मीटींगला जायचे होते. हवाईदलाच्या गाडीतून युनिफॉर्ममधे मी जात असताना वाटेत एके ठिकाणी थांबावेसे वाटले. ते होते मईलापुरमच्या भागातील गिरी ट्रेडींग कंपनीचे ऑफीस. पोचलो तर एका गादीवर एक जण तमिळ प्रचलनाप्रमाणे अर्धे शरीर उघडे, पांढरी भारी धोतीची लुंगी, गळ्यात रुद्राक्षापासूनच्या सोन्याच्या अनेक माळा अशा अवतारात बसलेले होते. तेच मालक गिरी होते! मी कोण हे सांगताच त्यांनी हात पसरले व अस्खलित इंग्रजीत म्हणाले, 'आज किती तरी वर्षांनी मला हवाईदलातील वरिष्ठ व्यक्तीला भेटण्याचा योग येत आहे'. पुढे म्हणाले, 'मी ही खूप वर्षांपुर्वी हवाईदलात होतो. मला त्याचा अभिमान आहे. तुम्ही काही बोलायच्या आधीच सांगतो की माझ्याकडे काही काम असेल तर ते झालेच असे समजा'. मी नाडी भविष्यावरील पुस्तकाच्या वितरणाची जबाबदारी आपणाकडे घ्यावी असा प्रस्ताव मांडला. 'हो नक्कीच. अहो एवढेच काय, हे पुस्तक मीच छापले असते. मला आधी माहिती असते तर' असे म्हणून त्यांनी आपल्या स्टाफला तसे आदेश दिले. यथावकाश त्या पुस्तकाच्या प्रती त्यांच्याकडून वितरित झाल्या. त्याचा सर्व हिशोब मला वेळोवेळी मिळत असे.

झाले. असे करता करता नाडी भविष्यावर तमिळ पुस्तक तयार झाले. त्याचे नाव होते, "अतीशय कन्निपिडिपु - नाडि जोतिडम" अर्थात "चक्रावून टाकणारा चमत्कार – नाडी भविष्य'.

रमणी गुरुजींच्या आश्रमात दर शुक्रवारी माझ्या चकरा असत. त्यांनी या पुस्तकाचे उदघाटन करावे अशी माझी इच्छा त्यांना बोलून दाखवली. त्यांनी आनंदाने होकार दिला. एका संध्याकाळी सर्वांसमक्ष काकभुजंदर नाडीचे

मोठ्याने वाचन झाल्यावर त्यामधील कथनाचा गोषवारा आमच्या सारख्या तमिळ न समजणाऱ्यांसाठी सांगताना रमणी गुरुजींनी म्हटले, 'समस्त महर्षींचे आशीर्वाद तुला या नाडीवरील कामामुळे लाभले असल्याने, यापुढे तू हे काम निष्काम भावनेने करशील तेंव्हा तेंव्हा तुला आमची सतत मदत होईल' असा आश्वासक आशीर्वाद दिला. तेथल्या तेथे अनेक प्रती विकत गेल्या. होता होता आज अशी वेळ आली आहे की माझ्याजवळ तमिळच्या दोन हजारापैकी व मराठीतील पहिल्या आवृत्तीच्या पाच हजारापैकी फक्त एक-एक प्रत आठवण म्हणून शिल्लक आहे.

"तेरा काम हो जाएगा" या योगी राम सूरत कुमारांच्या विधानाचा प्रत्यय मला वेळोवेळी असा आला व पुढेही येत राहिला. हिंदीतील पुस्तक कसे आश्चर्यकारकपणे प्रसिद्ध झाले. नाडी भविष्याच्या संदर्भातील झालेल्या संपूर्ण पत्रव्यवहारावर आधारित "बोध अंधश्रद्धेचा" या पुस्तकाने अंनिसची त्रेधा तिरपिट कशी उडवली व भल्या भल्यांची कशी भंबेरी उडवली त्याचा इतिहास, 'इतिहास पत्रिका प्रकाशन' ठाणेतर्फे डॉ. विजय बेडेकरांनी रचला ते यथावकाश कळेल.

## 33. प्रेरणा डॉ. विजय बेडेकरांची- बोध अंधश्रद्धेचा




**Figure 22 अंनिसचा पराभव केला म्हणणारे एकमेव पुस्तक**

**..."महाराष्ट्र अंधश्रद्धा निर्मूलन समिती" ही एक "सर्कस" आहे... इति - बोध अंधश्रद्धेचा...**

नाडीग्रथांवरील माझे लेखन वाचून एकदा सांगलीच्या श्री कुंभोजकरांनी कळवले की डॉ. जयंत नारळीकरांना आम्ही मानतो. त्यांचे मत आपण घ्यावे. त्यांनी जर नाडीभविष्याच्या अदभूततेला मान्यता दिली तर आमच्या सारख्यांना आपल्या लेखनावर विश्वास ठेवायला सोईचे जाईल. त्यांच्या प्रतिक्रियेचा मान ठेवून मी डॉ. नारळीकरांची प्रत्यक्ष भेट

घेऊन त्यांना माझे 'चक्रावून टाकणारा चमत्कार - नाडी भविष्य' पुस्तक सप्रेम भेट दिले. त्यांनी मला आपला नकारात्मक अभिप्राय लेखी कळवून व अंनिसला त्या पत्राची प्रत पाठवून या विषयाची बोळवण केली.
त्यानंतर अंनिसचे कार्यवाह डॉ. दाभोळकरांनी पत्रव्यवहारातून, दै. पुढारी, अंनिवार्तापत्रातून भले मोठे लेख लिहून व चर्चा, सभा आयोजित करून हा विषय अंनिसच्या मुख्य कार्यावळीवर ठेवला. नंतर ज्योतिषशास्त्राच्या संदर्भातील अंनिसचा गड सांभाळणाऱ्या त्यांच्या दोन शिलेदारांनी पुढे लेखन कार्य चालू ठेवले. फारच गवगवा झाल्यावर ओंकार पाटील नामक व्यक्तीने तांबरमच्या नाडीकेंद्रास भेट देऊन नाडी भविष्यावर अंनिसची ऑफिशियल मतमांडणी केली. त्यावर पुस्तक ही प्रकाशित झाले.
एका बाजूला हे सर्व होत असताना ठाण्याच्या डॉ. विजय बेडेकरांनी अंनिसच्या विविध प्रकरणांतील खरेखोटेपणावर प्रकाश टाकणारे 'शोध अंधश्रद्धेचा' नावाचे पुस्तक प्रकाशित केले होते. नाडीग्रंथ भविष्यावरील प्रकरणात अंनिसशी झालेला प्रदीर्घ पत्रव्यवहार व अन्य लेखनावर आधारित एकूण 70 परिशिष्ठांनी गच्च भरलेला आहे. तो पाहून त्याचे पुस्तकात रुपांतर करणे ही ऐतिहासिक गरज आहे असे वाटून त्यांनी प्रकाशन करायचा निश्चय केला व 26 जानेवारी 1999 ला 'बोध अंधश्रद्धेचा अर्थात नाडी भविष्याने केला अंनिसचा पराभव' या उपशीर्षकाचे पुस्तक तयार झाले. (किंमत 150 रुपये.) त्याची एक प्रत दाभोळकरांना दिली गेली. त्यानंतर त्यांनी लिहिलेल्या (लढे अंधश्रद्धेचे - पान 157)पुस्तकात या पुस्तकातील माझ्या पत्र लेखनाचा तिरकसपणे उल्लेख करून दखल घेतली गेली. परंतु मी त्यांना दिलेल्या उत्तराची मात्र दखल न घेता तेच तेच घिसेपिचे आरोप करून त्यांनी आपले तुणतुणे त्यापुस्तकांतून प्रकाशित केले. मात्र त्यानंतर ते वा त्यांचे चेले नाडी ग्रंथांच्याशी आपले काही देणे घेणे नाही असे दाखवून आहेत.

'बोध अंधश्रद्धेचा' पुस्तकाच्या मागील कव्हरवरील खालील मजकूर सर्व सांगून जाईल. खरे तर मला याबाबत आणखी लिहायला रस नाही. तरीही या लेखमालेचा भाग म्हणून मी या पुस्तकाच्या संदर्भातील छोटी झलक दाखवतो. अर्थात वाचकांना या विषयावर अधिक माहिती माझ्या या पुस्तकातून उपलब्ध होईल. ती त्यांनी वाचावी ही विनंती.

**"अंनिस सर्कस" ओकांचे बोलके पत्र**




Figure **49 अन्नमलाईचे मंदिर मागे शिवरुप अरुणागिरी पहाड**

**नाडी ग्रंथांनी केला अंनिसचा पराभव उर्फ <u>बोध अंधश्रद्धेचा नावाचे पुस्तक अंनिसच्या कार्यवाहांनी आणि त्यांच्या चेल्यांनी केलेला पत्रव्यवहारावरील आधारित पुस्तकातील परिशिष्ट क्रमांक 4 - 14 बोध अंधश्रद्धेचा पान 180</u>**

* डॉ. नरेंद्र दाभोळकरांना, तांबरम, दि. 25 -11-1995

स.न.वि.वि.

दि. 21-11 चे आपल्या हस्ताक्षरातील, साध्या लेटर पॅडवरील कागदाचे - बॉन्डपेपरवर नव्हे- पत्र मिळाले. असे पुर्वी दिसून आले आहे की, आपल्या पत्रातील शेवटची ओळ मला जास्त लिहायला प्रवृत्त करते. त्या पत्रातील शेवटची ओळ की ... 'सत्य तपासण्याच्या रिंगणात यावे ही विनंती'.... अशीच स्फूर्ती देऊन गेली.

असे वाटले की, 'महाराष्ट्र अंधश्रद्धा निर्मूलन समिती' ही एक सर्कस आहे. त्यात विविध तऱ्हेच्या अंधश्रद्धांविरुद्ध खेळ खेळले जातात व सभोवताली जमलेल्यांचे त्याद्वारे मनोरंजन केले जाते. अर्थातच अंनिससर्कस मधील खेळाडू विविध (मखलाशीपूर्ण) कसरती करण्यात तरबेज असतात. नंतर हुकमी टाळ्या मिळवण्याच्या तंत्रात अत्यंत प्रवीण असतात. सर्कसचे सर्वात मोठे आकर्षण हे त्यांचा 'जनावरखाना' असून त्यांना रिंगणात आणून हातातील जबरदस्त आसूडाद्वारे सर्व हिंस्त्र व क्रूर श्वापदांना आपल्या हुकुमावर नाचवायचे जोखमीचे व दिमाखाचे काम त्या सर्कसचा कार्यवाह – "रिंगमास्टर" करतो. या रोलमधे आपण स्वतः रिंगणात हजेरी लावता. आसूडाच्या व काठीच्या दरडावणीने अवघड व जीवघेण्या कवायती लीलया करवून टाळ्या मिळवता. आत्ता पर्यंतचा हा आपला अनुभव असल्याने आणि आपणच या सर्कसचे रिंमास्टर असल्याने, 'माझा रिंगणात या, मग मी तुम्हाला कसे लोळवतो ते पहा' असा आपला पवित्रा तुमच्या दृष्टीने शास्त्रीय पायावर आधारित पण भविष्यकाळात कसेही करून अंग काढून पसार होण्यास सोईचा आहे. तथापि 'नाडी भविष्य' हा काही तुमच्या पिंजऱ्यात बाळगलेला सिंह नाही. त्यामुळे त्याने 'गपगुमान' तुम्ही रचलेल्या रिंगणात यावे व चुपचाप तुमच्या तालावर नाचावे असे स्वप्न बाळगून असाल तर ती आपली घोर चूक आहे.

या इथे 'नाडी भविष्यकर्ते महर्षी' हे "रिंगमास्टर" आहेत. भविष्याच्या आसूडाला तो 'थोतांड' म्हणून आव्हान देऊन आपण रिंगणात उतरला आहात. वर्तमानपत्रातून परिपत्रके व लेख लिहून व मला मधे घालून, 'पहा या रिंग मास्टरची कशी ऐशी की तैशी करतो. नाहीतर 5 लाख देतो' असे डरकाळ्या फोडणारे आवाज आपण वेळोवेळी करता. या सर्व परिस्थिती मी रिंगणात कसा? नाडीकेंद्रे जेथे आहेत तेथे कूटलिपी वाचणारे उपलब्ध आहेत. अशा विविध केंद्रांना भेटून एकच पट्टी विविध नाडीवाचकांनाकडून वाचवून घेऊन त्यातील मजकुरातील सत्यता, अर्थवत्तता अचूक व तात्काळ काढता येते. हे आपणांस चांगलेच ठाऊक आहे. एरव्ही मीच रिंग मास्टर, माझीच सर्कस, माझेच रिंगण आणि माझेच टाळ्या पिटू प्रेक्षक याच कूपात राहून मग शास्त्रीय संशोधनाचे नाटक कशाला?

याचे साधे कारण हे की नाडी केंद्रास भेट देण्यास यायचे नाही व अंनिसचे तोंडकाळे करून घ्यायचे नाही. आपल्या अंनिस सर्कसचे चालायचे दिवस आता फार जिकिरीचे झाले आहेत. प्रवीण कसरतपटू शिष्यगण आपणांस सोडून गेले आहेत. इतर शिलेदारांनाही आपल्या आसुडाचा बेगडीपणा लक्षांत आला आहे. वर्तमानपत्रवाले एकजात आपल्या विविध क्लुप्त्यांना आपल्या मागे कुत्सितपणे हसून नावे ठेवतात, मात्र तोंडावर व वर्तमानपत्रातून नावे ठेवायला आपल्या सर्कसचा दरारा मोठा असल्याने टाळतात. पण जे आपल्या कल्पनाविश्वात तल्लीन असतात अशा आपणांस हे लक्षात आलेले नाही.

आपण माझ्या लांबलचक पत्रे पाठवण्याची टिंगल करता पण आपल्या पत्रातील पोकळ व खोटारड्या मुद्यांची खबर घेणे क्रमप्राप्त होते. असो, आता आपल्या 21-11 च्या पत्रातील मुद्यांकडे वळतो.

मुद्दा क्रमांक 3 मध्ये आपल्या … 'भाषा कूट तमिळी जाहीर करून आमच्या प्रतिपादनालाच पुर्ण बळकटी मिळते' हे आपल्या लक्षात येत असेलच… या विधानाला मी फार महत्वाचे मानतो. या वाक्यावरून 30-9 (1995) च्या सभेत उपस्थित 3 तमिळांनी नाडीपट्यातील भाषा तमिळच आहे या पुराव्याला आपण मान्य केले आहे हे सिद्ध होते. कारण ज्या डॉ. नारळीकरांनी नाडीपट्ट्यातील भाषा (देखील) तमिळ नाही असे म्हणून नाडीभविष्याला Hoax असा शिक्कामोर्तब केले ते विधान खोटे होते हे सिद्ध होते. हे सिद्ध झाले, असे आपण मानता असे म्हणावे लागेल. ज्या नारळीकरांच्या दोन निष्कर्षांवर अवलंबून आपणही नाडीभविष्याला फसवाफसवी वा थोतांड मानता त्यातील They could not ( a) read the script as Tamil- हे विधान त्यांनी परत घ्यावे असे आपण त्यांना आवाहन करावे. उरला प्रश्न त्या पट्टीतील मजकूराचा की ज्यात आपल्याला फोटोत शशिकांत असा मजकूर आहे असे मी किंवा नाडीवाचक म्हणतात त्याची खात्री करणे. अशी खात्री करण्याची वेळ आलीच तर, 'ओरिजनल पट्टया-पुरावा पहायला दि. 2-4च्या पत्राप्रमाणे येण्याचे आपण मान्य केले होते. दि. 9-5च्या पत्रात "माहिती अचुक निघाल्यावर तमिळनाडूला येऊन पट्ट्या तपासणे (करावे लागेल)"…. असे मान्य केले आहेत. मात्र आपण पाठवत असलेल्या ठशांच्या संदर्भात नाडीपट्यांची माहिती-फोटो पाठवण्याचे मी कधीच मान्य केलेले नाही. तरीही एका उपलब्ध नाडीपट्टीचा फोटो व त्यातील मजकूराचे रोमन स्क्रीप्ट व इंग्रजी अर्थ आपणांस पाठवला होता. आता तो मजकूर तमिळमधलाच असूनही खुद्द तमिळनाडूतील तमिळांना वाचता येत नसताना (पुण्यातील तमिळांनी तर तसे लेखी दिल्याने) आता येथे न येण्याचे एकही कारण आपणांस राहत नाही. उलट मुद्दा क्रमांक 1 मधे … "आमचा प्रतिनिधी मद्रासला येणे पूर्ण गौण आहे"… असे निर्लज्ज विधान करून विलंब का? असा जाब मलाच जाब विचारता? खरेतर हा विलंब का असे विचारण्याची हक्क माझा आहे.




**Figure 23 एका नाडीग्रंथ पट्टीचा फोटो. उदय व्यक्तीचे नाव कोरून कसे लिहिलेले असते याचा पुरावा. त्याच्या खाली तेच लेखन एका वहीत लिहून दिले जाते, ते कसे दिसते याचाही पुरावा सादर केला आहे**

'नाडी भविष्य' हा चमत्कार आहे याची आपणांस संपुर्णतः खात्री झालेली आहे. त्यामुळे आता कसेही करून पळवाट काढून नाडीकेंद्रांस भेट देण्याचे टाळण्याचे तंत्र वापरायला कितीही खालच्या थराला जावे लागले तरी चालेल असा आपला पवित्रा आहे. यासाठी नाडीपट्यात माहिती आपणांकडून काढून ती परत सांगितली जाते हे कारण (आपण)पुढे करता. मग असे शेकडो वर्षे लाखो लोकांच्या संदर्भात होत असूनही आत्तापर्यंत कोणीही या फसवणूकीची पोलिस केस का केलेली नाही? Alive या मासिकाच्या किरकोळ स्तंभावरील एक कात्रण व कोवूर यांचा अंदाज हेच जर आपले याबाबतचे पुरावे असतील तर त्यांचा सच्चेपणा आपणांस ताडून पहायला नको का? 30-9 -95 च्या सभेत डॉ. बोरकरासह सर्व अंनिसच्या कार्यकर्त्यांनी नाडीकेंद्रास भेट देण्यास येणे अत्यंत आवश्यक आहे व ठसे पाठवून ओकांवर हे काम सोपवण्याचे धोरण मुळातच चुकीचे आहे असे मान्य केले आहे. आता माझ्या नाही तरी निदान आपल्याच कार्यकर्त्यांचा मान नको का राखायला? आपल्याच साथिदारांची आपण किती वेळ प्रतारणा करणार? त्यांच्यातील

काहींनी येथे येऊन तपासणीकरून चमत्कार असल्याचे मान्य केले तर त्यांना काय आपण समितीतून काढणार?
मुद्दा क्रमांक 2 कडे आता आता वळतो.
शनिवार दि. 30-9(1995) ची साप्ताहिक (बैठक?) सभा 'मामुली' होती असा टोन ध्वनित करून, पत्रकार परिषद घेणे व वर्तमानपत्रात बातमी छापवून आणि त्यावरही या सभेला आपण गौण महत्व दिलेत. मात्र बरेच पत्रकार व उपस्थित श्रोत्यांना आपल्या उपस्थितीची खात्री होती. अशा वातावरणांत आपली अनुपस्थिती असभ्यतेचे लक्षण होते. या उलट मी या सभेला एक प्रेक्षक म्हणून आवर्जून उपस्थित होतो. सभेचे कामकाज सुरु झाल्यावर मग डॉ. बोरकरांशी ओळख करून नाडी भविष्य या पुस्तकाचा लेखक म्हणून मी त्यांच्या सर्वसंमतीने भाषणास सुरवात केली. मात्र सभेच्या मुख्यकार्याला त्यामुळे मुळीच बाधा आली नाही. उलट श्रोत्यांना या सभेच्या व उपस्थित पुणेरी तमिळांनी त्या फोटोवाचन करण्यामागचा महत्वाचा उद्देश व पुर्व पीठिका सर्व विदित झाली. आपल्या उपस्थित कार्यकर्त्यांच्या व श्रोत्यांच्यावतीने डॉ. बोरकरांनी माझे आभार मानून धन्यवाद दिले. आपण मात्र मी सभेत 'घुसलो' असा मनघडंत आरोप केलात. यावरून आपली मानसिक स्थिती बरीच खालावलेली वाटते. पत्र लिहिताना जरी 'थोडे हसू व बरीच कीव' आली असली तरी माझ्या त्यासभेतील भाषणाने व पुणेरी तमिळांनी पट्टयातील भाषा तमिळच असल्याचा लेखी पुरावा सादर केल्याने आपला बराच तिळपापड झाला हे त्या एका शब्दाने चांगलेच लक्षात येते.
आपण स्वतः हजर न राहण्याचा 'पळपुटेपणा' केला असताना तुमच्या अपरोक्ष मी सभेत 'वाद घालायला गेलो' हा (ओकांचा) पळपुटेपणा म्हणण्याचा साळसूदपणा आपली बुद्धी चक्रम झाल्याचे द्योतक आहे. असे दुःखाने म्हणावे लागते.
By the way, पुर्वीच्या 27-7(1995)च्या पत्रात व 16-7च्या पुढारीमधील लेखात रेडिओ कार्बन टेस्टबद्दल मला 'आपण अगदीच कसे विसरलात?' असा प्रश्नार्थी टोमणा मारता आहेत. मी Mr. Marvin Mills यांना पाठवलेले पत्र (कॉपी) आपणांस मिळाले असेलच. आता आपण आपल्या माहितीच्या संस्थांचे पत्ते व त्यांच्याशी संपर्क करण्यासाठी मला ते पत्ते पाठवण्याचे अगदीच कसे विसरलात? मात्र यासाठी होणाऱ्या टेस्टसाठी नाडीपट्ट्यांचे प्रूफ घेण्यास आपण स्वतःजातीने हजर असलेच पाहिजेत. कारण त्याशिवाय कार्बन 14टेस्टचा निकाल काहीही लागला तरी तो अमान्य करण्याची मखलशी आपण लीलया करू शकता.
**तेंव्हा आपल्याच कार्यकर्त्यांकडून अपमानकारक वागणूक मिळण्याआधी आनंदाने, स्वच्छ व पूर्वग्रह न ठेवता येथे या. येताना हवे तेवढे अंगठे ठसे आणा. आपणच खात्री करा. आव्हान आपण देता, मग हे सर्व निस्तरणे आपलेच काम आहे. 'ओकांची मदत आहे/होती पण नाडी भविष्य मी (तुम्ही)पाहिले आहे' असे आपण मग छातीठोकपणे आपल्या कार्यकर्त्यांना सांगू शकाल. तेंव्हा पुढील पत्रात आपण केंव्हा येताय ते वाचायला मला आवडेल.
आपला स्नेहाभिलाषि,
शशिकांत ओक

---

*टीप - अंनिसला सर्कस असे या पत्रातून म्हटले गेले त्याची दखल प्रकाश घाटपांडे यांनी अंनिवार्तापत्रातील एका लेखातून घेतली. मूळ शीर्षक शिव्या कढीला ऊत हा मथळा बदलून 'विंग कमांडरांचा बहुरंगी वग (ढोलकी:खुद्द प्राचार्य गळतगे ) असा नवा मथळा दिलेला आढळून येतो. या गोष्टीची सुचना (कै) रिसबुडांनी गळतगे यांना लगोलग लिहिलेल्या 9 पोस्टकार्डांमधील 16-3-1996च्या मजकुरातून मिळते. ते म्हणतात, 'ओक तमाशा फड उभा करतात आणि तुम्ही ढोलकी वाजवून साथ करता ! What a shame!' ... यावर गळतगे म्हणतात, आम्ही नाडीविषयी मांडलेले पुरावे खोडून काढता न आल्यामुळे पुराव्यांची जागा अशा उपमा अलंकारांनी भरून काढू पाहणाऱ्या अंनिसच्या रिसबुडांचीच तर ही मोठीच शेम आहे..... शिवाय गळतगे म्हणतात, माझे अंनिसशी कसलेही भांडण नाही. माझे भांडण पुराव्या शिवाय एखाद्या (असत्य) गोष्टीचा, प्रचार करणाऱ्यांशी आहे. जो पुराव्याशिवाय बोलतो त्यालाच भोळसट व अंधश्रद्ध म्हणतात. ...पुरावे सादर करण्याची जबाबदारी रिसबुड व अंनिस कधीच टाळू शकणार नाहीत. तर्कवाद करून प्रतिपक्षाला शिव्या देऊन किंवा ज्योतिषशास्त्रातील माहितीचे बुजगावणे दाखवून, ही जबाबदारी टाळू पहाणे हा शुद्ध पलायन वाद आहे. (संदर्भ – विज्ञान आणि अंनि.– अंनिसचा खरा चेहरा. आवृत्ती 2 परिशिष्ठ - 4, पान 188,190)

** वरील 'सर्कसच्या' कडक पत्रानंतर काहीतरी तातडीने करावे लागेल असे वाटून आधी सातारच्या श्री. श्रीकांत शहांना पाठवले गेले. तांबरमच्या नाडीकेंद्रासाठी काही अंगठ्याचे ठसे देऊन सबंधित व्यक्तींचे भविष्य शोधायचे वेळकाढू काम श्री. शहाना दिले होते. त्यांना शारीरिक कारणासाठी स्वतःची नाडीपट्टी पहाण्यात रस होता. मात्र इतरांसाठी पट्टी शोधायला 'वेळ नाही' या कारणास्तव त्यांनी अंनिसतर्फे करायच्या शोधकामात कुचराईकरून ठसे तिथे न देता माझ्या घरी येऊन देऊ केले, मी ते घेण्याचे व त्या अंगठ्याच्याबद्दलची नाडीपट्टी शोधायचे काम करायचे नाकारले. या उलट ते ज्या श्री. अशोक अकोलकरांबरोबर आले होते त्यांची नाडपट्टी सापडली व त्याचा प्रत्यक्ष अनुभव मिळाल्याने नाडी भविष्य कथन कसे आश्चर्यपुर्ण असते याचा अनुभव त्यांना आला होता. मला ते दोघे घरी एकत्र भेटायला आले असता नाडीबद्दलचे 'आश्चर्यकारक सत्य' असे श्री. अशोक अकोलकरांचे मत

त्यांना मान्य असल्याचे कबूल केले. मात्र नंतर  सातारला परतल्यावर त्यांनी माझ्याशी बोलताना व्यक्त केलेल्या मताविपरीत पत्र पाठवून आपला निषेध नोंदवला होता! त्याचा खरपुस समाचार घेतल्यावर, नाईलाजाने ओंकारांची नाडीला खोटे ठरवायला नेमणूक झाली होती. त्यांनी आपल्यापुरते ते काम प्रामाणिकपणे केले. पण अन्य अंगठ्याचे ठशांबाबत जे करायला मला उद्युक्त केले जात असे, ते मात्र त्यांनी केले नाही. त्यांच्या स्वतःच्या नाडीपट्टीमधील मजकूर अन्य नाडीवाचकांकडून किंवा तमिल जाणकाराकडून वाचवून नावाची खात्री केली नाही.  नाडीपट्टीचा फोटो व वहीचे नमुने पुरावा म्हणून सादर केले नाहीत. पण फक्त टेप करून मिळवलेल्या संभाषणावरून निश्कर्ष काढताना असा रंग दिला की त्यांचा अनुभव थोतांड वाटावा. तोही कसा एकांगी होता   **ते पुढे वाचा.**

## 34.नावडतीचे मीठ अळणी!

'नावडतीचे मीठ 'अळणी' म्हण सहज आठवली...

पुरुषांना एक आवडती तर दुसरी नावडती असे असते. निदान खाण्याच्या बाबतीत तरी. एक आई व दुसरी पत्नी. पैकी कोणीतरी आवडते असेल तर दुसरे नावडते ठरते.

एकीचा स्वैपाक मिळमिळीत तर दुसरीचा चवदार वाटतो. नावडतीने कितीही मनलाऊन पदार्थ बनवला तरी त्यात काहीतरी उणे काढले जाते असे म्हण सुचवते. असो.

तीच गोष्ट अन्य ठिकाणीही लागू होते असे व्यवहारात दिसते. एखाद्या गोष्टीचा तिटकारा निर्माण झाला की त्याला नावे ठेवण्यासाठी मनात कल्पना विस्तार सुरू होतो. नाडी ग्रंथांना असेच नावडतेपण सहन करावे लागते.

नावडतीच्या स्वयंपाकातील मीठासारखा पदार्थ, जो तयार होण्यात नावडतीचा अजिबात संबंध नसतो, तरीही तिला बोल लावायला ते कारण सोईचे जाते म्हणून वापरले जाते. म्हणीत निदान पदार्थाची चव घेऊन म्हटले जाते असे सूचित होते. नाडी ग्रंथाबाबत (नावडतीच्या) कथनांची (चव) अनुभव घ्यायची तसदी न घेता नाडीतील संकल्पनांचे 'मीठ अळणी' म्हणून संभावना करताना पाहून ती म्हण अन्य कारणांना देखील कशी चपखल लागू पडते याचा प्रत्यय येतो. नाडीग्रंथावर एक कार्यशाळा पुणे मुक्कामी झाली. इच्छुकांनी त्यात काय घडले हे माहिती करून घ्यायला काय हरकत आहे? निदान नाडीग्रंथांचे मीठ अळणी आहे का नाही याचा अनुभव येईल.

टीप - या कार्यशाळेत अनेकांच्या मुलाखती व्हीडिओटेप झाल्या. त्यातील काहींच्या संक्षिप्त मुलाखती इथे सादर केल्या आहेत. ज्यांना पूर्ण पहायच्या असतील त्यांनी ईमेल - shashioak@gmail.com वर संपर्क करावा

## 35.फलज्योतिष – एक पंच बॅग - बडवणे -

एखाद्या घरातील खाष्ट सासू सोशिक सुनेवर डाफरायला जशी इतर काही कारण मिळाले नाही की 'जेवणात मीठ कमी' नामक केंव्हाही वापरता येणाऱ्या बडवण्याने सुनेचा उद्धार करायला सदैव तयार असते तसे बुद्धिवादी, निरीश्वरवाद्यांकडे "फलज्योतिष" हे एक "पंच बॅग -" हत्यार तयार असते. त्याचा वापर ते व प्रसिद्धी माध्यमे त्यांना हवा तसा हवा तेंव्हा करून घेतात.

मात्र खाष्ट सासूच्या मुलाला आपलेसे करून सून तिला जशी चुप करते, तसे फलज्योतिषी नाड़ीग्रंथांच्या मदतीने विरोधकांना चुप करतात. आपल्याकडून माहिती काढून तीच परत आपल्याला नाडीभविष्य म्हणून सांगतात या पलिकडे विरोधकांकडे नाडीग्रंथांना नावे ठेवायला कारण मिळत नाही. आपण शोधकार्य केल्याचे ते म्हणतात. पण नाडी ग्रंथात व्यक्तीची नावे कोरुन कशी येतात? यावर भाषा-लिपीचे तज्ज्ञ मिळत नाहीत अशा सबबी सांगून ते नाडीग्रंथाकडे सोईने दुर्लक्ष करतात. नाडीग्रंथांकडे फलज्योतिषांनी सहानुभूतीने पहाण्यात त्यांचे हित आहे याची जाणीव त्यांना हळूहळू होत आहे.

-----------------------------------------------------------------

Figure 51 तमिल मधील नाडी सोतिडम - अतीशय कन्निपिडिप्पू



## 36. मुकाबला ए कव्वाली




**ज्योतिष एक प्रकांड शास्त्र आहे ।** **ज्योतिष एक थोतांड शास्त्र आहे।।**

कव्वाली गान प्रकारात एका विषयावर आपापली मते काव्यात गुंफून टाळ्यांच्या हेकेखोर तालावर दोन बाजू मांडल्या जातात. प्यार ही 'कामकी' चीज़ आहे असे एक बाजूचे म्हणतात तर दुसऱ्या बाजूचे बस 'नामकी' चीज़ असा सूर लावतात. असाच एक विषय आहे. फलज्योतिष....

ग्रह-तारे यांचा मानवी जीवनावर प्रभाव पडतो काय? अथवा नाही? यावर चर्चा रंगतात. तो प्रत्यक्षात तसा पडत नाही असे जाणवते. तरीही तो पडतो असे म्हणणाऱ्यांचे काय कारण असावे?

आपण एक उदहरण घेऊ. असे पहा की एखाद्या गजबजलेल्या चौकात लाल दिवा बंद होण्याची वाट पहाणारे वाहनचालक तो हिरवा होताच आपापली वाहने दामटतात. आता लाल दिव्यात वाहने थांबवण्याचा वा हिरव्या दिव्यात त्यांना जाऊ देण्याचा प्रभाव टाकायची 'शक्ती' आहे. कारण त्याप्रमाणे वाहने नियंत्रित होताना दिसतात. एकदा तशी प्रभाव-शक्ती आहे असे म्हटले तर मग ती शक्ती स्पंदनाच्या, लहरीच्या किंवा आणखी कुठल्या रुपाने अस्तित्वात आहे असे विविध तर्क द्यावे लागतात. पण तशी काही प्रभाव-शक्ती नाही हे जनसामान्याला कळते. मग ते आहे काय?

दिव्यांच्या रंगांनी वाहतूक नियंत्रण करणारी एक व्यवस्था तयार केली गेली आहे. त्या व्यवस्थेची माहिती वाहनचालकांना आहे. म्हणून ते ते रंग चालकांच्या गतीवर प्रभाव टाकतात. त्या त्या रंगातील लहरी वा स्पंदनामुळे नाही. एखादे आजोबा सहाच्या भोंग्याला पहाटे फिरायला जाताना दिसतात. तेंव्हा त्या भोंग्यातील ध्वनीकंपने त्यांच्यावर प्रभाव शक्ती टाकून फिरायला जायला भाग पाडतात असे त्याचे कारण नसून भोंग्याच्या आवाजावर फिरायला निघायचे असा परिवाठ वा व्यवस्था आजोबांनी ठरवली म्हणून तसे घडते.

फलज्योतिष अशीच एक व्यवस्था आहे असे मानले तर? जीवनाचा मीटर डाऊन होतो तो जन्माने. त्यावेळी अवकाशात ग्रह गोलांची काय स्थिती होती ती आणि जीवनातील विविध समस्यांच्या काळातील त्यावेळची ग्रहगोलांची

परिस्थिती याला कुंडली किंवा पत्रिकेच्या रुपात तयार करून यांच्या एकमेंकांशी असलेल्या परस्पर संबंधांना, व्यवस्थेच्या आडाख्यातून पुर्वसुरींनी सूत्रे बांधली असावीत. अमुक अमुक अशी ग्रहांची अवकाशात स्थिती असेल आणि जर व्यक्तिच्या जन्म कुंडलीतील तमुक तमुक ग्रहदशा असेल तर त्याचा विवाहयोग घडून येण्याची शक्यता निर्माण होते. असा सूत्ररुपाने आडाखा ज्या व्यक्तिना अभ्यास करून लावता येतो ते त्यानुसार आपले अंदाज व्यक्त करतात.

हिरवा दिवा झाला म्हणून वाहन चौकातून पुढे जाईलच असे नाही. कारण यंत्रशक्तीत बिघाड झाला, इंधन संपले अशा अनेक कारणानी वाहतूक व्यवस्थेला बाधा येईल. कधी कधी एखाद्या वाहनाला चौकातून पुढे गेल्यावर अपघात झाला. तर त्या अपघाताला आधीच्या चौकातील हिरव्यारंगाच्या दिव्याला जबाबदार धरता येणार नाही किंवा अशा विविध कारणांसाठी नियंत्रण व्यवस्थेला दोष देता येणार नाही. तसेच विविध सूत्राद्वारे पत्रिकेत योग दिसले तरी अन्य कारणे जास्त प्रभावी असतील तर तो योग घडणार नाही किंवा पुढे-मागे, कमी-जास्त होऊन घडेल. अशा परिस्थितीत फल ज्योतिष नामक व्यवस्थेला दोष देणे हे कितपत योग्य याचा विचार व्हावा.

प्राचार्य अद्वयानंद गळतगे यांनी व्यवस्था थियरी बाबत यांच्या ‘विज्ञान आणि चमत्कार’ नामक ग्रंथात योगी अरविंदांनी दिलेल्या उद्धरणांचा संदर्भ दिला आहे.

ज्यांना ग्रहगोलांच्या नकाशाच्या कुंडल्या वा पत्रिकांचे कागद जाळून वा फलज्योतिष या व्यवस्थेला नाकारून कव्वालीला रंग भरायचा आहे, त्यांना कोणता लाल दिवा थांबवणार?

टीप – माझ्या वरील कथनावर विचार करता अनेकांना असा संभ्रम निर्माण होईल की जर ग्रह – तारे मानवीजीवनावर प्रभाव टाकत नसतील तर मग नाडी ग्रंथांत विविध ग्रहांच्या मंदिरांना भेटी व शांती परिहार सांगितला जातो त्याचा उपयोग काय? या समस्येची उकल प्राचार्य अद्वयानंद गळतगे यांनी करावी अशी विनंती ओकांनी केली त्याला उत्तर म्हणून गळतगे सरांनी ‘नाडीभविष्य आणि नवग्रहशांती अर्थात कर्ममहात्म्य.’ शीर्षकाचा लेख पाठवला तो प्रकरण 39 मधे वाचावा.

---

## 38. श्री. ओंकारांची नाडी परीक्षा

आत्तापर्यंत अनेकांनी नाडीग्रंथांची परीक्षा घेतल्याचे दावे केले आहेत. अब्राहम कोवूर, बी. प्रेमानंद, यांपासून ते ओंकारापर्यंत अनेकांनी. खुद्द ओकांसकट प्रत्येकानी नाडी ग्रंथांना खोटे ठरवायचा चंग बांधला होता. यापुढेही लोक असा प्रयत्न जरूर करतील. त्यांनी तो जरूर करावा.

माझी त्यांना एक विनंती आहे की आपण नाडी ग्रंथ केंद्रांना, तेथील कामकरणाऱ्या नाडी ग्रंथ वाचकांना, त्यांच्या वाचनातील वा पट्टी शोधण्याच्यापद्धतीतील त्रुटींना जरुर प्रकाशात आणावे. पण त्यांच्या त्या त्रुटींना नाडीग्रंथांच्या खोटेपणाचे आवरण देऊ नये. नाडी शास्त्रींचा व्यावसायिक हेतू, त्यांच्या-आपणातील भाषेच्यामुळे दुराव्यामुळे निर्माण होणाऱ्यासमस्या यांचे भांडवल करून नाडी महर्षींच्या कार्याला थोतांड म्हणून गणले जाऊ नये. नाडीग्रंथांच्या कुटलिपीतील अर्थवत्तता व काव्यात्मक गाभ्याच्या बाजूने पहावे. असे सुचवावेसे वाटते.

नुकताच ओंकार पाटलांच्या नाडी परीक्षेचा लेख पुन्हा वाचनात आला. खरेतर यावर त्यांच्या लेखातील फोलपणा दाखवून देणारा लेख मी पुर्वीच प्रकाशित केला आहे. तरीही काही नव्या वाचक लोकांच्या समाधानासाठी खालील विचार व्यक्त करत आहे.

***ओंकारांनी नाडी ग्रंथांना खोटे ठरवायला काय परीक्षा केली ?**

१) तांबरमच्या नाडीकेंद्रात जाऊन एक टेप रेकॉरेडर लपवून नाडी पट्टीच्या अगदी पहिल्या विचारणेपासून रेकॉर्ड केलेले संभाषण लेखाच्या रुपात सादर केले.

२) त्या विचारणेतून मिळालेल्या माहितीतील माहितीच पुन्हा आपणांस एका विशिष्ठ ताडपट्टीतून आली आहे असे भासवून सांगण्यात आले, असा त्यांचा दावा आहे.

३) शिवाय गिंडीतील एका केंद्रातील माहितीतून त्यांना नाडीग्रंथांबद्दल काय वाटले ते त्यांनी शेवटी सादर केले

**आपल्या लेखात ओंकारांनी वाचकांना काय काय उल्लेखले नाही?**

नाडी वाचकाबरोबर झालेले सर्व संभाषण चोरून टेप करायची काही गरज नव्हती. कारण त्यांच्या टेबलावर टेपरेकॉर्डर सदैव असतोच. तोच त्यांना अगदी सुरवातीच्या पट्टी शोधण्यापासून चालू ठेवायला सांगून टेपरेकॉर्डिंगचे काम उघडपणे करता आले असते. त्यांना विनंती केली तर ते तसे करून देतात. नंतर ओकारांना त्यांची पट्टी सापडली असे केंद्रवाल्यांनी म्हटल्यावर त्यांच्यासाठीच्या ताडपट्टीतून लिहून आलेला मजकूर एका ४० पानी वही दिला जातो हे त्यांना मान्य आहे का नाही?. मान्य असेल तर त्यांची पट्टी सापडली असा त्यांचा दावा असेल तर तशी वही त्यांना मिळाली काय? मिळवली असेल तर त्यानी त्यांनी लेखात न सांगून का लपवले? नसेल दिली गेली असा त्यांचा दावा असेल तर त्यांनी ती का मागितली नाही? त्याशिवाय भाषांतर केलेली टेपही नंतर दिली गेली होती की नाही? असेल तर त्याचा उल्लेख त्यांनी का टाळला? कारण त्यांच्या मते जर नाडी ग्रंथ ही लबाडी असेल तर त्यांनी दिलेली वा नाडी केंद्रातून मिळवलेली प्रत्येक गोष्ट व वस्तू नाडीग्रंथांना खोटे ठरवायला पुरावा म्हणून उपयोग करता येतो हे त्यांच्या सारख्या कांगावखोर विरोधकांना वेगळे सांगायला नको. मिळालेल्या भविष्य कथनाच्या वही व टेपची तपासणी त्यांनी केली असे त्यांनी म्हटलेले नाही. तमिळभाषेचे लोक आम्हाला मिळत नाहीत ही सबब लंगडी आहे. जी संस्था लाखोंचे आव्हान देते त्यांनी असे म्हणणे अशोभनीय आहे.

ओंकारांनी जो नाडीग्रंथाना खोटे ठरवण्यासाठीचा पुरावा मिळवला होता त्याची शहानिशा तेथल्या तेथेच करून पहाता आली असती. म्हणून ओकांना प्रत्यक्ष समोर असताना देखील भेटण्याचे टाळावे असा त्यांच्या सल्लागारांचा मानस असल्याने टाळले गेले.

**आता जे ओंकारांनी केले ते ओकांनी केले काय़?**

हो. असे संपुर्ण टेप ओकांनी अनेकदा केले होते. नव्हे तो त्यांचा आग्रह असे. नंतर त्यातील फोलपणा लक्षात आल्यावर ते टेप नंतर इतर कामाला वापरले गेले.

**जे शोधकार्य ओंकारांनी केले नाही वा फक्त करावे असे सुचवले ते ओकांना केले काय?**

होय. नाडीपट्टीतील मजकूर वहीत उतरवून घेतला गेल्याची प्रत्यक्ष खात्री झाल्यावर ती वही त्याच व अन्य नाडीकेंद्रातील इतर अनेक वाचकांकडून वाचवून घेतली गेला. त्यांनी तो जशाचा तसा वाचून दाखवला. त्या तऱ्हेच्या अनेक लिखित वह्या नंतर अनेक नाडी ग्रंथांशी मुळीच संबंध नसलेल्या तमिळजाणकारांना दाखवून त्याचे भाषांतर करून घेतले. नाडी केंद्रचालकांच्या सहकार्याने नाडीग्रंथ पट्ट्यांच्या फोटोतून दिसणारा मजकूर व वहीतील मजकूर यांची खात्री केली. नाडीपट्ट्यात जन्मकालच्या ग्रहपरिस्थिचीचे वर्णन खरोखर कसे केलेले असते. अंगठ्यांच्या ठशांचे वर्णन कसे दिलेले असते का आदीचे पुरावे शोधले गेले.

आपल्याकडून माहिती काढून तीच आपल्याला सांगितली जाते हे वरवर तसे दिसत असले तरी तसे नाही कारण नाडी वाचक ताडपट्टीतील मजकूर वहीत लिहून घेऊन वाचत असतो. याची पक्की खात्री न करताच फक्त एका व्यक्तीच्या एका ताडपट्टीशोधाच्या अनुभवावरून संपूर्ण नाडी ग्रंथांना खोटे ठरवण्यात अपप्रचार जास्त व शोधाची तळमळ कमी असे चित्र प्रकट होते.

ओंकारांच्या लेखातील मुख्य मुद्याला तो खरा आहे असे मानून हवाईदलातील काही लोकांच्या समावेत एकदा एक प्रात्यक्षिक केले गेले. मी (ओकांनी) ते सर्व प्रश्न एका मागून एक (हिंदीतून) वाचले होतो. काहींना त्यातील उत्तरे लिहून नोंद करायला सांगितली तर काहींना नुसतीच आठवणीत ठेवायला सांगितली. त्यातील आलेला निष्कर्ष असा होता - सतत प्रश्नांचा भडिमार करून कोणत्या प्रश्नाला नक्की ‘हो’ व कोणत्याला ‘नाही’ म्हटलेले यातून विचारून मिळवलेली माहिती इतक्या अचुकपणे नुसती लक्षात ठेऊन पुन्हा सांगणे शक्य नाही. त्या संपुर्ण प्रात्यक्षिकाचा व त्यांच्या विवेचनातून ओंकार वाचकांची दिशाभूल कशी न कळत वा कळत करतात, हे मी "बोध अंधश्रद्धेचा" पुस्तकातील लेखातून सविस्तर पुरावा सादर केला आहे.

त्यामुळे ओंकारांचा हा लेख फक्त वाचकांना त्यांनी काढलेल्या निश्कर्षांवर विचार करायला जरूर उद्युक्त करतो. मात्र प्रत्यक्षात नाडी पट्ट्यावरील शोधकार्य न केले गेल्याने तसा निरुपद्रवी वाटतो.

ओंकारांनी कूटलिपीची ढाल करून ही नावे ताडपट्टीत आहेत असे सांगायचा 'गोलमाल करायला' वाव आहे म्हणून भांडारकर सारख्या प्राच्यसंस्थेतील तज्ञांकरवी त्याची तपासणी व्हावी. तशी ती ओकांनी चेन्नईतील प्राच्य संस्थाकेंद्रातून केली आहे. एका फोटोतील 'शशिकांत' हे नाव कसे कोरून लिहिलेले आहे याचे प्रात्यक्षिक सादर केले आहे. अमेरिकेत राहणाऱ्या एका उच्च प्रशिक्षित व तमिळशी ओळख असलेल्या व अनेक विषयांवर अभ्यासपुर्ण माहिती व मते व्यक्त करणाऱ्या डॉ. धनंजय वैद्य नामक व्यक्तीनी व हैयोहैयैयों नामक तमिळभाषेच्या व लिपीच्या अभ्यासकाने त्या फोटोतील मजकूर ‘शशिकांत’ आहे असे ठाम व सकारात्मक मत नोंदले आहे. त्यामुळे यापुढे ओंकारांच्या मताची री ओढणाऱ्यांना ते कारण पुढे करता येत नाही.

हैयोहैयैयोंनी तमिळकुटलिपीवर आधारित लेखातून नाडीपट्टयातील लिपीचा उलगडा करता येतो. ती नाडीवाचकांच्या व्यतिरिक्त ही वाचायला येईल असे सुचवले आहे. ओकांनी त्यांना सवडीने कूटलिपीवर मराठी वाचकांसाठी लेखनकरून जास्त प्रकाश टाकावा असे आवाहन केले आहे.

ओंकारांनी काही मजकूर, शब्द, नोकरी-व्यवसाय वा अन्य सध्याच्या प्रचलित नवे शब्द संस्कृत मधून आहेत असे भासवून ग्राहकाला प्रभावित केले जात असावे, असा दावा केला. तर ओकांनी अशा व अन्य नाडीशब्दांचा एक शब्दकोश तयार करण्याची सुरवात झाली आहे. नाडीतील शंभर तमिळ शब्दांचा एका नमुना कोश २००७साली इन्स्टियुट ऑफ एशियन स्टडीजचे डायरेक्टर ड़ॉ.जी.जॉन सॅम्युएल यांच्या हस्ते वितरित केला गेला.

ओंकारांनी नाडी ग्रंथात व्यक्तीच्या जन्मदिनांकाचे, जन्मकाळच्या ग्रहस्थितीचे वर्णन नसावे असा त्यांनी फक्त कयास बांधला. तो कसा चूक आहे व याचे तो कसा असतो हे सोदाहरण दाखवून देण्यासाठी वेगळा लेख हैयोहैयैयोंनी सादर केला आहे.

यावरून सुज्ञ वाचकांनी योग्य तो निष्कर्ष काढावा ही विनंती.

---




## 39.काय लावलय हे ओकांनी नाडीपुराण?

Figure 53.इथे नाडी महर्षी रिंगमास्टर आहेत. नाडीग्रंथांच्या आसूडाला घाबरून विरोधकांचा सिंह कसेही करून पलायनाची सोय पहताना....

विंग कमांडर शशिकांत ओक हे एकांडे शिलेदार नाडीग्रंथांवर सतत लेखन करत असतात. त्यामुळे वाचकांना ओक म्हणजे नाडीवर काही ना काही नाडीपुराण लिहित राहणार असा सामान्य वाचकांचा ग्रह होणे स्वाभाविक आहे. पण हैयो हैयैयो हे भारतीय व परदेशी भाषातज्ञ तर आहेतच शिवाय ७०पेक्षा जास्त प्राचीन ग्रंथम लिपीपासून ते फारसी, अरबी लिपींचे तज्ञ अभ्यासक आहेत. त्यांच्या नाडीग्रंथांतील कुटलिपि या अभ्यासपुर्ण लेखानंतर नाडी ग्रंथांकडे पहायची विरोधक लोकांची मनोवृत्ती बदलेली आहे असे जाणवते.

ताडपट्यात खरोखरीच तमिळ भाषा असते का व अन्य मुलभूत शंका पुर्वीपासून उपस्थित केल्या गेल्या त्याचे निराकरण हैयोंच्या लेखातील जन्मदिनांकाचे  वनवग्रहस्थितीचे वर्णन वाचून करणे आगत्याचे ठरले आहे.

खोलवर विचार केल्यावर नाडी ग्रंथांची पर्यायाने ओकांची टिंगल टवाळी करून चेष्टेवारी नेण्याचा हा विषय नाही, ही बाब वाटते तितकी हलकी फुलकी किंवा टाळून विचारावेगळी करायला येत नाही असे हैयोहैयैयोंनी नाडी ग्रंथावर तमिळभाषेच्या अनुषंगाने अभ्यासकार्य चालू केल्यापासून लक्षात येते. ते कसे ते पहा तर -

आता विविध आक्षेपांच्या संदर्भात विचार नीट वाचल्यावर त्यातून काय काय परिस्थिती उपस्थित होते याची झलक खाली मिळेल.

1. पहिला आक्षेप असा असतो की या ताडपट्ट्यातकाहीही लिखाण कुठल्याही भाषेत केलेले नसते. त्या कोऱ्याच असतात. भासवले असे जाते की नाडीवाचक त्यात पाहून त्यातील मजकूर वाचतो आहे.

उत्तर - आता त्या ताडपट्टया कोऱ्या असतात की काहीतरी का होईना लिहिलेल्या असतात हे शोधायचे काम केले पाहिजे. ते काम नाडी भविष्य केंद्रातजाऊन प्रत्यक्ष शोधकरून त्यांच्याकडील उपलब्ध ताडपट्टया पडताळाव्या लागतील. हैयोंनी व प्रस्तूत लेखकाने विविध केंद्रातजाऊन नाडीपट्यांचे फोटो सादर करून असे अभ्यासकार्य केले आहे. नाडी ग्रंथ पहायला जाणारा प्रत्येकजण स्वतःपुरती स्वतंत्र परीक्षा घेत असतो त्यांना ही पट्ट्यांवर लिहिलेले असते हे न विचारता पहायला व अनुभवायला मिळते

तसे केले असता त्या संपूर्णतः कोऱ्या नसतात. त्यावर मजकूर लिहिलेला असतो. हे लक्षात येते. त्यामुळे या आक्षेपातील खोटेपणा सिद्ध होतो.



Figure 24 नाडीपट्ट्यांवर काही मजकूर नसतो म्हणणाऱ्यांसाठी पुरावा

2. दुसरा आक्षेप असा असतो की चर्चेसाठी जरी त्या ताडपट्ट्यात मजकूर असतो असे मानले तरी त्यातून नेमकी कुठली भाषा असते याचा अर्थबोध होत नाही.

उत्तर - यावर सोपे उत्तर असे की सध्या जे नाडीग्रंथ पट्टीवाचनाचे काम करतात ते सर्व तमिळभाषी आहेत. ते यातील मजकूर वाचून दाखवतात अणि तो मजकूर परत एका ४० पानी वहीत सध्याच्या प्रचलित तमिळ लिपित पुन्हा लिहून काढतात. यावरून त्या मजकुराची भाषा तमिळ का अन्य कोणती असावी याची खात्री करता येते. या उलट ताडपट्ट्यांचे वाचन करणारे तमिळभाषिक सोडून अन्य भाषिकांतर्फे होते वा केले जाते असा पुरावा विरोधकांना उपलब्ध करून द्यावा लागेल. तो तसा होत नाही. त्यामुळे हा आक्षेप  खोडून निघतो. शिवाय हैयोंनी नुकत्याच प्रकाशित लेखात नाडी पट्टीतील काही श्लोकांचे तमिल व देवनागरीतून केलेले कथन नाडीपट्टीतील भाषा प्रत्यक्ष तमिलच आहे असे निर्णायकपणे सिद्ध करते.

3. तिसरा आक्षेप असा की जरी मानले की ताडपट्टीमजकूर लिहिलेला असतो. त्याची भाषा तमिळ असते तर ती सामान्य तमिळ भाषिकाला का वाचायला येत नाही? त्या अर्थी नाडीपट्टी वाचन हा एक तमिळ नाडीवाचकांचा देखावा असतो.

उत्तर – असे लक्षात येते की सामान्य तमिळभाषिकांना या ताडपट्ट्यांवरील मजकूर वाचायला येत नाही किंवा आला तरी अर्थबोध होत नाही. याचे मराठी भाषिकांना पटेल असे स्पष्टीकरण असे की ज्ञानेश्वरी हा ग्रंथ मराठी भाषेत लिहिला गेला आहे. तरीही त्यातील छापील मराठीतील ओव्यांचा अर्थ सर्वसामान्य मराठी समजणाऱ्याला समजायला कठीण जातो. आता तीच ज्ञानेश्वरी जर मोडी भाषेत लिहून सध्याच्या मराठी वाचकाला दिली तर त्याची काय

अवस्था होईल? त्याला नेमके काय लिहिलेले आहे याचा अर्थ बोध होणार नाही पण कोणी मोडी लिपि-भाषातज्ञ ती वाचायला लागले तर त्यांना थोडा थोडा अर्थ कळेल. तोच अर्थ ज्ञानेश्वरीचा अभ्यास केलेल्या जाणकार मंडळींनी फोडकरून सांगितला की 'ओहो, असा अर्थ आहे!' असे उद्‌गार ओठी येतील. नेमके तेच सामान्य तमिळ भाषिकांचे होते असे हैयोंनी नाडीग्रंथातील ओळी ओळींचा अर्थ फोडकरून सादर केलेल्या पुराव्यावरून सिद्ध होते. त्यामुळे या आक्षेपात बिलकुल तथ्य नाही. हे लक्षात येते.

4. आक्षेप चौथा असा की सामान्य तमिळांना जरी ती लिपी वाचता आली नाही तरी ती तमिळ भाषातज्ञांनी तरी वाचून कुठे मान्य केली आहे?

उत्तर – या तऱ्हेचे अभ्यासकार्य पुर्वी पासून अनेक वेगवेगळ्या तमिळ भाषातज्ञांकडून विविध ठिकाणी झाले आहे. तथापि अजूनही त्यांच्याकडून ते आणखी पद्धतशीरपणे व्हावे यासाठी हैयोहैयैयोंच्या बाजूने प्रयत्न करणे जारी आहे. श्री लंकेतील डॉ. अरसे कुलरत्ने अणि लंडनस्थित डॉ. एस. संबंधम या दोघांनी अत्यंत परिश्रमपुर्वक तीन भागांचा एका अभ्यास निबंध सन २००२ मधे लिहून प्रकाशित केला. त्यात त्यांच्या शोधाचा महत्वाचा निष्कर्ष होता की खरोखरच नाडीच्या ताडपट्ट्यात त्यांच्या संबंधातील नावे कोरलेली होती. त्यांनी तो शोध निबंध आभिप्रायार्थ पुनर्जन्मावर आयुष्यभर काम केलेल्या स्व. डॉ. आयन स्टीव्हन्सन यांना अमेरिकेत पाठवला होता. त्यात त्यांनी असे म्हटले होते की 'मी यावर तत्वतः विश्वास ठेऊ शकत नाही. तरीही असा नाडी ग्रंथांचा पुरावा खरोखर असल्यास तो अविश्वसनीयच नव्हे तर सध्याचे प्रस्थापित शास्त्राचे नियम उलथुन टाकणारा आहे असे सिद्ध होईल. तथापि यावर आणखी अभ्यास कार्य करावे लागेल.' तेच काम हैयोंनी आता हाती घेतले आहे.

या पुराव्यांच्या संदर्भात विशेष उल्लेख करावा लागेल की नाडी ग्रंथभविष्याच्या दि १४ ऑक्टोबर २००७ साली पुण्यात झालेल्या पहिल्या अधिवेशनाचेअध्यक्षपद चेन्नईच्या इन्स्टिट्युट ऑफ एशियन स्टडीज या तमिळ भाषेतील इंडॉलॉजीवर काम करणाऱ्या डॉ. लक्ष्मी व विशेषतः ताडपत्रांच्या ग्रंथांवर शोधकाम व त्यांचे संरक्षण करणाऱ्या संस्थेच्या संस्थापक, चालक डॉ. जी जॉन सॅम्युएल यांनी स्वीकारले होते. त्यांच्या सोबत त्याच संस्थेच्या ताडपत्रशोधविभागाच्या प्रमुख तमिळतज्ञ श्रीमती लक्ष्मी यांनाही बोलावले गेले होते. त्यांनी उपस्थितांसमोर त्या पट्टीतील अणि अन्य एका नाडीपट्टीतील मजकूर व विशेषतः नावे वाचून ती खरोखरीच ताडपट्टीत कूट तमिळ भाषेत कोरून लिहिलेली आहेत असा असल्याचा निर्वाळा दिला.



**Figure 25** डॉ लक्ष्मींचा श्री. ईश्वरनजी सत्कार करताना

जर्मनीत थॉमस रिटर नावाच्या एका नाडी भविष्यावर जर्मन भाषेत पुस्तके लिहिलेल्या व्यक्तीने तेथील तमिळ भाषेतील तज्ञाकडून नाडी ग्रंथ भविष्यताडपट्टीतील मजकूर वाचून तो भविष्य कथन सोडून अन्य धार्मिक लेखन नसल्याचा निर्वाळा दिला असा उल्लेख त्यांच्या "द सीक्रेट ऑफ इंडियन पामलीफ लायब्ररीज्" पुस्तकात केलेला आहे. यापुढे जाऊन हैयोहैयैयो त्या ताडपट्ट्यात व्यक्तीच्या बाबत अन्य तपशीलाचे उल्लेख, कसे असतात याचा अभ्यास करून या ताडपट्यांचे फोटो मिळवून यावर आणखी कार्य होणे अपेक्षित आहे.

5. आक्षेप पाचवा असा की नाडी ग्रंथ भविष्य सध्याच्या प्रचलित विज्ञानाच्या विरोधात जात असल्याने त्याला कितीही पुराव्यांनी सिद्ध करण्याचा प्रयत्न निष्फळ आहे.
उत्तर - नुकताच एका सदस्याने हैयोंच्या लेखातीलवर्णित एका व्यक्तीच्या जन्मतारखेला हैयोंनी नव्हे नाडी महर्षींनी कथनकेलेला वार चुकीचा होता असे म्हणून आक्षेप घेतला होता. सध्याच्या प्रचलित कॅलेंडर प्रमाणे तो वार बरोबरच होता. मात्र जेंव्हा हैयोंनी त्यांचे ध्यान भारतीस परंपरेतील पंचांगानुसार वाराची गणना करून पहावी असे विनम्रपणे सुचवले त्यानंतर त्या सदस्याने हैयोंच्या विधानाची म्हणजेच पर्यायाने नाडीमहर्षिंच्या कथनाला योग्य असल्याचे प्रांजळपणे मान्य केले. हैयोंनी सादरकेलेल्या लेखातील जुळ्या बहिणींच्या जन्मवेळेची, दिनांकाची व नवग्रहांच्यास्थितीची नोंद फारच विचार करायला लावणारी आहे.
यापुढे जाऊन हैयोंनी व्यक्तीच्या नावाची नाडी पट्टयातून उकल करून दाखववावी म्हणजे व्यक्तीचे नाव त्याचे आईवडील किंवा वरिष्ठ नातलग ठरवतात व विधिपुर्वक ठेवतात अशी सामान्यपणे मान्यता आहे. यापेक्षा त्यांना तीच नावे ठेवायची प्रेरणा आपोआप घडते की काय यावर विचार करून मते व्यक्त करता येईल.
जर या ताडपट्याच्या मजकुरात व्यक्तीचे नाव व अन्य माहिती त्याने ती न पुरवलेली असता, त्याच्या जन्माच्या आधीपासून कैंव्हातरी लिहून तयार असेल तर त्याला काय म्हणायचे? त्याची संगती कशी लावायची? ती संगती मानवीबुद्धीच्या स्तरावर लावता येत नसेल तर त्याला मानवी विज्ञानाच्याकक्षे बाहेरील म्हणजेच इंद्रियगम्य ज्ञानाने ज्ञात न होणाऱ्या अदभूत शक्तीचा विलास किंवा लीला मानावे लागेल. कदाचित त्रिमितीच्या पलिकडे सध्या अज्ञातअन्य मितींच्या ज्ञानात त्या गूढाचे उत्तर सामावलेले असेल. भूत, वर्तमान आणि भविष्यकाळ असा आपण करतो तसा भेद न करता काही गोष्टी घटना ज्ञात करता येऊ शकतात याचा शोध घ्यावा लागेल. मात्र नाडी भविष्य थोतांड मानून त्याच्याकडे जाणीवपुर्वक दुर्लक्ष करून असे म्हणत बसायचे की **जर आम्हा विज्ञानवाद्यांनी नाडी ग्रंथांच्या या सत्यतेला तत्वतः मान्यता दिली तर आमच्या वैज्ञानिक दृष्टीकोनाचा पायाच निखळून पडतो म्हणून आम्हाला नाडीग्रंथांच्या अस्तित्वाची दखल घेणे मान्य नाही.** ही तर वैज्ञानिक विचारांशी प्रतारणा नव्हे काय?

## 40.हैयोंच्या नाडीवरील लेखनावरील विरोधकांची प्रतिक्रिया - नसती उठाठेव कशाला?

(समस्त नाडी विरोधकांना नाडीग्रंथ प्रेमींतर्फे उत्तर)

उपक्रम, मिसळपाव, मी मराठी आदि या मराठी साईटवर अनेक देशी-विदेशी मराठी भाषिक आपापले विचार मांडत असतात. त्यात उपक्रम 2010च्या दिवाळी अंकातील हैयों हैयैयोंच्या नाडीतील जन्म दिनांकाच्या लेखावरील एकत्रित काही प्रतिक्रिया सादर करत आहे. उपक्रम या पुरोगामी विचारांना प्राधान्य देणाऱ्या साईटवर नाडीसारख्या विषयावर धागे काढायला बंदी घालावी असा एक धागा उघडला गेला. त्यावर एका प्रतिक्रियेतील असंसदीय शब्दांना हैयोंनी आक्षेप घेतल्यावर ती प्रतिक्रिया उडवली गेली. काहींनी ओक हे या साईट्सवरून फुकटात नाडीची जाहिरात करतात असा बोल लावला. तर ओकांची यात किती कमाई होते यासाठी वरचेवर विचारणा करून सतावायचे धोरण ठेवले. मात्र अन्य सदस्यांनी अशा लेखनातील तौलनिक अभ्यासाची बाजू विचारात घेऊन धागा उडवायला विरोध केला. मिसळपावचे पुर्वीचे मालक तात्यांनी नाडीवरील लिखाणाला दाद देणारे लेखन केल्यावर त्यांना ही लोकांचे कुत्सित बोल ऐकायला लागले. मायबोलीवर गळतगे आणि माझ्या विचारांवर एक तरफा टीका केला गेली. नाडीग्रंथांचा अनुभव घ्या व बोला असा माझा पवित्रा होता व आहे. त्यामुळे ओक आम्ही विचारतो त्या प्रश्नांना उत्तर देत नाहीत अनुभव घ्या हे तुणतुणे वाजवतात असा साधारण भाव असतो. मुद्दाम द्यायला त्यावरून वाचकांना बुद्धिवादी म्हणवणाऱ्या विचारकांची विचारसरणी कशी एकांगी व विकृत आहे व कितीही खोटे म्हणायला लागले तरी बेधडकपणे ते कशी प्रतिक्रिया देत असतात याचा प्रातिनिधिक नमुना – ओकांनी या धाग्यातून दर्शवला होता.

**नसती उठाठेव कशाला?**

विरोधक म्हणतात, हैयोहैयैयोंनी कूटलिपीवर 2010 साली एक लेख लिहून नाडी ग्रंथांची भलावण केली होती. आता नाडी ग्रंथांमधील भाषेच्या अनुषंगाने आस्वाद घेण्याचा जो घाट घातला आहे. त्याला 'नसती उठाठेव' म्हणावे लागेल.

महाराष्ट्र अंनिसने आपल्यातर्फे मा.श्री. रिसबुड व प्रकाश घाटपांडे यांची प्रत्यक्ष नियुक्ती करून व नाडी केंद्रात माणसे पाठवून नाडी शास्त्राची कसून चाचणी केली व ते थोतांड आहे हे जाहीरपणे सिद्ध केले. त्यामधे त्यांनी ताडपट्ट्यांच्यासाठी प्रसिद्ध असलेल्या तंजावूरला जाऊन शोधकार्य *केले असणार.* त्यावेळी तेथील अनेक तमिळ भाषातज्ञांची भेट घेऊन तेथील सरस्वती महाल नामक वाचनालयातील अनेक अन्य विषयावरील ताडपत्रांचा अभ्यास केलेल्या कूटतमिळ भाषा तज्ञांकडून नाडी ताडपट्टयातील मजकुराची शहानिशा *केली असणार.* त्या सर्वांचा परिपाक म्हणजे अंनिसनी नाडीच्या ताडपट्ट्यात तमिळ भाषेत मजकूर लिहिलेला असतो असा जो दावा केला जातो ही शुद्ध बनवाबनवी आहे. हे सिद्ध केलेले *असणार आहे.* आता अशी नाडीच्या ताडपट्ट्यातील तमिळभाषेची कसोटी घाटपांडे, रिसबुड व शाम मानवांतर्फे अन्य लोकांनी वाचवून खात्री *केला असणार.* त्या शिवाय का महा. अंनिसने नाडी ग्रंथांना थोतांड ठरवल्याचे सिद्ध केल्याचे पुस्तक बाजारात आणले आहे? तेंव्हा ते खोटे असू शकत नाहीत. **(सत्यता - वरील पैकी 'केले असणार' म्हणून जे जे म्हटले गेलेले आहे त्याप्रमाणे एकही काम त्यांनी अद्याप केलेले नाही.)**
उलट नाडी ताडपट्ट्यांचा शास्त्रीय संशोधन करत असल्याचे सोंग आणून हैयोंनी जो या लेखात काही चार तमिळ श्लोक टाकून आपण तमिळभाषेचे पारंगत विद्वान असल्याचा उपद्व्याप केला आहे. हा हास्यास्पद आहे.**( हैयोंच्या अभ्यासातील त्रुटी दाखवता न आल्याने केलेला कांगावा अंगलट आली.)**

विरोधक म्हणतात, 'अहो तसे काही नसते' हे साधे आपणाला कळू नये याचे आश्चर्य वाटते. नाडीकेंद्रवाले एक जात 'ठकसेन' असून तमिळ भाषेच्या अज्ञानाचा फायदा उठवून सामान्य माणसांना ते 'भ्रमसेन' करतात. हे साधे सरळ गणित समजण्यासाठी 'तर्कक्रीडा' करायची गरज काय? नाडी पट्ट्यात कसला आलाय काव्याविष्कार? सगळा खोटारडेपणा आहे... **( याच ठिकाणी एका वेगळ्या धाग्यात नाडी प्रेमी 'भ्रमसेन' व नाडी केंद्रवाले 'ठकसेन' असा एकतर्फी निर्णय देणारे काही प्रतिसाद होते. त्याला अनुलक्षुन असे म्हटले गेले.)**

"आपणाकडून माहिती काढून तीच नाडी पट्ट्यातून आली आहे अशी बतावणी केली जाते व भविष्य कथनाचे सोंग घेतले जाते" हे इतके धडधडीत सत्य असताना हैयोंना त्या नाडीग्रंथांच्या ताडपट्यातील मजकुरात तमिळकाव्याचे छंद व अलंकारिक बारकावे हुडकल्याचा दावा करत आहेत तो फोल आहे. अशा काव्याच्या लंब्यालंब्या बाता करणे सोपे आहे. हैयो म्हणतात तसा नाडीवाचकांचा दावा असेल की व्यक्तीच्या जन्मदिनांकाची अन्य माहितीच्या बाबत देखील श्लोक रचलेले असतात व ते ही इतक्या कटाक्षाने की शब्दाचे दामयमक जुळले पाहिजे नव्हे शब्दातील अक्षरे जुळून ओळी ओळीत ही यमक साधले गेले पाहिजे. आता यावरून नाडीवाले तमिळभाषिक शब्दांच्या अलंकारांची तोड-फोड-जोड करणारे सोनारचे असणार असे वाटते. ही अभिनव कसरत नाडी वाचकांना जमते असे क्षणभर मान्य केले तर त्यांना काव्यातील 'भारतरत्न' पदवी देऊन सन्मान करावा लागेल.

आश्चर्य म्हणजे ही फसवणूक प्राचीन महर्षींच्या नावाच्या आडून चालते आहे. कोणी पाहिले आहेत हे महर्षी? जेथे रामायण महाभारत ही फक्त महाकाव्ये आहेत. त्या सत्य घटना नाहीत असे सरकारमान्य मत आहे मग त्यातील वर्णन केलेले महर्षी देखील तितकेच काल्पनिक असणार हे सांगायला वेगळे हायपोथिसिस मांडायचे कारण नाही. जे नाही ते आहे असे मांडायचा हट्ट का? कशाला? **(विरोधकांची ही चाल आहे की कितीही म्हणालात तरी अनुभव घेणार नाही कारण त्याची गरज नाही! म्हणून प्रत्यक्ष अनुभव घ्यायचे टाळायचे व वर 'विज्ञानवादी' म्हणून मिरवायचे. शिवाय 'ज्यांना शाब्दिक जोडतोड करणारे 'काव्यसोनार' म्हणून हिणवले त्यांच्यासारखे निदान एकाचे व्यक्तीचे तरी भविष्यकथन काव्यात गुंफून दाखवा' म्हटले गेले तर त्याकडे सोईस्करपणे दुर्लक्ष करायचे.)**

एका लेखातून विरोधकांनी अब्राहम कोवूरांचा हवाला देऊन म्हटले आहे की नाडी केंद्रवाले विविध क्लृप्त्या करून ग्राहकाकडून माहिती गोळा करून केंद्रातील एका खोलीत त्यांच्याकडील मोकळ्या नव्या ताडपट्ट्यात झटपट लिहून ताजी ताजी पट्टी प्राचीन व मळखाऊ दिसावी अशी युक्ती करून ग्राहकाला देतात. बी प्रेमानंदांसारख्या अंनि कामातील आंतरराष्ट्रीय विचारवंत व तमिळ जाणकार तज्ज्ञानी तर नाडीवाले त्यांच्या लोकांना ग्राहकांत बसवून बेमालूमपणे त्यांच्याशी गट्टी जमवून हवी ती माहिती काढून घेण्यात तरबेज असतात. असे पैजेवर म्हटले आहे. आता त्यांच्या सारख्या चतुर व चोरावर मोर बनण्यात वाकबगार व्यक्तीला नाडीवाले फसवू शकले नाहीत असे म्हणून मोठमोठाले लेख त्यांनी लिहिले. त्यांच्या वैचारिक दिंडीमुळे आज महाराष्ट्रात विरोधकांचे कार्य जोमाने चालू आहे. आता ते सगळे विरोधक सपशेल खोटे आहेत असे सिद्ध होईल. याची काही जाण नाडी प्रेमींना नसावी. **(सत्यता - वरील महान दिग्गज (?) बुद्धिवाद्यांनी अनुभव घेतल्याचे नाटक केले. पण प्रत्यक्ष ताडपट्ट्यांची शहानिशा कधी केली नाही. म्हणून अशा अनेक दिग्गजांची साक्ष कितीही रंगवून लिहिली तरी ती निरर्थक ठरते.)**

विरोधक डॉ. नी.र. वऱ्हाडपांडे यांच्या सारख्या आणखी एका आंतरराष्ट्रीय ख्यातीच्या विवेकवादी विचारकाचा हवाला देऊन म्हणतात, 'नाडी ग्रंथांवर भाष्य करताना "वेड्याच्या इस्पितळातील बडबड" या पलिकडे याची किंमत नाही' म्हणून छाती ठोकपणे त्यांनी सांगितले आहे. नाडी ग्रंथांना 'प्रायमाफेसी केसच नाही' असे नाडी ग्रंथांच्या सखोल अभ्यासाशिवाय व ती ताडपत्रे शोधपुर्वक न पहाता थोडेच *म्हटले असणार काय*? नक्कीच नाही. त्यांनी नाडीचा अथ पासून इति पर्यंत तमिळभाषेसह सर्व बाजूंनी लिपीचा अभ्यास करून मगच आपले *मत मांडले असणार*. **(वऱ्हाडपांडे काय, रिसबुड वा घाटपांडे काय यापैकी कुणीही नाडी भविष्याचा प्रत्यक्ष अनुभव घेतलेला नाही. तमिळलिपी सोडा, साधी ताडपट्टी कधी हातात धरली नाही. फक्त तर्क करून आपापले किल्ले लढवले, लेख व पुस्तके प्रकाशित केली. या**

**पलिकडे त्यांचे शोधकार्य नाही.)**
विरोधकांचे आणखी एक आधारस्तंभ म्हणवून घेणारे एक म्हणतात, 'बाकीच्यांचे सोडा. डॉ. जयंत नारळीकरांनी त्यांच्या माहितीच्या तमिळ लोकांकडून नाडीपट्ट्यातील मजकूर वाचवून नाडी ग्रंथ थोतांड असल्याचा निर्वाळा पुर्वीच दिला आहे. 'ते सर्व खोटे व तुम्ही नाडीप्रेमी व ओक मात्र खरे'! असे आमच्या सारख्या सामान्यांना ठासून सांगणे ही निव्वळ दिशाभूल आहे'.
कुस्तीत पाठ टेकली तरी नाक वर या न्यायाने, शेवटी ते म्हणतात, 'अशी शर्त लावता येईल की आपण करत असलेल्या लेखांवर वा अभ्यासावर वरील नाडी विरोधकापैकी एकही जण त्याची दखल घेणार नाहीत किंवा तुम्ही म्हणता ते खोटे आहे असे म्हणून तुमच्या पुराव्यांचा साक्ष मोक्ष लावायला किंवा तमिळभाषा भाषिकांना या शोधकामाला लावण्यात पुढाकार घेणार नाहीत. कारण त्यांनी आधीच नाडी ग्रंथांना थोतांड म्हणून सिद्ध केले आहे! व नव्याने काही करावे असे आता उरलेले नाही! असे म्हणून आम्ही आमची सोडवणूक केली आहे! राहिले इथे कार्यरत असलेले काही वाचक, त्यांना तोंडपाटिलकीत रस. **(आम्ही स्वतः काही करणार नाही व कोणी नाडी ग्रंथांवर शोधकार्य करू लागले तर त्याला मान्यता देणार नाही अशी आडमुठी भूमिका बुद्धिवादीच घेऊ शकतात.)**
त्या ओकांनी, नाडीचा घोशा लावून 'अनुभव घ्या' असे वारंवार म्हणून जेरीला आणले होते. त्यांनी या कामात स्वतःवर लोकांची तिरकस दुषणे मिळवली होती. आपण तसे न करता आपला वेळ व श्रम व्यर्थ घालवू नये. वेळीच सावध व्हावे. ही हैयोहैयैयोंना विनंती. **(जे लाखो रुपयांची आव्हाने देत फिरतात. त्यांनी काही न करता हैयोहैयैयो सारखा जो कोणी अभ्यासपुर्ण शोध घेत असेल त्याला नामोहरण करण्यात धन्यता मानतात. असे खेदाने म्हणावे लागते.)**
तुम्ही कितीही पुरावे देऊन नाडी ग्रंथांना 'विलक्षण अदभूत' म्हणण्याचा प्रयत्न केलात तरी वैचारिक प्रगल्भता असणारे विज्ञानवादी, विवेकवादी, निरीश्वरवादी व डाव्या अंगानी स्वतःला पुरोगामी मानणारे लोक नाडीला कधीच मान्यता देणार नाहीत. **('हम नही सुधरेंगे' म्हणणाऱ्यांची शेपूट किती वाकडी आहे याची ही झलक आहे. या लोकाकडे किती लक्ष द्यायचे ते वाचकांनी ठरवावे.)**

### 41.असा काव्यप्रकार मराठी भाषेत आहे?

# **असा काव्यप्रकार मराठीभाषेमध्ये अस्तितत्वांत आहे काय?** - भाग १

## सादरकर्ते - हैयोहैयैयो

आमच्या तमिऴभाषेत लहान मुलांसाठी काही विशिष्ट काव्यप्रकारातील बालगीते रचली जातात. लहान मुले ही गीते अत्यानंदाने गाताना दिसतात. ही गीते साधारणत: शब्दभांडार समृद्ध व्हावे ह्या उद्देशाने केली गेली असली तरी विशेषतः नीतिशास्त्राची तोंडोळख करवून देणे हाही एक उद्देश त्यांत असावा. त्यापैकी आठवणींतले एक बालगीत इथे देतो आहे. असे पाहतां ह्या बालगीतात फार विशेष असा काही अर्थ नाही. तरीही एक लक्षात घेण्यायोग्य वस्तु अशी की ह्या बालगीताचा काव्यप्रकार हा खास 'तमिऴ' आहे.

| **देवनागरीमध्ये लिप्यंतरीत** | **मराठीभाषेमध्ये भावार्थ (शब्दार्थ नाही)** |
|---|---|
| **अ**म्मा इङ्गु वाऽ वा<br>**आ**सै मुत्तम् ताऽ ता<br>**इ**लैयिल् सोरु पोऽट्टु<br>**ई**यैत्तूरऽ ओऽट्टु<br>**उ**न्ऩैप्पोलऽ नल्लार्<br>**ऊ**रिल् यारुमिल्लै<br>**ऐ**न्ऩाल् उऩक्कुत्तोल्लै<br>**ए**दुमिङ्गु इल्लै<br>**ऐ**यम् इन्ऱिच्चोल्वेन्<br>**ऑ**ऱुमै ऐन्ऱुम् उयर्वाम्<br>**ओ**तुम् चेयले नलमाम्<br>**औ**वै चोन्ऩ मोऴियाम्<br>**अ**:क्दे ऐऩक्कु वऴियाम् | आई इकडे ये ये<br>एक मुका घे घे<br>केळीच्या पानावर कालवलेला भात वाढ<br>माशीस दूर पळव<br>तुझ्यासारखी छान छान<br>साऱ्या गावी कोणी नाही<br>तुला कमीपणा येईल असे माझ्याकडून<br>कधीही काहीही होणार नाही<br>खात्रीपूर्वक सांगतो<br>एकी हेच बळ असे म्हणतांत<br>सत्कार्य करणे चांगले असते असे<br>म्हणतांत<br>जुनेजाणते लोकही तेच सांगतात<br>त्यांचे वचन मला नेहमी शिरोधार्य आहे |

बारकाईने निरीक्षण केल्यास असे लक्षांत येईल, की ह्या काव्यातील प्रत्येक ओळीचा आरंभ हा स्वरांनी झालेला आहे. काव्यातील प्रत्येक पंक्ती ही दोन किंवा अधिकाधिक तीन शब्दांनी सिद्ध आहे. हे शब्दही अधिकाधिक चार ते पाच अक्षरांनी सिद्ध आहेत. ह्या काव्यलेखनप्रकारामुळे अशा काव्यपंक्तींस एक विशिष्ट नादानुसरणी प्राप्त होवून मुलांस स्वरे मनःपाठ होतात. त्यामुळे तमिऴभाषेवरील प्रीति अधिकच वृद्धिंगत होते, हाही एक अतिमहत्त्वाचा उद्देश आहे.

हे काव्य हे ह्या तमिऴ काव्यप्रकाराचे केवळ एक उदाहरण म्हणून दिले आहे. ह्याप्रकारची वर्णमालेची क्रमवारिता पाळली गेलेली काव्यरचना तमिऴभाषेमध्ये 'क का कि की' ते 'इन इना इनि इनी' इत्यादी साऱ्या व्यंजनांपासूनदेखील होते. निरनिराळ्या काव्यप्रकाराचे विषयवस्तु निरनिराळे असू शकतांत. मराठीभाषेमध्ये ह्याप्रकारचे काव्य आहे काय ते जाणून घेण्याची इच्छा आहे. तरी मराठीभाषेमध्ये ह्या प्रकारचे काव्यप्रकार असतील तर ते कळवावेत.

==========================================

# **असा काव्यप्रकार मराठीभाषेमध्ये अस्तित्वांत आहे काय?** - भाग २

तमिऴ - जागतिक पातळीवर 'अभिजातभाषा' म्हणून गौरविली गेलेली ही भाषा. मराठीभाषिकांच्या दृष्टीतून पाहावयाचे झाल्यास; मराठीभाषकांच्या समोर तमिऴभाषा ही संपूर्णत: अनाकलनीय आणि काहीशी चमत्कारिक अशी अवतीर्ण होते. तौलनिक भाषाभ्यास हा दोन्हीही भाषकांसाठी साहित्याचा परमानंद लुटता येण्याचे एक साधन होय. मराठीभाषकास ह्या भाषेच्या व्याकरणनियमांची / काव्यशास्त्रीय नियमांची थोडी तोंडओळख करून दिल्यास, ह्यातील चमत्कृती संपुष्टात येवून ती शिकण्यात गोडी वाटू लागू शकेल असे वाटते.

दिल हैं छोटासा ह्या गीताबद्दल कदाचित वाचकांस ही माहिती नसेल; की हे गीत हे मूळ काव्यरूपांत असून ते ७० च्या दशकात लिहिले गेले होते. श्री. एम एस विश्वनाथन ह्यांनी ते तमिऴ दूरदर्शनसाठी संगीतबद्धही केले होते. श्री. मणिरत्नम ह्यांस त्यांच्या नायिकेच्या भावनांचे प्रकटीकरण करण्यास ही कविता उत्कृष्ट वाटली आणि ह्या कारणाने ह्या कवितेचे चित्रपटगीतांत रूपांतर झाले. असो! ए. आर. रहमान ह्या संगीतकाराचे पदार्पण नोंदविणाऱ्या रोजा ह्या तमिऴ चित्रपटातील चिन्न चिन्न आसै ह्या गीताचा मराठी अर्थ आणि त्याचे काव्यात्मक रसग्रहण ह्या साऱ्यासंबंधी एकत्रितरीत्या लिहावे असा काहीसा विचार करून ह्याविषयी आतां लिहितो आहे...!

| **देवनागरीमध्ये लिप्यंतरीत** | **मराठीभाषेमध्ये भावार्थ** |
|---|---|
| चिन्ऩ चिन्ऩ आसै | छोटी छोटी इच्छा |
| सिऱगडिक्कुम् आसै | पंख फडफडविण्याची इच्छा |
| मुत्तु मुत्तु आसै | (मोत्यासारखी) छोटी छोटी इच्छा |
| मुडिन्दुवैत्त आसै | (शिंपल्यात बंद मोत्यासारखी - आजवर) बंद करून ठेवलेली इच्छा |
| वॆण्णिलवु तॊट्टु मुत्तमिड आसै | शुभ्र चंद्रम्यास स्पर्शून त्याचा मुका घेण्याची इच्छा |
| ऎन्ऩै इन्द बूमि चुऱ्ऱिवर आसै | सारे हे विश्व फिरून पाहाण्याची इच्छा |
| ... | ... |
| मल्लिगैप्पूवाय् माऱिविड आसै | मोगऱ्याच्या फुलामध्ये परावर्तित होण्याची इच्छा |
| तॆन्ऱलैक् कण्डु मालैयिड आसै | हवेच्या झुळुकीस पाहून, (तिच्या गळ्यात) माळा घालण्याची इच्छा |
| मेहङ्गळै ऎल्लाम् तॊट्टु विड आसै | साऱ्या ढगांना स्पर्शून सोडण्याची इच्छा |
| सोहङ्गळै ऎल्लाम् विट्टु विड आसै | साऱ्या दु:खांना सोडून टाकण्याची इच्छा |
| कार्गुऴलिल् उलहैक् कट्टि विड आसै | केशरचनेमध्ये साऱ्या जगतास बांधून घेण्याची इच्छा |
| ... | ... |
| सेऱ्ऱु वयलाडि नाऱ्ऱु नड आसै | चिखलामध्ये पायांचे ठसे उमटवित सोडत चालण्याची इच्छा |
| मीन् पिडित्तु मीण्डुम् आऱ्ऱिल् विड आसै | मासोळीस पकडून पुन्हा पाण्यात सोडून देण्याची इच्छा |

| | |
|---|---|
| वाऩविल्लैक् कॊञ्चम् उडुत्तिक्कॊळ्ळ आसै<br>पनित्तुळिक्कुळ् नानुम् पडुत्तुक्कॊळ्ळ आसै<br>सित्तिरत्तिन् मेले सेलै कट्ट आसै<br><br>... | इंद्रधनु परिधान करण्याची इच्छा<br>दवबिंदुंच्या आतमध्ये निजण्याची इच्छा<br>भित्तिचित्रास साडी नेसविण्याची इच्छा<br><br>... |

तमिऴभाषेमध्ये एक नियम. जोपर्यंत एखाद्या वाक्यात 'नाही' असे म्हटले जात नाही, तोपर्यंत तेथे 'आहे' असे गृहित धरले जाते.

उदा.

१. एन पेयर हैयो. - माझे नांव हैयो.
२. इदु तमिऴमोळियिन नियमम. - हा तमिऴभाषेचा नियम.
३. चिन्न चिन्न आसै. - छोटी छोटी इच्छा.

वरिल नियमानुसार प्रथम उदाहरणांत, जोपर्यंत एन पेयर हैयो 'इल्लै' असे म्हटले जाणार नाही तोपर्यंत माझे नांव हैयो 'आहे' असेच समजले जाते. दुसया उदाहरणांत जोपर्यंत हा तमिऴभाषेचा नियम 'नाही' असे म्हटले जाणार नाही तोपर्यंत हा तमिऴभाषेचा नियम 'आहे' असेच समजले जाते.

थोडक्यात कसे, की 'आहे' असे निराळे सांगण्याची आवश्यकता शिल्लक नाही. हे भाषेचे वैशिष्ट्य आहे. काही पाश्चिमात्य भाषाभ्यासकांनी ह्या वैशिष्ट्यास तमिऴ समाजाच्या 'दुर्दम्य आशावादाचे मूळ' असे म्हटले आहे. हे गीत चित्रपटाची नायिका रोजा हिच्या दुर्दम्य आशावादाचे एक काव्यात्मक चित्रण ह्या रूपांत येते. तिला हव्या असलेल्या जवळजवळ साऱ्याच गोष्टी तिला मिळणे केवळ अशक्यप्राय असूनही ती इच्छा करते. काहीशी स्वप्नाळू मागणी असली तरीही एका विलक्षण आत्मविश्वासाने ती त्या गोष्टी मागते. इच्छा म्हटले की मार्ग येणारच!

कुठल्याही काव्यांतील यमकपूर्ति ही एक आवर्तन पूर्ण होण्याचा आनंद देवून जाते. सहसा इतरभाषी काव्यांमध्ये यमकपूर्ति ही चरणपूर्ति म्हणून येते. तमिऴभाषेतही यमकपूर्ति ही चरणपूर्ति म्हणून येतेच, परंतु त्याशिवाय तमिऴभाषेत आणखीही एक वैशिष्ट्य आहे. वाचकांनी वरील कवितेचे निरिक्षण केल्यास असे लक्षात येईल, की प्रत्येक ओळीची दुसऱ्या ओळीशी यमकपूर्ति होते आहे. काव्यातील झाडून प्रत्येक ओळीचा शेवटचा शब्द तो एकच आहे, तो म्हणजे 'आसै'. ह्या शब्दयोजनेमागे एक मुद्दा असा, की वाक्याच्या शेवटल्या शब्दावर एक साहजिक जोर येवून त्याचे महत्त्व अधोरेखित करणे; त्यातील अर्थपूर्ण आशयाकडे लक्ष वेधणे. तमिऴ ईळम ची अनेक वीररसपूर्ण काव्ये आहेत, ज्यामध्ये आपणांस ही शब्दयोजना आढळून येईल. खरे पाहता ही शब्दयोजना ही वीररसपूर्ण काव्यांत वापरावयाची, परंतु येथे ती भावनाप्रधान गीतामध्ये वापरली गेली आहे - म्हणूनही श्री. तात्या म्हणतांत तसा एक 'फ्रेश ढंग' येथे अनुभवण्यास मिळतो. एका अर्थाने ही काव्ये प्रासादिक होवून जातात. चित्रपटांतील नायिकाही केवळ एका विलक्षण आत्मविश्वासाच्या आणि दुर्दम्य आशावादाच्या जोरावर शेवटी तिच्या नवऱ्यास परत मिळवितेच नां? असो.

तर प्रश्न असा, की; असा काव्यप्रकार मराठीभाषेमध्ये अस्तित्वांत आहे काय?

## असा काव्यप्रकार मराठीभाषेमध्ये अस्तित्वांत आहे काय? - भाग ३

ह्यापूर्वीच्या भाग २ मध्ये श्री. वैरमुत्तुंच्या चिन्न चिन्न आसै ह्या कवितेबद्दल लिहिले होते. त्या कवितेचे रसग्रहण मराठीभाषकांस सुलभ व्हावे ह्याकरिता तमिऴभाषेतील "जोपर्यंत एखाद्या वाक्यात 'नाही' असे म्हटले जात नाही, तोपर्यंत तेथे 'आहे' असे गृहित धरले जाते" हा नियमही उलगडून सांगितला होता. आता ह्या स्फुटांतील वैशिष्ट्यपूर्ण कवितेकडे...

| **देवनागरीमध्ये लिप्यंतरीत** | **मराठीभाषेमध्ये शब्दार्थ** |
|---|---|
| याक्कै तिरि<br>कादल् सुडर् | देह वात<br>प्रेम ज्योत |
| जीवन् नदि<br>कादल् कडल् | जीवन नदी<br>प्रेम समुद्र |
| पिऱवि पिळै<br>कादल् तिरुत्तम् | जन्म चूक<br>प्रेम शुद्धीपत्र |
| इरुदयम् कल्<br>कादल् सिऱ्पम् | हृदय दगड<br>प्रेम शिल्प |
| सॆन्मम् विदै<br>कादल् पऴम् | जन्म बीज<br>प्रेम फळ |
| उलहम् तुवैदम्<br>कादल् अत्वैदम् | विश्व द्वैत<br>प्रेम अद्वैत |
| सरुवम् सून्यम्<br>कादल् पिण्डम् | सर्व शून्य<br>प्रेम पिण्ड |
| मानुड मायम्<br>कादल् अमरम् | मनुष्यजात माया<br>प्रेम अमर |

व्याकरणशास्त्रीयदृष्ट्या ह्या कवितेत एकही वाक्य नाही. केवळ एकासमोर एक मांडलेले शब्द आहेत. प्रत्येक शब्द हा त्याच्या पुढल्यामागल्या शब्दांत असा काही गुंफला गेला आहे की तो संपल्यानंतरदेखील कवितेमध्ये त्याचा अर्थ संपत नाही; उर्वरीतच राहतो. ह्याकारणे, रसग्रहणात नुसता एकच शब्दार्थ लक्षात घेवून चालत नाही, तर त्या शब्दाचे मागीलपुढील शब्दांच्या अर्थाशी नाते जुळवावे लागते. हे झाले ढोबळ अर्थासाठी - तमिऴभाषेत एका शब्दाचे अनेक सूक्ष्मार्थ असतात. ते सारे लक्षात घेवून जुळवाजुळवी करून कविता समजावून घेणे म्हणजे एक आनंददायी कसरतच असते.

पूर्वीच्या लेखांत पाहिल्याप्रमाणे, तमिऴभाषेमध्ये "आहे" हा शब्द अध्याहृत असतो, तदनुषंगाने वगळता येतो. मराठीत देखील, "माझे नांव हैयो" असे म्हटल्यास, त्यात "आहे" हा शब्द अध्याहृत आहे. परंतु, मराठीत "मन वढाय वढाय" असे म्हटल्यास आपण ह्यास "सुटे शब्द" अथवा केवळ एकासमोर एक मांडलेले शब्द असे म्हणणार नाही. "मन वढाय वढाय" असे म्हणतां "मन वढाय आहे" असा संपूर्ण अर्थ मनात येतो.

मात्र तमिऴभाषेतील वरील कवितेत शब्द हे समोरासमोरील सुटे शब्द ह्या स्वरूपातच पुढे येतात. ती पूर्ण वाक्ये नव्हेत. उदाहरणादाखल, वरील कवितेत "जीवन् नदि कादल् कडल्" असे म्हटले आहे. ह्या समोरासमोरील सुट्या शब्दांतून वाक्यार्थबोध होतच नाही असेही नव्हे; तरीही व्याकरणदृष्ट्या ' जीवन् ओर् नदि कादल् ओरु कडल्' असे म्हणणे सयुक्तिक होय. ह्यातील अंतर सांगण्यासाठी आंग्लभाषेचा उपयोग करतो.

- ✓ जीवन ही नदी आहे, = Life is a river
- ✓ जीवन् नदि = Life(,) a river.

आंग्लभाषेतील a/an/the प्रमाणे तमिऴभाषेची स्वत:ची articles आहेत, ती कशी वापरायची त्याचे नियम आहेत. त्यांचा उपयोग वाक्याच्या पूर्णत्त्वासाठी करणे आवश्यक असते. दोन नामांनी वाक्य सिद्ध करावयाचे असल्यास योग्य त्या ठिकाणी योग्य ते article असले पाहिजे असा नियम आहे.

वाचकांस लक्षात येईल, वरील कवितेत कमीत कमी शब्दांत 'प्रेम' ह्या संकल्पनेची जास्तीत जास्त महती वर्णन करण्याची किमया श्री. वैरमुत्तु ह्यांनी साधली आहे. असे करतांना केवळ एकासमोर एक नामे उपयोजिली आहेत. [नाम:- प्रत्यक्ष किंवा काल्पनिक वस्तूंच्या किंवा गुणांच्या नावांना 'नाम' असे म्हणतात.]

अशा प्रकारच्या कवितांचा सरळसरळ अनुवाद न करता त्यांचा अर्थ (interpretation) करावा लागतो. हे विधान तमिऴमधून मराठीमध्ये सांगण्यासाठी म्हणून नव्हे, तर तमिऴमध्येदेखील अशी कविता समजावून घेण्याकरिता तिचा अर्थ करावा लागतो. हा अर्थ बहुतांशी अर्थकर्त्यावर अवलंबून असल्याने तो नानाविध प्रकारे होऊ शकतो. जितके अर्थकर्ते, तितके वेगळे अर्थ. आणि तरीही सारे अर्थ बरोबरच!

उदा:- एखादा तत्त्वचिंतक वरील कवितेतील पहिल्या ओळीचा अर्थ 'देह म्हणजे जगतात प्रकाश पसरविणाया दिव्याची वात होय.. प्रेम म्हणजे त्या दिव्याची ज्योत होय' असा करू शकेल, तर त्याच ओळीचा अर्थ एखादा निराशाग्रस्त मनुष्य 'देह हा दिव्याच्या वातीप्रमाणे असतो.. प्रेम हे त्यास ज्योतीप्रमाणे जाळत संपविते..' असाही करू शकेल.. असे नानाविध प्रकारे अर्थ केले जावू शकतात. त्यातील अमुक अर्थच बरोबर - तमुक चूक असे छातीठोकपणे म्हणतां येणार नाही; कारण कोणास कोणता अर्थ लागू करवून घ्यावयाचा हे ज्याचे त्याने ठरवायचे आहे. गूढकाव्य जे म्हणतांत ते हेच काय?!

व्याकरणदृष्ट्या ही चमत्कृती भाषेच्या वैशिष्ट्यपूर्ण उपयोजनामुळे झालेली आहे. एकासमोर एक मांडलेली शुद्ध नामे सोडता ह्या कवितेत व्याकरणदृष्ट्या इतर काहीही नाही, आणि तरीही केवढा अफाट अर्थ ही कविता सामावून जाते! ती साऱ्या नियमांच्या पलिकडे आहे, त्यामुळेच तर ती वेधक आणि निराळी ठरते. असो!

तर प्रश्न असा, की; असा काव्यप्रकार मराठीभाषेमध्ये अस्तित्त्वांत आहे काय?

==========================================

## 42.नाडीग्रंथांतील काव्य रसग्रहण



लेखक व कवी – हैयोहैयैयो

जे लोक आपले नाडी ग्रंथ अनुभवतात त्यांच्या लक्षात येते की नाडी ग्रंथताडपट्यात कार्डिओग्रामप्रमाणे काहीसे दिसणारे लेखन केलेले दिसते. ते मुळात काय लिहिलेले आहे याचा शोध हैयोहैयैयोंनी घेतला. त्यातून त्यांना अनेक नवी रहस्ये कळली. त्यातील काहींवर ते प्रकाश टाकताना ते म्हणतात, 'महर्षींच्या कार्याची आपणांस फक्त भविष्य कथन म्हणून ओळख आहे, परंतु त्यातील लेखनाचा वाङ्मयिन प्रकार कोणता? त्याला व्याकरणातील नियम लागू होतात का? भाषाशास्त्रातील अलंकारसौंदर्य विचार त्यातून स्पष्ट होतो का? यावर विचार करता लक्षात ते की नाडी ग्रंथ भविष्य कथन करताना जितके अदभूत वाटतात त्यापेक्षा काकणभर ते भाषाशास्त्राचा विस्मयकारक पुरावा म्हणून महत्वाचे आहेत. नाडीपट्टीतील लेखन हे काव्य आहे. हेच फार कमी लोकांना माहीत आहे. तमिळभाषिकांना ते काव्य आहे असे मोघम समजते पण त्यातील यमकाचे बारकावे समजून येत नाहीत.

शशिकांत ओकांनी एकदा हैयोंना यावर प्रकाश टाकावा अशी विनंती केली असता त्यांनी नाडीग्रंथांतील काव्यप्रकार मराठी भाषिकांना मनात ठसावा म्हणून एक शीघ्रकाव्य करून आपल्या प्रतिभेची झलक दाखवून दिली. असे काव्य-जडावाचे काम प्रत्येक व्यक्तीसाठी सातत्याने करायला लागणाऱ्या काव्यालंकारांचा, भाषालाघवाचा प्रत्यय वाचकांना मिळेल, आणि नाडी महर्षींच्या उत्तुंग प्रतिभाशक्तीचा ओझरता परिचय म्हणून हा लेख पाहिला जाईल अशी आशा आहे.

"हैयो म्हणतात, नाडीग्रंथातील काव्यप्रकार ढोबळ अंगाने तमिळमधे अंतादी *'Anthaadhi'* (स्पेलिंग प्रमाणे लोक अंथाधी असा उच्चार करतात तो चूक आहे.)यमक या नावाने संबोधता येईल.

नाडीग्रंथांतील काव्य हे प्रामुख्याने तमिळभाषेच्या "सिन्दुप्पा" शैलीतील असल्याचे आढळते. तमिळभाषेतील 'अंतादि', 'मोनै' आणि 'एदुगै' ह्या काव्यविषयक नियमांच्या संयोगातून 'सिन्दुप्पा' काव्यशैली निर्माण होते. नाडीग्रंथांतील काव्यामध्ये दृष्टीस येणारे 'अंतादि', 'मोनै' आणि 'एदुगै' हे काव्यविषयक नियम खालीलप्रमाणे:



ஆதவனாய் நின்றுலகை காக்குமீசன்
அருளடியை அனுதினமும் வியாசன்போற்றி
வுதிடவே அருள்மைந்தன் உயர்ந்தும்வாழ
வுன்னதமாய் ஜீவசூட்சம் விளக்கவுண்மை

வுண்மைதர கசைசாயல் நிறைமையூகம்
வுயர்பக்தி ஞானசூட்ச உபதேசங்கள்
வண்ணமுறும் குண்டலினி யோகம்கொண்ட
வடிவழகே எம்மானின் அருளும்ஆசி

ஆசிநிலை யின்றோரும் நீர்க்கமாகும்
ஆனந்தம் உன்பொருட்டு அவர்கள்காண
மாசில்லா இலகமா யிருபான்வேந்தன்
மதிஞானம் துரோணமதில் நிலவும்மான்

மான்காரி கரிகொண்ட ஆரல்நண்டு
மன்னன்கதிர் சிங்கமுடன் மற்றோர்கன்னி
ஊனமிலா தோற்றமதும் மாலோன்ஒப்ப
உயர்வாகும் உயர்பால இருட்டினன்தான்

தான்சிறப்பு யில்லவனும் நீர்க்கமாக
தரும்நலனே அவனொத்து இதுநூல்வாழ்வு
ஊனமிலா உன்சேவை உதவிபாவை
உயர்வாகும் நிலையாவும் நலன்கனொத்து ....and so on...

1. काव्यातील आधीच्या चरणातील अंतिम शब्द हा पुढील चरणाचा प्रथम शब्द होतो. (अंतादि)
2. प्रत्येक पहिल्या ओळीतील पहिल्या शब्दाचे पहिले अक्षर हे दुसऱ्या ओळीतील पहिल्या शब्दाच्या पहिल्या अक्षराशी समान असणे. (**'मोनै' नामक यमक**)
3. प्रत्येक तिसऱ्या ओळीतील पहिल्या शब्दाचे पहिले अक्षर हे चौथ्या ओळीतील पहिल्या शब्दाच्या पहिल्या अक्षराशी समान असणे. (**'मोनै' नामक यमक**)
4. प्रत्येक पहिल्या ओळीतील पहिल्या शब्दाचे दुसरे अक्षर हे तिसऱ्या ओळीतील पहिल्या शब्दाच्या दुसऱ्या अक्षराशी समान असणे. (**'एदुगै' नामक यमक**)

उदाहरणादाखल: दिलेल्या चित्रात; नाडीग्रंथांतील काव्याचा मजकूर तमिऴभाषेत जरी असला, तरी निरीक्षणांती अंतादि, मोनै तथा एदुगै हे नियम त्या काव्यात उपयोजिल्याचे स्पष्ट आढळून येईल, आणि त्यायोगे, तमिऴभाषेतील 'सिन्दुप्पा' ह्या काव्यशैलीशी ओळख होईल.

तत्प्रमाणेच, वरील सर्व नियम पाळून मराठीभाषेमध्ये केलेली कविता अभ्यासता, ह्या नियमांचे वैशिष्ट्य लक्षांत यावे. ह्या कवितेमध्ये, जातकाची खालील माहिती दिली गेली आहे.

१. जातकाचे स्वत:चे नांव, पत्नी तथा पालकांची नांवे, (4)
२. उद्योगाचे सर्वसाधारण वर्णन, (1)
३. जन्मविषयक नोंद, दिवस-रविवार, दिनांक-31, महिना-जुलै, वर्ष 1949. (4)
४. भावंडांमधील क्रम, (1)
५. भगिनींची संख्या, त्यांच्या विवाहित असण्यासंबंधी माहिती, (3)
६. मुलांची संख्या, (2)
७. शिक्षण, (1)
८. पद, (1)
९. ईशप्रार्थना. (1) असे एकूण 18 ठोकताळे

नांवधारी शशि, कांत अलकाचा
नमी मंगलाचरणी पुत्र जनार्दनाचा
जीवनी असे रत सततोद्योगी
जनसेवा नाट्यसेवा लिही कूटकोडी

कूटातूनि भानुदिनी एकतिसाव्या
काढा पन्नासी एका, मासी सातव्या
भेटा मज, कुलोत्पन्न ज्येष्ठपुत्रा
भगिनीद्वया परिणीता, तनयस्वजा मात्र

मात्रा गणिती वणिजशास्त्रज्ञाता
मिळे बढती चढे विंगकमांडर पदा
शत्रुकंठा फोडण्या विमाने व्याधापरि
शूलत्रय वायुसवे, देशरक्षा तरि

तरि प्रेमरूप दयानिधे दे काव्यस्फूर्ती
तोषवी काव्यकूजनी समाहृतचित्ती

तर प्रश्न असा, की; असा काव्यप्रकार मराठीभाषेमध्ये अस्तित्वांत आहे काय?

==========================================

हैयो लिखित वरील चारही लेखांच्या संदर्भात मराठीमधील वरिष्ठ समीक्षक व भाषाशास्त्रातील तज्ज्ञ डॉ. द. भि. कुलकर्णी ह्यांच्याशी ओक यांनी चर्चा केली. इथे आवर्जून उल्लेख करावासा वाटतो की "सिन्दुप्पा" ह्या तमिऴभाषी काव्यशैलीविषयी त्यांना कौतुक वाटले आणि चर्चेदरम्यान 'अशा प्रकारचे काव्यप्रकार बहुधा मराठी भाषेमध्ये नसावेत' असा अभिप्राय दभिंच्याकडून मिळाला.

मराठीतील यमकरचना प्रकारांवरील काही पुस्तकांचे संदर्भ देत दभिंनी मोजक्या पण फार सुंदर शब्दांत काव्यालंकाराची योजना कां व कशी केली जाते यावर भाष्य करताना म्हटले, "अलंकाराची रचना स्वाभाविकतेने केली

आहे की अट्टाहासाने; किंवा नुसती शब्दक्रीडा करायला केली आहे यावरून त्या काव्याची महत्ता कळते". दभि पुढे म्हणतांत, "अशा शैलीचा वापर करण्यामागे कदाचित् मंत्रशास्त्र अध्याहृत असावे".

यावर हैयो 'सिन्दुप्पावियल्' ह्या आसिरियर् इरा. तिरुमुरुगन् ह्यांच्या ग्रंथाचा संदर्भ देत म्हणतांत: "अट्टाहासाने एकाच छंदात हजारो काव्ये, तीही विविध कवींनी करणे शक्य वाटत नाही. शब्दमाधुर्य, शब्दाचे सौंदर्य दाखवण्याकरिता केले गेलेले हे कार्य स्वाभाविकतःच केले गेलेले आहे. कर्नाटकी संगीतामध्ये गाण्यायोग्य काव्य ह्या अर्थाने, सिन्दुप्पा काव्यशैलीमध्ये शब्दांचा नाद, ठेका, लघु-गुरु वजन असा हिशोब जरूर आहे, परंतु मंत्रशास्त्र हा मात्र फार पुढील टप्पा असल्याने त्याचा सिन्दुप्पा काव्यशैलीशी विशेष संबंध नसावा."

हैयो पुढे म्हणतांत, "'सिन्दुप्पा' ही तमिळभाषेतील पुरातन काव्यशैली होय. ह्या शैलीतील नियम पाळून आजदेखील तमिळ कवी काव्ये करतांना आढळून येतात. तमिळ भाषेसंदर्भात पदव्युत्तर अभ्यासक्रमात तमिळ काव्यशास्त्राचा समावेश आहे."

"नाडीग्रंथांचा त्यात संदर्भ सापडला का?" असे विचारता, "अजून तरी नाडीग्रंथांचा कुठे उल्लेख नाही" असे हैयो म्हणतांत.

---

टीप - वाचकांना हैयोंचे 'असे काव्य मराठीत आहेत का?' हे तीन भागातील तमिल काव्याचे बारकावे दाखवणारे पण नाडी ग्रंथांशी संबंधित नसलेले लेखन का सादर केले गेले आहे अशी शंका येईल. हैयोंच्या तमिल व्यासंगाचा आवाका व सखोलपणा वाचकांना ठसावा असा त्यामागील उद्देश आहे.

## नाडी ग्रंथांना नावे ठेवणाऱ्यांसाठी अभ्यासकार्य (चौकट)

नाडीग्रंथांतील ज्योतिष कथन विचार थोडा बाजूला ठेवून त्यातील फक्त काव्यनिर्मितीचा विचार करू या. आता विरोधकांना असे आवाहन करता येईल की त्यांनी आपापल्या भाषेत चार ओळीच्या श्लोकात अंतादि, मोने व इदुगै यमक काव्याची पथ्ये पाळून ज्या व्यक्तीची एखादी नाडीपट्टी असते ती त्याचीच आहे याची खात्री करुन देण्यासाठी त्याला नाडीपट्यातून मिळालेली माहिती उदा. आई-वडील, पती/पत्नी व स्वतःचे अशी नावे, जन्मतारीख, कुंडली, शिक्षण, नोकरी-व्यवसाय, भावाबहिणींची व संततीचा संख्या असे 15 ते 18 ठोकताळे वापरून, अंतादि यमकात श्लोक तयार करावेत. यासाठी लागणारी माहिती प्रत्येकाला आपल्यापुरती ज्ञात असते. ती माहिती वापरून विरोधकांनी नाडीमहर्षींप्रमाणे काव्य निर्मिती सादर करावी. ते काव्य आपल्या हातून शक्य होते का व होत असेल तर ते तयार करताना किती वेळ व कष्ट पडतात याची त्यांना कल्पना येईल. 'आपल्याकडून माहिती काढून तीच परत आपल्याला ताडपट्टीतून सांगितली जात आहे असा बहाणा केला जातो' या आक्षेपाला तात्पुरते मान्य करून नाडीवाचकांनी ग्राहकांकडून विविध तऱ्हेनी मिळवलेली माहिती यमकादी काव्याची सर्व बंधने पाळून असे झटपट काव्य करायचे ठरवले व त्यांनी ते काव्य तात्काळ रचून वहीत लिहून देणे शक्य आहे का याचा पडताळा घ्यावा. विरोधकांनी एका नाडीकेंद्रातून त्याचे प्रात्यक्षिक पंचांसमक्ष करून दाखवावे. नाडीकेंद्रात अशासाठी की तेथे नाडीवाचक ताडपट्टीतील तयार मजकूर वाचून तो फक्त वहीत श्लोकांच्या रुपाने लिहित असेल तर तो कसा लिहितो त्याचे प्रात्यक्षिक अनुभवाला मिळेल. ते पंचांनी अभ्यासावे व याची प्रत्यक्ष शहानिशा करावी आणि निकाल सादर करावा. अन्यथा आपल्याकडून माहिती काढून तीच परत आपल्याला सांगतात हा घिसापिटा आक्षेप खोटा व दिशाभूल करणारा आहे हे वाचकांना व विरोधकांना मान्य करावे लागेल.

---

## 43. 'नाडीग्रंथ - एक अभ्यास' पुस्तकात वर्णित केंद्रांची व व्यक्तींची सद्यस्थिती

**कै. शांताराम आठवलेंनी लिहिलेल्या या पुस्तकाची पारायणे केलेले अनेक लोक माझ्याशी संपर्क करतात. त्यांना त्यात मोहून टाकणाऱ्या कथनांच्या संदर्भातील केंद्राची व व्यक्तींची अधिक माहिती जाणून घ्यायची इच्छा असते. काही वर्षांपासून प्रस्तूत लेखकाने आपल्या हवाईदलातील व त्यानंतरच्या निवृत्तीकालात तसा शोध घेण्याचा प्रयत्न केला. पैकी काहींशी संपर्क होऊ शकला. त्याची थोडक्यात माहिती प्रस्तूत करत आहे.**

श्री. एस के दीक्षित उर्फ शिवकुमार दीक्षितांचा मेरठचे शास्त्रीं असा उल्लेख गौरवाने येतो. विशेषतः श्री एम आर आजगावकरांशी त्यांचे घरोब्याचे संबंध होते. 'त्याच्याकडील कुंडली व लग्नाचे अंश निश्चित करणारे एक यंत्र होते, भृगुसंहितेतून वर्तवली जाणारी सुक्ष्म अचुक भविष्ये म्हणजे एक अनाकलनीय रहस्य भांडार आहे.' असा पान

Figure 54 इथे खाजवायला फुरसत नाही त्यात हवाईदलातील ओकांनी नाडीचे लचांड उपस्थित केलेय! हवाईदलात त्यांना काही काम नसतं वाटतं?







१६१ वरील संदर्भ हल्लीच्या वाचकांची उत्सुकता ताणतात.

प्रस्तूत लेखक हवाईदलात असताना ४२१ बुढाना गेट, मेरठ येथे त्यांच्या घरी भेट देऊन आला. प्रथम १९९५ मधे श्री. शिवकुमारांच्या श्री. रमेशकुमार या चिरंजीवांशी भेट झाली. नंतर २००३ साली विनित कुमार या नातवाशी भेटण्याचा योग आला. या लेख लिहिण्याच्या निमित्ताने पुन्हा १ डिसेंबर २०१० ला संपर्क केला गेला. २००३च्या भेटीत त्यांनी शांतारामजींचे हिरव्या रंगाच्या मुखपृष्ठाचे पुस्तक प्रथम पहात असल्याचे सांगितले. आजोबा ६४ ते ७० पर्यंत वेळोवेळी मुंबईला जात असत नंतर कमी झाले. ते १९८२साली निवर्तले. वडील रमेशजी १९९९ मधे आजाराने गेले. तेंव्हा त्यांना 'महाकष्टम योग' माहित होता. विनीत कुमार नुकतेच मुंबई व पुण्यात येऊन गेल्याचे कळले. त्यांच्या कार्याला त्यांचा मुलगा विनायक कुमार संस्कृत तज्ज्ञ म्हणून हातभार लावतो असे त्यांच्या बोलण्यात आले. विनितजींना आपली कुंडली पाठवून ११००रुपये पाठवले तर ते संहितेतील पान शोधून कळवतात तेंव्हा प्रत्यक्ष जाऊन ग्रंथ पहाता येतो. त्यांच्याशी संपर्क - फोन ०१२१- २५२३०९९, २५३०९३५ किंवा मो. ०९८३७०६६२६३वर करता येतो.

**श्री. एम आर आजगावकर –** कै. शिवकुमार दीक्षितांच्या संपर्कातील स्नेही व्यक्ती होते. त्यांनी कै. शांतारामांना बरोबर नेऊन दि. १४-१०-१९६५ रोजी गुरुवारी, दुपारी ४ला ऑस्टेरियो नामक चर्चगेटच्या भागातील पॉश हॉटेलात रुम नं ३०८मधे वाचन केल्याचा उल्लेख पान ८४वर आला आहे. रईस पोषाख व सिगारेट्स पाकिटांची चळत बाळगणारे शास्त्री आपल्याला 'भृगुवक्ता' म्हणत, ग्रंथातील संस्कृत श्लोक वाचत व हिंदीत अर्थांतर करून सांगत.

त्याकाळात आजगावकरांचा ७-८ वर्षांचा रणजीत नावाचा मुलगा उत्कृष्ठ तबला वाजवीत असे. त्याची पत्री त्या दिवशी वाचली गेली. त्याच बैठकीत कै. शांतारामजींना मुलाला इंजिनियर करायचा मानस आहे असे वाचनात आले. त्याचे शांतारामजींना फार अजब वाचले. कारण त्यांचे चिरंजीव खरोखरचा इंजिनियरिंगचे शिक्षण घेत होते.

**कै. शांताराम आठवले (२१ जाने १९१० - २ मे १९७५)**



अनेक वर्षांपुर्वी प्रस्तूत लेखकाने शांतारामजींच्या सुदर्शन नामक त्या मुलाशी संपर्क केला, ते त्यावेळी किर्लोस्करमधून यशस्वीरित्या निवृत्त होऊन वडिलावर वेबसाईट व अन्य कामात त्यांनी वाहून घेतले होते. त्यांच्या दोन मोठ्या बहिणींपैकी पुण्यात राहणाऱ्या सौ. मंगला काकनूरकरांशी संपर्क झाला तेंव्हा त्यांनी त्याकाळात वडिलांनी नाडीग्रंथांवर लेखन करून मराठी वाचकांना भृगुसंहिता व नाडी ग्रंथांची ओळख करून देण्याचे महान कार्य केले असे बोलून दाखवले. तिकडे दादरच्या भागात राहणाऱ्या कै. आजगावकरांच्या रणजीत चिरंजीवांनी तबल्याची कला नंतर तशीच सोडून दिल्याचे फोनवरून कळवले.

पंडित हवेलीराम व अन्य शास्त्रींच्या गोष्टी –

Figure 56 कार्डिओग्राम सादृष्य लिखावटीचा नमुना

१९९३-९६च्या काळात प्रस्तूत लेखक तांबरम या चेन्नईच्या(तेंव्हाचे मद्रास) उपनगरातील हवाईदलाच्या स्टेशनमधे मुख्य लेखाअधिकारी म्हणून कार्यरत होता. त्यावेळी शांतारांमजींच्या पुस्तकातील पान ४३,५४,६७,९१,१८४,२१३ वरील पत्यांवर पत्रे पाठवून अनेक शास्त्रींशी संपर्क करायचा प्रयत्न केला होता. त्यातील काहींची माहिती अशी -

**पंडित हवेलीराम** - यांचे चिरंजीव पं. जुगल जोशींनी प्रस्तूत लेखकाची मोठ्या आनंदाने 'आओ भगत' केली. त्याचे असे झाले की '३, दरिया गंज दिल्ली ६' या तोकड्या पत्यावरील पत्र त्यांना मिळाले. ९५साली हवाईदलाच्या कामाला गेलो असताना त्यांच्या भेटीला आवर्जून गेलो. संभाषणात 'माझ्या जवळील अरुणसंहिता 'असली' व इतरांकडील बाकीचांच्या 'नकली' असल्याचे' ठासून सांगितले. तेंव्हा मला मजा वाटली. कारण बाकीचे उत्तरभारतीय भृगुशास्त्री देखील आमची असली व इतरांची नकली सांगण्यात भूषण मानतात. त्याचा अर्थ असा होतो की सर्वांच्याच संहिता नकली ठरतात. व्यवसाय़यिक चढाओढ त्याचे कारण असावे. पं. जुगलजींनी त्यांच्याकडील संहितेचे एक पान व त्यांच्या मताने 'नकली' पण होशियारपुरच्या केंद्रवाल्यांसाठी 'असली' पान, पर्ची वा पत्रीचे एक झेरॉक्स मला दिले. आता पं. जुगलजी दरियागंज सोडून जंगपुरा एक्सटेंशन भागात सी -१५बी मोठ्या फ्लॅटमधे स्थलांतरित झाले आहेत. फी वाढत आता ५००० झाली आहे. माझ्या हिंदी पुस्तकात त्यांच्या भेटीचा साद्यंत वृतांत वाचायला मिळेल.

**पंडित नारायण शास्त्री नंदी** नाडीवाचकाच्या पत्यावर पाठवलेले पत्र त्याठिकाणी रहात असलेल्या भाडेकरूने 'ऐसे नामका आदमी बरसो पहले गाँव चला गया' असे उत्तर पाठवले होते. कौमारन नाडीचे वाचक नयनार कदाचित कै. वझ्यांच्या संपर्कातील केंद्र चेन्नईत शोधूनही भेटले नाहीत. पं सूर्यनारायण व्यासांशी उज्जैनमधे प्रत्यक्ष भेटीत त्यांनी त्यांच्याकडील सुर्यसंहितेच्या पट्ट्या आपल्या 'भारती भवन' मधून हलवून तेथील 'विक्रम विश्वविद्यालयातील पुस्तकालयात' ठेवायला दिल्याचे अभिमानाने सांगितले. शक्य असेल तर १-२ मासला म्हणून पट्या पहायला, हाताळायला द्या असा आग्रह केला. तर त्यांनी टाळले. त्यांच्या कैलासवासी वडिलांना १९५६ च्या सुमाराला 'पद्मश्री' सन्मान मिळाल्याचे नक्षीदार फ्रेममधील मानपत्र भिंतीवरील ओल येऊन विद्रूप झालेल्या अवस्थेत लटकलेले पाहून मनाला खिन्नता वाटली.

तमिळनाडूतील कडलोरच्या जयकंठी नायडूंकडे शुक-मार्कंडेय अदभूत जीवनाडीच्या वाचनाचा आनंद सध्याचे नाडीवाचक श्रीकुमार चेन्नईत टीनगर भागात घेता येतो. त्या नाडीचे वैशिष्ठ्य असे की वाचक पांढऱ्याकोऱ्या कागदांना हातात धरून एखाद्याने प्रश्न विचारला की त्या कोऱ्या कागदांवर शब्द निऑन लाईटप्रमाणे तात्काळ उत्पन्न झालेला मजकूर घडाघडा वाचून उत्तर देतात. त्याची ऑडिओ कॅसेटही करून मिळते. गेल्या काही वर्षापासून आदेश आल्याप्रमाणे श्रीकुमार कोऱ्या कागदाऐवजी 'नागदंडात' (लाकडाची वाकडीतिकडी मुळी) पाहून वाचन करतात. आधुनिक काळात हा चमत्कार मानला पाहिजे. या नाडीतील मजकूर हव्या त्या भाषेत येतो असे समजले तेंव्हा प्रस्तूत लेखकाने संस्कृतमधून प्रश्न विचारला. त्याचे उत्तर संस्कृतमधून मिळाले. असेच एकदा एकानी फ्रेंचमधून उत्तर हवे म्हटले. त्याला श्रीकुमारांनी तमिळ लिपीतून जे वाचले ते त्या फ्रेंच व्यक्तीने त्याच्या भाषेतील उत्तर होते असा निर्वाळा दिला.

**घाणेकरशास्त्री** पुण्यातील अनेक लोक त्यांचे नाव आदराने घेतात. नारायणपेठेतील दाढीवाले दत्तमंदिरात किंवा अकरा मारुतीजवळ २३४-५ शुक्रवार पेठेत ते गाठ पडायचे म्हणतात. अनेकांना त्यांच्या भविष्यकथनाचा पडताळा आला होता. त्यांच्या पश्चात ते ग्रंथ कोठे आहेत याचा शोध काढण्याचा अनेकांनी प्रयत्न केला. ते वाचत ती मेरठवाली छापील भृगु संहिता होती असे म्हणणारे काही आहेत तर काही ते हस्तलिखित असे असा दावा करतात. पुण्यात एके ठिकाणी पाट मांडून छापील संहिता कथन ९५साली मी अनुभवले होते. ते सामान्य वाटले. असेच छापील ग्रंथ मला उखीमठ या हिमालयातील केदारनाथच्या वाटेवरील गावाकडील सेमवाल नामक ९० वर्षांच्या एका पुजारी कुटुंबापाशी पहायला मिळाले होते. मात्र ज्यात व्यक्तीचे नाव लिहून किंवा कोरून येते अशाच नाड्या वा संहितांबद्दल मी अभ्यास करत असल्याने हिंदी-मराठी-तमिळतील छापील संहितांची नोंद मी करत नाही.

काकैयार किंवा काकाभुजंदर, दैव केरलम्, ध्रूव, सत्याचार्य आदिंच्या बाबत असे कळते की त्या नाडीग्रंथांच्या पट्टया जोवर त्यांच्या हाती असतात तोवर त्या काही काळ चमकदार कथने देतात. मात्र नाडी ग्रंथवाचक बदलले की काही काळांनी त्या लुप्त तरी होतात किंवा त्यांचा प्रभाव, तेज कमी कमी होत जाते. याचा अनुभव प्रस्तूत लेखकालाही अनेकदा आला आहे. सध्या बोलबाला असलेल्या अगस्त्य नाडीचे नाव ही काही वर्षापुर्वी लोकांना माहित नव्हते. तर १०० - २०० वर्षे जुन्या काळातील त्यावेळच्या नाड्यांची फक्त नावे सध्या लोक घेतात. त्या कुठे मिळतील विचारले तर 'इल्ले सामी', माहित नाही म्हणून म्हणतात.

वाचकांना नाडी वाचनाचे काम करणारे आर. वाहब सैत नावाचे व अकबर नावाचे अन्य काही मुस्लिम नाडीवाचक आहेत असे कळल्यावर आश्चर्य वाटेल. त्यांच्याकडे 'काकैया पुजंड' नाडी आहे. त्यांचा पत्ता इंग्रजी पुस्तकात इच्छुकांना मिळेल. 'आपल्या धर्मात भविष्य पहायला बंदी असताना आपण हे काम कसे काय करता?' असे विचारले तर 'नबी साहब का आदेश आया है काम करनेकू' असे उर्दू मिश्रित तमिळटोन मधील वाक्याने बुचकळ्यात पडायला होते.

## 46. न्यायमुर्ती कै. रामचंद्र शंकर वझे - आद्य मराठी ऩाडीग्रंथ शोधक



Figure 26 **न्यायमुर्ती कै. रामचंद्र शंकर वझे महाराष्ट्रातील आद्य नाडीग्रंथ प्रेमी - त्यांच्या ७५व्या वाढदिवसादिवशी.**

'नाडी ग्रंथ – एक अभ्यास' या पुस्तकात न्यायमुर्ती कै. वझे यांचा उल्लेख प्रकर्षाने आला आहे. त्या मधून त्यांचे व्यक्तिमत्व थोडक्यात साकार होते. त्यांचे चिरंजीव प्रभाकर रामचंद्र वझे (वय 76) यांच्याकडे त्यांच्या वडिलांच्या अर्थात कै. रा. शं. वझ्यांच्या हस्ताक्षरात लिहून ठेवलेल्या वह्या व त्यांच्याशी संबंधित अनेक नातलगांच्या नाडीकथनांच्या एका रजिस्टरनुमा बाडात नोंदी संग्रहित आहेत. प्रभाकर यांच्यापाशी अशी एक ताडपट्टी देखील आहे. ज्यावर कूटतमिळ ऐवजी "इंग्रजी" मधे नाडीकथन कोरलेले आहे. (प्रस्तूत लेखकाला अशा तऱ्हेची इंग्रजीत लिहिलेली ताडपट्टी प्रथमच पहायला मिळाली) ती पट्टी व त्यावरील लेखन आपणांस अन्य लेखात वाचता ये़ईल. प्रभाकर व

त्यांचे अन्य बंधू अनुक्रमे मोठे विनायक(83) दत्तात्रय (80), व धाकटे अरुण (72) यांनीही काही रंजक आठवणी सांगितल्या. त्या सादर करीत आहे.

या सर्वावरून असे लक्षात येते की नाडी ग्रंथ हा विषय चेष्टेवारीचा किंवा तथातकथित विज्ञानवाद्यांनी "थोतांड आहे" म्हणून टाळण्याचा नाही. कै. रा. शं. वझ्यांच्या सारख्या न्यायमुर्तींनी ज्यांची पूर्ण हयात "पुराव्याशिवाय मान्य करणार नाही" या बाण्याने केलेल्या निस्पृह व सचोटीच्या नोकरीत (सन १९२६ ते १९५४) गेली अशा व्यक्तीनी यावर अभ्यास करून अनेक विज्ञानवाद्यांना नाडीग्रंथांबद्दल आणखी अभ्यासपुर्ण शोध घेणे कसे आवश्यक आहे असा पाठ घालून दिला आहे. आपल्या वडिलांच्या आठवणी सांगताना प्रभाकर म्हणतात, "माझ्या वडिलांचा ज्योतिषाचा अभ्यास होता. त्यांना ग्रहस्थितीचे बारकावे व त्यांचे प्रभाव याचे सखोल ज्ञान होते. त्यांनी तरुणपणी मुंबईतील नंदी नाडीवाचकाकडून आपले भविष्य पाहिले होते. नंतर कारणपरत्वे त्यांनी देशातील उत्तरभारतापासून दक्षिणेत तमिळनाडूमधील अनेक नाडी कैंद्रांना भेटी दिल्या. त्यामधून त्यांनी पाराशर होरा, शुक्र नाडी, रवी नाडी, ब्रह्म नाडी अशा विविध संहिता व नाडी पट्ट्या अवलोकन केल्याचे दिसून येते. मिळवलेल्या भविष्यांची कथने त्यांनी एका रजिष्टरमधे इंग्रजी भाषेत लिहून ठेवलेली आढळतात."

प्रभाकर पुढे म्हणाले, "आम्हा प्रत्येक भावासाठी त्यांनी एक एक रजिष्टर बनवले होते. त्यांचे व वरिष्ठ बंधू विनायक यांचे रजिष्टर आजही जपून ठेवलेले आहे. त्यातील उल्लेख फारच अदभुत आहेत. काही उदाहरणे कथन करताना प्रभाकर म्हणाले, "मला MES (Military Engineering Service) मधे असिस्टंट गॅरिसन इंजीनियरपदावर नोकरी मिळाली. लोहगावच्या हवाईदलातील विभागात माझे काम व कार्यालय होते. काही महिन्यात मला सरकारी कामात रस वाटेना. नोकरीचा राजिनामा देण्याचे मनावर घेतले तेंव्हा त्यांना वडिलांनी थांबायला सांगितले. नाडी कथानातून काही आदेश मिळतो का हे पाहण्याला वयाच्या ६५ व्यावर्षी ते मुद्दाम मद्रासला गेले. ही गोष्ट साधारण ६४ सालची असावी." तेथे नाडी वाचक नयनार यांच्याकडील शुक्र नाडीतून 'सध्या नोकरी करावी लागेल' असे लिहून आल्यामुळे प्रभाकरांनी राजिनामा देण्याचा बेत वडिलांच्या आदेशावरून रहीत केला. पुढे बढती मिळून ते जीई (गॅरिसन इंजिनियर) झाले. त्यावेळी त्यांच्या सिव्हील कामात लोहगावच्या तळावरील अनेक इमारती व घरे बांधली गेली. ते सहज म्हणाले, 'आम्ही तेव्हा ९२ बी मधे रहात असू'. ( सहज आठवले म्हणून - प्रस्तूत लेखक हवाईदलात असताना लोहगावच्या पोस्टींग मधे ९१ बी या त्यांच्या शेजारच्या क्वार्टरमधे १९९८ ते २००१ पर्यंत राहत होता) पुढे ५ वर्षांनी मात्र पुणे सोडून प्रभाकरांना दूर पोस्टींगला जाण्याची वेळ आली तेंव्हा घरची सर्व परिस्थिती विचारात घेऊन वडिलांच्या विनंतीला मान देऊन ती नोकरी त्यांनी सोडली व स्वतःचा कॉंट्रॅक्टरचा व्यवसाय सुरु केला. याचीही उल्लेख नाडी कथनात पुर्वी आला होता.

दरम्यान त्यांना नंदिना 'मुलगी' झाली तिचे नाव 'न-द-न' अशा अक्षरात असेल हे ही खरे ठरले, नंदिनी नंतर प्रभाकरांना अपत्ये काय होतील? असे त्यांच्या वडिलांनी रवी नाडीत सन ६७च्या सुमाराला विचारले. तेंव्हा तिच्या पाठीवर 'मुलगा' होईल असे म्हणून त्याची कुंडली मांडून ग्रहस्थिती दाखवली गेली. पुढे १९६९ मधे प्रभाकरांना 'मुलगा' झाला त्याचे नाव 'सुहास' असे ठेवण्यात आले. त्याच्या जन्मानंतर पाहिल्या गेलेल्या 'ब्रह्म नाडी'मधील त्यांच्या वडिलांच्या रजिष्टर नोंदीप्रमाणे तेंव्हा नुकत्याच जन्मलेल्या नातवाची

ग्रहस्थिती नेमकी तीच वर्णन केली होती फक्त लग्न ‘कर्के’ ऐवजी ‘मकर’ असे होते. असे त्यातून अभ्यासले असता लक्षात येते.

नंदिनी ५ वर्षांची असताना तिच्याबद्दलचे अनेक उल्लेख आश्चर्यकारकपणे पुढे बरोबर आले. उदाहरणार्थ, शिक्षणात तल्लख, कॉमर्सची पदवीधर, विवाहानंतर नागपूरला व त्यानंतर काही वर्षांनी मद्रासला जावे लागेल, नंतर कॉम्प्यूटरचे शिक्षण घेऊन ‘उपदेशिका’ म्हणजे ‘शिक्षिका’ होईल. पुढे आणखी काळानंतर आपली स्वतःची संस्था काढून त्यात शिक्षणदेण्याचे कार्य करेल. (ती M. Com ला first class first आली) व (ते अगदी बरोबर झाले आहे. कारण विवाहानंतर विविध गावानंतर, मद्रासला NIIT मधे दहा वर्षे काम करून नंदिनी सध्या दोन मुलींसह ‘वृक्ष’ नावाने ती शिक्षणसंस्था चालवते आहे) प्रभाकर पुढे म्हणाले, ‘सन १९६७ सालात ‘कॉम्प्युटर’ ही संकल्पना फक्त माहिती होती. मात्र प्रत्यक्षात ते काय असते याची भारतात कोणालाच फारशी माहिती नसताना त्याचा आवर्जून आलेला उल्लेख विशेषत्वाने मला चक्राऊन टाकणारा वाटतो.’ ते पुढे म्हणाले, ‘आमच्या घरात एकदा एक मुलगी तिचे नाडी कथन ऐकायला बसली होती. नाडी शास्त्री वाचताना अडखळला. कारण त्यात तिला विवाहसौख्य नसल्याचे लिहिले होते. (त्या काळात ती आधीच घटस्फोटिता होती व पुढे ही कथनाप्रमाणे अविवाहितच राहिली!)

आपल्या सुहास नावाच्या मुलाबद्दल सांगताना ते म्हणतात की ‘तो विमानाशी निगडीत (नाडी पट्टीत विमानाला ‘जटायू’ असा उल्लेख आला आहे) कामात त्याला नोकरी असेल. पण पायलट नसेल. हे कथन ही अगदी अचुक आहे. त्याचा विवाह विदेशी (प्रत्यक्षात फिलिपायनी) व्यक्तीशी पुण्यात होईल व तो परदेशातच स्थायिक होईल असे कथन त्याच्या बालपणी २-३ वर्षाचा असताना केलेले कथन ही नंतर बरोबर आले.



Figure 57 डावीकडून मेरठचे विनीतकुमार, वडील रमेश व आजोबा कै. शिवकुमार दीक्षित

आमच्या ‘विवेक’ बंगल्यातील – आपल्या जुन्या आठवणी सांगताना प्रभाकरांच्या पत्नी सौ. सुवर्णा म्हणाल्या. ‘जेथे आपण सध्या गप्पा मारतोय - या हॉलमधे आमच्याकडे त्यावेळी तमिळ नाडीवाचक राहायला उ [illegible] ा मागवले जाई. त्या न [illegible] ेल तशा इंग्रजीतून तामिळमधून भाषांतर करून सांगत असत. आमच्या श्वशुराच्या मित्रमंडळीच व काही नातलगांचे कथन ते स्वतः मराठीतून कच्चे व नंतर इंग्रजीत पक्के करून रजिष्टरमधे नोंदवत असत. अनेकांनी त्या महिनाभरात नाडी ग्रंथांचे अवलोकन केले होते. त्यानंतर असे कोणी तमिळ नाडी ग्रंथवाचक आमच्या घरात येऊन राहिल्याचे आठवत नाही.’ प्रभाकर नंतर अलीकडच्या काळात म्हणजे १७ सप्टेंबर, १९९८ला जेंव्हा मुलीकडे चेन्नईला गेले तेंव्हा ज्या नाडीग्रंथांनी वडिलांना आकर्षित केले होते त्या नाडी ग्रंथांचे आपणही अवलोकन करु या असे वाटून कांचीपुरमच्या डी बालासुब्रमण्यम यांच्या अगस्त्यनाडी केंद्रातून पाहिले.

विनायक हे कै. वझ्यांचे मोठे चिरंजीव. त्यांच्या बद्दलचा उल्लेख कै. शांताराम आठवल्यांच्या पुस्तकात आला आहे. शेंदुर्णी (खानदेशात) जन्म. वडिलांच्या व्यवसायाचे - ‘लॉ’चे - शिक्षण. काही काळानंतर जज म्हणून नोकरी कराल वगैरै कथन तंतोतंत खरे ठरले. दि. १६ ऑगस्ट १९६४ला वडील त्यांची शुक्र नाडीपट्टी पहात असताना त्यांना सोलापूरहुन दिल्लीला (हस्तिनापुर नाडीतील उल्लेख) जाण्याचा योग आहे. तेथे पाच भाषांसाठी काम करावे लागेल. काही काळानंतर परत याल व वरच्या हुद्यांवर काम करताना वडिलांपेक्षा जास्त मानमरातब मिळवाल. दोन मुलगे होतील. (मोठा संजीव व धाकटा संदीप) मोठा परदेशात स्थायिक होईल. त्याच्या आजोबांप्रमाणे त्याला बहु भार्यायोग आहे, विनायक म्हणतात, ‘माझ्या वडिलांचे तीन विवाह झाले. तेच माझ्या मुलाच्या नशिबी पण आले.’

विनायक आपल्या वडिलांच्या आठवणींबद्दल सांगताना म्हणाले, ‘वडिलांचा जन्म ३० मार्च १८९९चा. देहावसान २८ जानेवारी १९८७ झाले. लॉची पदवी मुंबईतून मिळवताना हिंदू लॉसाठी ते सुवर्णपदकाचे मानकर होते. वकिली करण्याचा विचार असताना तात्कालिक कारणांनी त्यांना जजच्या नोकरीसाठी अर्ज करावा लागला. अर्जाचा रीतसर नमुना मित्राला दिल्याने त्यांनी ऐत्यावेळी साध्या कागदावर केलेला नोकरीचा अर्ज मंजूर होऊन ते नोकरीत रुजू झाले. पुढे त्यांनी महाराष्ट्रात विविध ठिकाणी जिल्हा मॅजिस्ट्रेटच्या पदांवर काम करून वयाच्या ५५व्या वर्षी म्हणजे सन १९५४मधे निवृत्ती पत्करली. वडिलांना टेनिस खेळायचा षौक होता. तसेच ते निष्णात ब्रिज खेळत. रँग्लर महाजनी व रँगलर परांजपे त्यांच्या अनेक स्नेह्यांपैकी होते. काही काळ ते मुंबई उच्च न्यायालयाचे रजिस्ट्रार होते. सांगलीकर संस्थानिकांचे कायदा सल्लागार म्हणून काम केल्यावर त्यांची नियुक्ती प्रभात फिल्म कंपनीच्या पडत्याकाळी लिक्विडेटर म्हणून झाली होती. पुण्यातील बालगंधर्व चौकात येणाऱ्या घोले रस्त्याला मिळणाऱ्या रस्त्याला सध्या कै. रा.शं. वझे मार्ग असे नाव आहे. तेथे त्यांचा विवेक बंगला आहे. आम्ही तिघे भाऊ सध्या इथे राहातो. दत्तात्रय हा सख्खाभाऊ डॉक्टर होऊन आर्मीत कर्नल हुद्यावरून निवृत्त झाला.

विनायक म्हणतात, त्यावेळच्या नाडीपट्यात पत्नीचे माहेरचे नाव हटकून येत असे. जसे आमची आई, वडिलांची दुसरी पत्नी. जानकी (क्र.२) तिचे माहेरचे नाव वेणू. प्रभाकर व अरुणच्या आईचे जानकी (क्र.३) माहेरचे नाव दुर्गा नाडी पट्टीतून अचुक लिहिले होते. माझी पत्नी सुनीतीचे माहेरचे नाव शकुंतला, प्रभाकरच्या सुवर्णा- पत्नीचे आधीचे नाव जयश्री, दत्तात्रयच्या सुजाता पत्नीचे आधीचे पुष्पा व अरुणच्या सुमिता पत्नीचे माहेरचे नाव होते मृदुला वगैरै उल्लेख आश्चर्यकारक वाटतात.

नाडीग्रंथांच्या आठवणी सांगताना दत्तात्रय म्हणाले, ‘मी आर्मीत असताना होशियारपुरमधील भृगु संहिताचे अनुभव घ्यायला तीनदा जाण्याचा योग फसला. चौथ्यांदा भरपावसात जाण्याची पाळी आली व काही कष्टाने कथनाच्या पट्या मिळवल्या. त्यावेळी नोकरीतून निवृत्तीचे विचार येत होते याचा उल्लेख आला व सध्या नोकरी सोडता येणार नाही. असे कथन नोकरी पूर्णकरून झाल्यावर खरे ठरले. मी मद्रासला पोस्टींगवर असताना माझी इच्छा असूनही तमिळमधील नाडी भविष्याचा अनुभव मला घेता आला नाही. त्याकाळच्या प्रथेनुसार मुले वडिलांपासून चार हात दूर असत. त्यामुळे वडिलांशी सलगी करून त्यांच्या नाडीग्रंथांवरील अनुभवांबद्दल किंवा मतांबद्दल अधिक माहिती मिळवणे शक्य झाले नाही. असे सर्व बंधूंचे मत पडले. अरुण यांच्याकडे त्यांचे रजिस्टर आहे. त्यांनी आवर्जून वडीलांचा (वर प्रस्तुत )एक फोटो दिला.

जसे वझ्यांच्या नोंदीतील अनेक कथने अचुकपणे घटित झाली तर काही कथने अचुकपणे घडली नाहीत. उदा. संदीप या विनायकांच्या दुसऱ्या मुलाचे शिक्षण वडील व आजोबांसारखे लॉचे न होता कॉमर्सचे झाले व पुढील कथन अचुक आले नाही. विनायक यांचे शिवाजीनगर शिवाय आणखी एक घर पुण्यात मुकुंदनगरमधे होईल हे कथन घडले नाही. नाडी पट्यात एखाद्या शहरातील शिवाजीनगर, मुकुंदनगर अशा उपनगरांचा उल्लेख आल्याचा अनुभव प्रस्तूत लेखकाला प्रथमच होता.

प्रभाकरांना आणखी एक मुलगा व मुलगी होईल ते घडले नाही. प्रभाकरांचा मुंबईत व्यवसाय होईल असे घडले नाही. पण एका कच्छी गुजराथी माणसाशी व व्यवसायासाठी मित्रता होईल हे घडले. त्यांची नावे प्रतापभाई व अनिल कुमार व सिंधी सहकार्याचे नाव असेल. ते नव्हते. प्रभाकरांचा नव्या प्रकारच्या मातीच्या

विटा बनवणे आणि धातूंच्या मिश्रणाच्या कामाशी संबंध असेल. सिमेंट्च्या विटा व पोलादी बांधकामाचे साहित्य मानले तर ते भाकित म्हणून खरे ठरते. पत्नी जानकी नं ३ वडिलांच्याआधी न जाता सन २००७ पर्यंत जीवंत होत्या.

प्रभाकरांनी मोठ्या मनाने वडिलांच्या हस्ताक्षरातील लेखनसाहित्य व ताडपट्या हाताळायला दिल्या. वडिलांचे भारदस्त व्यक्तिमत्व व ज्योतिषाचा अभ्यास व नाडीशास्त्रींना हाताळायचे कसब यामुळे अलंकारिक तमिळभाषेतील कथन समजणे एक कसरत होती. असा अवघड प्रवास तेंव्हाच्या काळी वडिलांनी विशेषतः निवृत्तीच्या काळात वयाच्या साठीनंतर भारतभर करून करून दाखवला.

fourth, tenth and eleventh on 28·4·1964. At the time of giving the leaf, Ramchandra his father will wear white shirt, grey coloured coat, white dhotar and a black cap on that day.

Figure 58 कै शांतारम्म आठवलेंनी नाडीग्रंथांची गोडी मराठी लोकांना लाऊन दिली

कै. वझ्यांनी नाडीग्रंथ अभ्यास कार्याचा महाराष्ट्रात पाया घालून नाडी ग्रंथांना अवलोकण्याची प्रेरणा अनेकांना दिली व कथनांच्या नोंदी करण्याचा वस्तुपाठ घातला असे म्हणावे लागेल. आज नाडी ग्रंथांची २०० पेक्षा जास्त केंद्रें भारताच्या विविध भागात चालू असून नाडी लेखनाचा अभ्यास तमिळ भाषा व लिपीचे सखोल ज्ञान असणाऱ्या हैयोहैयैयो सारख्या मराठी तज्ज्ञांकडून होत आहे ही मराठी लोकांसाठी विशेष अभिमानाची गोष्ट आहे.

कै. रा.शं. वझ्यांच्या स्मृतीला आठवण म्हणून दि. १४ ऑक्टोबर २००७ला नाडीग्रंथांवरील पुण्यात संपन्न झालेल्या पहिल्या नाडी ग्रंथ ज्योतिष अधिवेशनात श्री. प्रभाकरांचा शाल श्रीफळ व गौरवचिन्ह देऊन सत्कार केला गेला.

## 44. सूर्यसंहिता कथनातील एक प्रस्थ– श्री. अनिलभाई आचार्य - छायाशास्त्री, लॅमिंग्टनरोड, मुंबई.



Figure 27 श्री. अनिलभाई आचार्य छायाशास्त्री




Figure 28 स्व. श्री. बाबूभाई छायाशास्त्री

**सूर्य-भृगुसंहिता कथनातील एक प्रस्थ– कै. बाबुभाईजोशी यांचे चिरंजीव अनिलभाई आचार्य - छायाशास्त्री, लॅमिंग्टनरोड, मुंबई**.

## एक नवा किस्सा :-

बाबुभाईंचे नाव व त्यांच्या सुर्यसंहितेचे किस्से सांगावे तेवढे थोडेच. सध्या त्यांचे हर्षदभाई, अनिल भाई व रजनी भाई हे चिरंजीव आणि त्यांची मुले कुणाल, प्रतीक संहिता वाचन करतात. व्यक्तीला उन्हात उभेकरून त्याच्या सावलीच्या मापावरून योग्य त्या ताडपत्राचा शोध घ्यायची अभिनव पद्धत जर कोणाची पत्रिका मिळत नसेल तर वापरली जाते.

नुकताच डिसेंबर 2011मधे त्यांचे चिरंजीव अनिल भाईंकडून सुर्यसंहितेचे वाचन ऐकण्याचा योग आला. त्याचे असे झाले, काही कारणाने मी (ओक) मुंबईला हैयोहैयैयोंकडे उतरलो होतो. सहज बोलता बोलता त्यांनी अनिलभाईंना वाचनासाठी वेळ मागितली आणि ती लगेच दुसऱ्यादिवशीची मिळालीही! आश्चर्य असे की मी यासाठी वर्षोवर्षे वाट पहात होतो. झाले. त्यांच्याकडे सकाळी दहाला पोहोचलो. कोणाचे भविष्य पहायचे आहे असे त्यांनी विचारले, तेंव्हा मी व श्री. विक्रम फडके (वसईजवळील सफाळेहून मुद्दाम आले होते.) एकमेकांकडे पहात हैयोंकडे निर्देश करून 'यांना' असे म्हणालो, तोवर खरे तर कोणासाठी आम्ही तेथे गेलो होतो असे काही ठरवलेले नव्हते! हैयोंची छाया उन्हात मोजली गेली. त्याची मापे त्यांच्या मुलानी येऊन सांगितल्यावर टेबलच्या एका ड्रॉवरमधून अनिलभाईंनी अलगद एक ताडपत्रांचे बंडल काढले. हैयोकडे काही कागदाचे ताव कथन लिहायला देत त्यातील काही पट्या हातात घेऊन वाचनाला सुरवात झाली. एका पट्टीत वडिलांचे नाव व व्यवसायापर्यंत धागा जुळला असे वाटे तोवर आईच्या नावावर गाडी अडकली. उषा का? यावर 'नाही' म्हणताच ती पट्टी खाली टाकून पुढे वाचन सुरू झाले. पुढील काही पट्यानंतर नेमकी एक पट्टी हाती आली त्यात सर्व माहिती फिट्ट बसली होती. तेवढ्यात अनिल भाईंना मोबाईलवरून कॉल आल्याचे निमित्त झाले व ते उठून खोलीच्याबाहेर जाण्याच्या आत आम्ही त्यांना पट्ट्या हाताळू का असे विचारले व त्यांनी हातानी हो असे सुचित केले आणि त्या पट्टीला पहायला आम्हाला छान उसंत मिळाला. हैयोंनी त्यांच्या स्टाईलने पट्टी



**Figure 29 अनिलभाईंनी सुर्यसंहितेच्या मुळ पट्यापहायला दिल्या त्या या पॅकेटमधील होत्या.**

थोडावेळ पहाणी करून हैयोंनी म्हटले की यातील लिपी ‘कल्याणी’ आहे. आमच्याच थोडी चर्चा होईतोवर अनिलभाई आले त्यांना भाषेची व लिपीच्यावर माहिती विचारता त्यांनी ‘असेल कदाचित’ असे ते मोघम म्हटले. ‘13सौ साल के पहले हमारे पुर्वज वहांसे गुजराथ आए और मेरे पिताजी के समय से हम लोग मुंबई बस गए हैं’ असे म्हणाले. त्यांना हैयोंची एक भाषा व लिपी तज्ज्ञ म्हणून ओळख करून दिली गेली. त्यावर ‘आपल्याला भेटून आनंद झाला काही विचारणा असेल तर सांगा, जरूर सहकार्य करीन’ असे ते म्हणाले.



**Figure 30 हैयोपट्टीतील लेखनाची लिपी व अन्य वैशिष्ठ्ये पहाताना**

काही काळानंतर मुंबईत एक कार्यशाळा करायचे घाटत आहे त्यात आपण यावे अशी त्यांना निमंत्रण वजा विनंती मी केली. त्यांनी 'मुंबईत असेन तर जरूर येऊ'. म्हणून ती मान्य केली. त्यांच्याकडील ताडपत्रावर संस्कृतमधील नाडीकथनाचे आलेले अदभूत अनुभव मी पुर्वीच्या नाडी ग्रंथ भविष्याच्या आवृत्तीत नमूद केले आहेत. आता त्या आवृत्यातील वेगवगळे लेख एकत्रित करून वेगळे पुस्तक प्रकाशित करायची वेळ आली आहे. असो.

असेच एक पंड्यानामक गुजराथी पंडित छायाशास्त्री पेडर रोडवर होते. त्यांच्याकडे ठाण्याच्या 'मा प्रेम भारतींच्या' समावेत त्याच्या ग्रंथातून मला भविष्य काळात ब्रह्म व नारद संहिता हाती मिळण्याचे भाग्य वर्तवले गेले. ते कालांतराने वारले. 'अत्यंत विक्षिप्त' असे त्यांचे वर्णन अनेक जण करत. असो.

चिरंजीवांनी – कुणालनी आता सुर्यसंहिता वाचायला प्रारंभ केला आहे असे कळते. प्रतापगडाच्या जीर्णोद्धार समितीचे आयोजक व प्रवर्तक **श्री कौस्तुभ भाई बुटाला** (मो. ९३२३७१५७३४)एक मोठे उद्योजक आहेत. त्यांच्या प्रेरणेने शिवगड प्रेमींनी महाराष्ट्रातील अनेक दुर्गांना पुर्वीच्या वेळची वैभवाची प्रतिष्ठा मिळवून देण्याचे कार्य हाती घेतले आहे. श्री कौस्तुभ बुटाला हे सुर्य संहितेचे प्रखर प्रेमी आहेत. श्री. हर्षद भाईंकडून सूर्य संहितेमधून वेळोवेळी त्यांना किल्यांच्या जीर्णोद्धाराचे कार्य करण्यास कौस्तुभ बुटालांना आदेश आले. त्याप्रमाणे ते कंबर कसून कामाला लागले आहेत.

## 45.झेक प्रजासत्ताक राष्ट्रातील भारतवेडी कमला

***आपण ऐकत आलोय स्वामी विवेकानंदांच्या आभावलयामुळे प्रभावित भगिनी निवेदिता[1] किंवा महात्मा गांधींच्या सात्विक व तत्वनिष्ठेने प्रभावित मीराबेनची[2] आत्मसमर्पणाची भावना. देश, बंधु-बांधवांना सोडून भारताची आस धरुन आलेल्या त्यागी महिला. अशीच एक भारती वेडी महिला - कमला!***

युरोप खंडातील झेक रिपब्लिक राष्ट्रात नाडी ग्रंथ भविष्यावर पहिले आंतर राष्ट्रीय अधिवेशन जून 2010 मधे भरले होते. त्यावेळी प्रागच्या वास्तव्यात अनेकांच्या व्यक्तिमत्वांची छाप आम्हावर पडली त्यातील एक प्रभावी व्यक्तिमत्व म्हणजे कमला उर्फ कॅथरिना स्लाडका.

कॅथरिन दिसायला ठेंगणी ठुसकी. गोरी, घारे डोळे, सरळ नाक व मक्याच्या कणसातून निघणाऱ्या कोवळ्या सोनेरी झुपक्यांच्या रंगाचे केस असलेली. अस्खलित इंग्रजीतून प्रभावीपणे आपले मनोगत स्पष्ट करणारी.

वारंवार भेटत राहिली. भारताविषयीच्या आपल्या आदराच्या भावनांना शब्दांकित करताना डोळ्यात आनंदाश्रू उभे करून गेली.

कॅथरिन आठवली की तिच्यासारखे भारतावर निर्व्याज प्रेम आम्ही भारतीय तरी करू शकतो का असे सहजच वाटायला लावणारी ही मुलगी. साधारण ४०चाळीशीतील असेल असे तिचे नाडी ग्रंथातील कथनावरुन मानावे लागले.

भारतातून कोणी आले की मला फार आनंद होतो. त्यांच्याशी बोलताना, त्यांचे विचार ऐकताना मला प्राचीन गौरवशाली भारतीयांच्या मनाला भेटल्याचे समाधान वाटते. मी नाडीग्रंथावरील आपल्या इंग्रजी पुस्तकाची पारायणे केली आहेत. आपली जर हरकत नसेल तर मी आपल्या सानिध्यात राहून नाडीमहर्षींच्या बाबतीतील आपले विचार ऐकायची फार इच्छा आहे. आपण बोलत रहावे. मी तिला बोलते करायला विचारले, तुला भारताविषयी इतके प्रेम कैंव्हापासून वाटायला लागले? तू भारतात कैंव्हा आलीस? का आलीस?

ती म्हणाली की अगदी लहानपणापासून मी मला भारतीयच असल्याचे समजते. का? कसे? मलाही ठाउक नव्हते. मी आले ते पुण्याच्या जवळील लोणावळ्यातील एक गुरुंच्याकडून योगसाधना करायला. त्यानंतर फिरत फिरत रमणाश्रमात जाऊन तेथील तिरुवन्नमलाईच्या पर्वतावरील रम्य व गूढ वातावरणाने मला वेडे केले.

मी भारतीय नृत्य व अन्य कला शिकले. भारतात अनेक पवित्रस्थानांना भेटी दिल्या. अनेक संत महंतांचे आशीर्वाद मिळवले. मी इथे प्रागला आमच्या प्रापर्टी सांभाळायला राहाते. पण मला अमेरिकेत शिक्षणासाठी राहायला लागले असल्याने मला इंग्रजीत बोलायचा उत्तम सराव आहे.

खरे तर मी शरीराने या झेक देशात असले तरी मनाने मी सतत भारतात वावरते. तशी मी भारतीयच मानते स्वतःला!

---

[1] भगिनी निवेदिता – मार्गारेट नोबल . Margaret Noble,(28 -11-1887 – 28-10-1958). Irish lady came to India as disciple of Swami Vivekeannanda. She was very much upset for Dr. J.C. Bose could not get recognition due to him by Antibose lobby in England.

[2] मीरा बेन - मेडलिन स्लेड . Medline Slade (22/11/1892) Daughter of Admiral Sir Edmond Slade became ardent follower of Mahatma Gandhi. Served imprisonment in Agakhan Palace, Pune India; for 93 weeks. Presented herself as mediator in round Table Conference in England with Mahatmaji. All ways presumed herself as Indian Despite many hardships of Indian environment,

आज माझे नाडी ग्रंथांतील कथन ऐकून मला प्रथम धन्य वाटले की प्राचीन भारतीय परंपरा किती थोर आहे. मानवतेसाठी निस्वार्थ बुद्धीने आपली पज्ञा पणाला लावणारे फक्त भारतीयच असू शकतात हे मला आज नाडीग्रंथांतून माझ्या बाबतच्या कथनाने प्रकर्षाने जाणवले.

महर्षी तर मला भेटायला आले होते. त्यांच्या लाडक्या मुलीला. तिचे लाड करायला. तिला तिचा पुर्वजन्मातील इतिहास कळवायला. त्यात त्यांनी म्हटले की 'तू त्या काळातील लोकांना आपल्या देश बांधवांना, निरपराध जनतेला परागंदा व्हायला परावृत्त केलेस. त्यांच्या यातना तुला कळाव्यात. त्यांची ताटातूट तुला अनुभवायला यावी म्हणून तू आज ऐश्वर्यात व सुखात असलीस तरी मायदेशाची ओढ तुला चैन पडू देत नाही. तुला अद्दलही घडवायची आहे आणि तुझी पारमार्थिक प्रगती करायला तुला प्रवृत्तही करायचे आहे.'

तिला उद्देशून महर्षींनी काढलेले उद्गगार ऐकून तिला तिच्या या जन्मातील भारताच्या ओढीचा व ताटातुटीचा अर्थ कळला. 'असे अनेक मानव आमची इथे वाट पहात होते त्यांना योग्य वाट दाखवून काही काळांने त्यांना त्यांच्या आयुष्याची सार्थकता कशात आहे याची जाणीव करून द्यायची वेळ आली.'

'आम्हाला भारताची सीमा ओलांडून तुमचा पाहुणचार घ्यायला, इथल्या काही लोकांना प्रवृत्त केले गेले. यापुढे या खंडातील अनेक लोकांना नाडी ग्रंथांचा परिचय करून देऊन आमच्या कार्याची सखोल माहिती करून द्यायला अनेकांना उद्युक्त करायचे कार्यही आमच्याकडून होत आहे.'

महर्षींच्या द्रष्टेपणाची झलक त्यावेळी प्रकर्षाने मला जाणवली. लहान बालकाला त्याच्या चालीने हातात हात धरुन त्याला रुचेल असे वागून आई-वडील ज्या आस्थेने बालकांचे पालन- पोषण करतात. त्याच मानसिकतेने आम्हा सामान्यांना नाडी महर्षी ज्याच्या त्याच्या योग्यतेनुसार हिताचे मार्गदर्शन करतात. सुचवतात. काही मानतात. त्यांना उपयोग होतो.

हॉटेलात जेवताना फक्त शाकाहार व शुद्ध पाणी पिणारी, कॅथरिना फार लाघवी. गप्पिष्ठ. ती बोलायला लागली की तिची वाणी ऐकत रहावीशी वाटे. आमच्या राहत्या घरात येऊन मी आपल्याला भेटले तर आपल्याला आवडेल का? मी आपल्या सारख्या भारतीयांबरोबर क्षण न क्षण घालवायला आतूर आहे. अशा भारतवेड्या मुलीला नाही तरी कसे म्हणणार?

तिला तिच्या गुरूंनी जेव्हा "कमला" हे नामाभिकरण केले तेंव्हा ती फारच आनंदली. तिची अध्यात्मिक प्रगती पाहून तिच्या बरोबरच्यांना वाटले की तिला आपले गुरू काहीतरी खूप उच्च दर्जाचे नाव लावायला सांगतील. त्यामानाने कमला फारच अळणी वाटले. त्यावर तिने केलेले भाष्य फारच प्रभावी होते. "KAMALA MEANS LOTUS. IT IS THE FORM OF PURITY. SHOWING THE WORLD HOW ONE CAN UPHOLD ITSELF BEING IN THE SWAMP OF COMPLEX AFFAIRS OF THE NATURE." लोटस म्हणजे कमल. निष्कलंकता. आसपासच्या निसर्गदत्त दलदलीपासून अलिप्त राहण्याची साधना जगाला दाखवणारे ते प्रतीक आहे.

"भारत" म्हटल्यावर तुझ्या मनात काय येते? असे विचारल्यावर तिचे बोल होते, "COMPASSION. TOLERANCE, KNOWLEDGE AND PURITY." अनुकंपा, सहनशीलता, ज्ञान आणि निर्मलता.

विमानातून खाली उतरल्यावर ही मुलगी नतमस्तक होऊन प्रथम भारतभूमीचे चुंबन घेण्यात धन्यता मानते.

धन्य तो देश. धन्य ती माती. धन्य ते महान लोक ज्यांनी या भारताला हे महानपण दिले. धन्य ती भारत वेडी कमला!

(काही कारणांनी कमलाचे छायाचित्र उपलब्ध नाही)

## 46. गुरु आले शिष्याच्या भेटीला

*"एक दिवशी नाडी पट्ट्या माझ्या हातात येतील असे मार्टीन तू म्हणाला होतास  ना मग घे ह्या ताडपट्टीचे पॅकेट.  हातात धर. ..."*



Figure 59 **विवेक बंगल्यात जिथे पुर्वी नाडी ग्रंथांचे वाचन झालेल्या हॉलमधे प्रभाकर वझे आणि शशिकांत ओक मागे न्यायमुर्ती कै. वझ्यांचा फोटो**

अगस्त्य महर्षी आपल्या देशात येताहेत याचे कारण त्यांना आपल्या देशातील काही लोकांसाठी आदेश द्यायचे आहेत. असे पॉवेलचा मित्र मार्टीन त्याला म्हणाला होता. आमचा विसा नाकारला गेला तेंव्हा पॉवेल फार निराश झाला होता. त्याला लोकांचे फोन आले की नाडीग्रंथवाले लोक येणार नसतील तर आपचे रजिश्ट्रेशन कॅन्सल करा वगैरे. त्यावेळी मार्टीन कोला नावाच्या त्याच्या मित्राने सांगितले होते काळजी नको.  पुन्हा प्रयत्न कर. ते नक्की येतील.

मार्टीनचे बोल काही महिन्यात खरे ठरले. जसे त्याने पावेलला काही वर्षापुर्वी सांगितले होते की नाडीग्रंथ म्हणून काही अदभूत प्रकार भारतात असतो. काही काळानी पावेलच्या वाचनात थॉमस रिटरचे पुस्तक आले. तो त्यांच्या बरोबर भारतात आला. चेन्नईला वगैरे नाडीकेंद्रात आपले भविष्य पाहून झाले. तरीही समाधानी नव्हता. नंतर

त्याने ओशोंच्या आश्रमात प्रवेश घेतला. त्या नंतर त्याला एक नाडीग्रंथ केंद्र कोरेगाव पार्क भागात असल्याचे सहज कळले. म्हणून तेथे तो आपले नाडी भविष्य पलनी नामक नाडी वाचकाकडून पाहून आला. प्रभावित झाला. नंतर तो पलनीच्या बरोबर शांतीदीक्षा करायला तमिलनाडूभर फिरला. पलनी व शिवषण्मुगम यांच्या घरी राहून आला. पुढे माझ्याशी ओळख झाली वगैरे...

पुर्वी पॉवेलशी नाडीबद्दल बोलताना मार्टीन त्याला म्हणाला होता, मी भारतात जाणार नाही पण एक दिवस नाडी ग्रंथ माझ्या हातात येतील. ते बोलणे तसे राहीले...

... एक दिवशी संध्याकाळी प्रागच्या नाडी केंद्रात एक जण बराच वेळ वाट पहात बसल्याचे माझ्या लक्षात आले. मी बाहेरच्या वेटींगरुममधे बसून आलेल्या लोकांशी चर्चा करत असे. पॉवेलच्या लक्षात आणून दिल्यावर त्याने त्या दिवसाच्या वेळापत्रकात पाहून सांगितले की यांचा नंबर आता येईल. त्या वेळी तुम्ही आत या. त्याप्रमाणे त्यांचे वाचन चालू झाले. एक बाई त्याच्यासाठी झेकमधे भाषांतर करायला होती.

वाचन चालू झाले. एका नाडीग्रंथ ताडपट्टीच्या पॅकेटातील शेवटच्या ताडपट्टीच्या पानावर नाडीवाचक शिवषण्मुगम वाचता वाचता थांबला व ते पॅकेट अचानक मार्टीनच्या हातात देत त्याला म्हणाला, कृपया उभे रहा. ते ताडपट्ट्यांचे पॅकेट तसेच हातात धरा असा आदेश या शेवटच्या पानावर आला आहे..

नंतर त्याने खुलासा केला की अगस्त्य महर्षींचा आदेश आहे की याला या ताडपट्टीचे पॅकेट त्याच्या हातात द्यावे. या पॅकेटात तुझी नाडीपट्टी सापडणार नाही पण दुसऱ्या ईरुसुळू मेरुरेहा आंगठ्याच्या ठसेवाल्या पॅकेटात ती मिळेल.

त्याप्रमाणे पुढील पॅकेटात त्याची पट्टी सापडली. त्यात त्याचे नाव मार्टीन. तेच त्याच्या वडिलांचे नाव. आईचे नाव एना. पत्नीचे नाव मोनिका (जी भाषांतराचे काम करत होती) असेल असे म्हटल्यावर त्याने सगळ्या नावांना मानेने हो म्हणून मान्यता दिली.

पुढे त्या पट्टीत म्हटले होते, ' अरे तू माझा शिष्य, पुर्वजन्मीचा मच्छमुनींचा अवतार आहेस. तुला भेटायसाठी मी येथे आलो आहे. तुझी इच्छा होती ना की माझ्या नाडी ग्रंथ पट्ट्या तुझ्या हाती याव्यात म्हणून. ती तुझी इच्छा पुर्ण करायला मगाशी मी नाडी वाचकाला त्या नाडीपट्टीचे पॅकेट आवर्जून तुझ्या हाती द्यायला सांगितले होते.'

या शिवाय अनेक घटनाक्रम सांगून महर्षी म्हणाले, 'पॉवेलसह त्याने सदुरगिरीला जावे. तेथे त्याला मी प्रत्यक्षरुपात दर्शन देईन.'

मला माझ्या सदुरगिरीच्या अदभूत यात्रेची आठवण झाली. त्यानंतर वेदारण्यमच्या अगस्ती महर्षींच्या मंदिरात त्यांचे झालेले दर्शन आठवून रोमांच उभे राहिले.

नंतर मार्टीन वेळोवेळी भेटत राहिला. अगदी प्राग एअरपोर्टहून निघताना पर्यंत. भाषेचा अडसर असल्याने तो खुणांनी आमच्याशी विशेषतः रवीशी बोलत असे.

प्राग विमानतळावर निरोप देताना त्याने मला माझ्या ह्रदयाला स्पर्ष करून हातानी थोपटत होकारार्थी अंगठा वरकरून आणि नंतर माझ्या डोक्याला हात लावत नकाराची खुण करून आता तुझे पुढील कार्य आस्था, श्रद्धा, प्रेम भावाने करावे. बुद्धीच्या वाटेने आडकाठी होऊन महर्षींचे कार्य करता येणार नाही. असे जणु खुणांनी सुचवले,

मध्यंतरी एकदा त्याने शक्तिपात करून हस्तस्पर्षाने मला समाधीचा आनंद घडवला.

--------------------------------------------------------------------------------------------------------------------

## 47.बहुरूपी व्यक्तिमत्वाचा मनस्वी पॉवेल क्रेची

***झेक प्रजासत्ताकला नाडी ग्रंथांच्या अधिवेशनाला जाणे झाले त्याचा प्रवर्तक होता पॉवेल. ...***



Figure 59 **कै. रा.शं.वझ्यांच्या हस्ताक्षरात त्यांचा चिरंजिवाच्या नाडीपट्टीतील वडिलांच्या पोषाखाचा अचुक उल्लेख - "दि. 24.4.1964रोजी ही पट्टी वाचून दाखवत असताना जातकाचे वडील पांढरा शर्ट व पांढरे धोतर, ग्रे रंगाचा कोट व डोक्यावर काळ्यारंगाच्या टोपीत हजर असतील. तसे ते होते असे त्यावेळचे प्रत्यक्षदर्शी सांगतात."**

... नाडी ग्रंथांवर अत्यंतिक श्रद्धाभाव असल्याशिवाय व्यक्तीला नाडीग्रंथांवर मोठ्या कार्याची प्रेरणा मिळत नाही. जो आपल्याला झोकून देण्याचे धाडस करतो. त्याला योग्य ते मार्गदर्शन व मदत नाडी महर्षीकडून सतत मिळते. याचा प्रत्यय अनेकदा येतो. त्याचे ढळढळीत उदाहरण म्हणजे पॉवेल क्रेची...

मध्यम परिस्थितीतील जन्मलेला पॉवेल आईचा लाडका. नंतर वडिलांनी दुसरे लग्न केले. नंतर आई वारली. एक थोरला भाऊ. शिक्षणात गोडी कमी. इकॉनॉमिक्सच्या विषयांनी पास झाल्यावर त्याने अनेक किरकोळ कामे केली.

सतत बोलत राहायला त्याला आवडते. इंग्रजीवर त्याच्या उच्चारात "कंत्रोल" कमी. पण दुसऱ्याला बोलायची संधी कमी मिळेल असा तो सतत बोलत राहातो.

त्याच्या मोठ्या सुझुकीने रोज आम्हाला आमच्या राहायच्या जागेपासून नाडीग्रंथ वाचनाच्या इमारतीपर्यंत ४ किमी जाता-येता व्लाटवा नदीपुलावरून दिसणारा प्रागचा कॅसल तो दररोज जाता येता न चुकता बोट करून, 'लू...क देअर...अवर प्राईद ऑफ प्राहा' म्हटल्याशिवाय त्याला राहवत नाही. मग मागच्या सीटवर बसलेल्या तिघा नाडीवाचक तमिळींत अपेक्षित ते वाक्य आले असे खुणा करत खुखु हास्याची लकेर उमटते. मी खाकरुन पॉवेलच्या पुढच्या बोलण्याला मान हलवून साद देतो.

पडेल ते काम करण्याची सवय असलेला पॉवेल अगदी सुरवातीला अधिवेशनाच्यामधे दुपारच्या जेवणासाठी जवळच्या हॉटेलात जाताजाता रस्त्यावरील झाडलोट करणाऱ्या एका कर्मचाऱ्याकडे पाहून तो म्हणाला होता, 'लूक लाईक धिस आय स्वीप रोड्स इन नाईट शिफ्ट तू गेत २०० रुपीस.'

कम्युनिस्ट राजवटीचा तिरस्कार करणाऱ्या त्याने १९८९ च्या झेकचळवळीत भाग घेऊन तरुणांना चेतवले होते. त्याला चित्रे काढायची भयंकर हौस. कॉलेजमधे असताना त्याला त्याच्या चित्रात फ्रेंचशैली डोकावते म्हणून त्याला चित्रकलेच्या परीक्षेत प्रवेश न देणाऱ्या कडक कम्युनिस्ट प्रशासनाशी त्याचे कसे पटणार?

कॉलेजात त्याने नॅशनल लेव्हलवर टेनिस खेळून नाव कमावले. मार्टीना नवरातिलोवाच्या बहिणीसह नव्या खेळाडूंना प्रशिक्षणाराठी धडपड करणारा पॉवेलने नव्या मुक्तसरकारच्या 'त्रानपोर्त मिनिस्तीत' २ वर्षे रेल्वेस्टेशनांच्या नुतनीकरणाच्या कामात गाडून घेतले. पण रटाळ कामात रंगत येईना म्हणून त्याने त्या कामाला रामराम ठोकला.

मैत्रिणींच्या घोळक्यात राहायला आवडणारा पॉवेल, आमच्याकडच्या पोरींना "बीगमनी, बीगकार्स व बीगदारू" हवी ती मायाजवळ माझ्याकडे कुठे असे म्हणून परदेशात रहायला वरचे वर जात असावा.

स्कूबा डायव्हींग करायला तो इझ्रायलच्या समुद्र किनाऱ्यावर, तर हिमालयाच्या उंच उंच शिखरांवर चढाई करायला तो नेपाळला, भारतात धरमशालाला येतो.

प्रोफेशनल फोटोग्राफीकरून आपल्या उपजीविकेची कमाई करून आपले छंद सांभाळायला, खूप हिंडायला आवडते. त्यातच त्याला ऑकल्ट सायन्सेसवर काम करायला आवडत असल्याने त्याची ओळख जोसेफ श्रोटर या झेकमधील विख्यात विचारकाशी व मारिया या हीलिंगसाठी काम करणाऱ्या व्यक्तींशी दोस्ती झाली.

एकदा लग्नाच्या बोहल्यावर चढून मुलगी झाल्यावर डाव मोडून गेलेल्या पत्नीला कायमचा रामराम ठोकून तो असला तरी मुलगी अनीता त्याला फार लाडकी. तिला अमेरिका दाखवायला तो घेऊन गेला होता. आज दि १८ जूनची गोष्ट, माझी मुलगी येणार नाडी पहायला म्हणून तो फार खुश होता. तिला भारतीय सरवार खमीजमधे पाहून पॉवेलच्या भाषेत नाडी(शास्त्री) सिवा "इंडियान ड्रेस वेर्री गुड्ड" म्हणत फार खुष झाला होता. तिची पट्टी सापडल्यावर त्यातील आश्चर्यदायक कथन ऐकून ते दोघे जाम खुष होते. शिवाय पॉवेलची त्याच दिवशी सकाळी ब्रह्मसुक्ष्म नाडीग्रंथाच्या पॅकेटातील पहिलीच नाडीपट्टी त्याची निघाल्याने तोही आनंदी होता. त्याला त्याची ताडपट्टी शिवानी त्याच्या जवळ ठेवायला दिल्यावर स्वारी फारच खुष होती.



Figure 63 प्रागच्या हवाईतळावर निरोप देताना मार्टीन कोला समावेत ओक

पॉवेल सारख्याला ओशोआश्रमाचे आकर्षण वाटले नाही तरच नवल. त्यासाठी त्याने पुणे गाठले. सकाळ-संध्याकाळची लेक्चर्स, व्हाईट रोबमधील प्रवचने, फावल्यावेळात पेंटींगचा ग्रुप अटेंड करत त्याने वेळ काढला पण त्याचे मन रमेना.

मार्टीन कोला नावाच्या त्याच्या एका मित्राने त्याला खूप आधी नाडी ग्रंथ पट्यांबद्दल सांगितले होते. जर्मनीतील नाडीग्रंथ प्रेमी थॉमस रिट्टर विदेशी लोकांना घेऊन नाडीग्रंथांसाठी सफर करवतो. त्यातील एक उत्सुक म्हणून पॉवेल जानेवारी २००९मधे चेन्नईला आला होता. त्यावेळी त्याची पहिली पट्टी पाहिली गेली. तेथून तो नटराजपुरमला नाडी पहायला ग्रुपने गेला होता. ठरलेल्या वेळापत्रकात पट्टया सापडल्या तर ठीक असा त्यांचा खाक्या असल्याने अनेकांची पट्टी सापडली नाही तर निराश व्हायला होई म्हणून तो अशा धावतपळत नाडीपट्टी पहाण्यावर नाराज होता.

एकदा त्याला पुण्यात ओशो आश्रमाच्या जवळ कोरेगाव पार्कमधे नाडी केंद्र आहे असे कळल्यावर तो सप्टेंबर २००९ मधे आपले तेथील कथन पाहून प्रभावित झाला आणि त्याला नाडी ग्रंथांच्या अदभूततेने प्रभावित केले. ओशो आश्रमातील प्रवचनांपेक्षा नाडी महर्षींच्या सानिध्यात राहायला आवडू लागले. त्यातूनच नाडी ग्रंथांना झेकला नेण्याची त्याच्या मनांत प्रेरणा आली.

पॉवेल फार कूल ऑपरेटर. एका वेळी एकच काम असा त्याचा खाक्या. नवनविन कल्पना काढणे पॉवेलची खासियत. एक दिवस झेक लोकांचे श्रद्धास्थान र्हीपच्या टेकडीवर त्याने नेले. तेथे मला ऑटोरायटिंग करायला प्रेरणा झाली. पौर्णिमेची रात्र येचिन नामक झेकच्या स्वर्गाची तुलना केली जाते अशा ठिकाणी आम्ही पेंटिंग करत जागवली. स्लॅपी या त्याच्या घरापाशी असलेल्या सरोवराच्या परिसरात अत्याधुनिक बोटीबर आमच्यावरील नाडीग्रंथांच्या फिल्मचे शूटिंग करताना नाडी महर्षींनाही आनंद झाला असेल. आम्हाला एका कॉन्हेंटशाळेत त्याने नाडी वाचकांना नेऊन तेथील विद्यार्थ्यांना भारतियांची ओळख करून देण्याचा घाट घातलान. “फॉरीन मिनिस्त्रिच्या ऑफिसात” भारतातील पुर्वहायकमिशनरांची भेट घडवून आणताना त्या भेटीचे फिल्म शूटिंग करून त्यांना ही आश्चर्यात टाकले.

एके दिवशी सकासकाळी, ”शशि तुझे चहाते भेटायला आलेत” म्हणून त्याने मला बुचकळ्यात टाकले. एका रॅशनॅलिस्ट नियतकालिकाचा तो वार्ताहर होता. ‘आपल्याकडून माहिती काढून ती आपणाला ताडपट्यातून आल्याचे भासवतात’ या नाडीवरील नेहमीच्या घिश्यापिट्या आरोपाचा व तांबरमच्या नाडी केंद्राचा फोटो दाखवत त्याने मी या नाडी प्रकरणाचा विशेष शोध घ्यायला आलोय म्हणत सुरवात केली. पण नंतर नाडी ग्रंथाच्या ताडपट्यात झेक लोकांची नावे कोरलेली पाहून चक्राऊन गेला. तो जाताना म्हणाला, “त्या रॅशनॅलिस्ट लोकांच्या मतांचे सोडा हो. प्रत्यक्ष न पहाता नुसती हाकाटी करण्यात त्यांना रस असतो झालं...मला तर यात फारच अद्भूत गोष्टी दिसताहेत.” त्यावेळी मला महाराष्ट्रातील काही लोकांच्या विचारांच्या इथल्या लोकांत निदान प्रत्यक्ष पाहून कसोटी करायचे साहस असल्याचे पाहून आनंद झाला.

आपल्यामनासारखे काम कधी झाले नाही तर, ‘आय दोंत लाईक इट! धिस इज नॉत इन माय प्लान!’ असे म्हणून आपला निषेध कधी मधी व्यक्त्त करायचा. पण तसे फार कमी वेळा घडे.

त्याची एक मजा होती. त्याला काही विचारले तर “आय दोंत नो” हे उत्तर सारखे ऐकून मी त्याला विचारले काय रे? हा काय प्रकार आहे? तेंव्हा तो जे म्हणाला ते फार मार्मिक होते.

“सम टाईम आय दोंत अंडरस्टँड यूर इंगिश. सो आय से आय दोंत नो. समटाईम आय दोंत लाईक तू टेल यू. सो आय से आय दोंत नो. समटाईम्स आय रियली दोंत नो!

‘आय डोंट नो’ या पालुपद म्हणण्यावरून मला माझ्या एका एयर फोर्समधील सीनियर मित्राची आठवण होते. त्याला हाताखालच्या एयरमननी तोंड वेंगाडून दिलेल्या “आय डॉट नो स्सर!” उत्तराची त्याला फार चीड. “इफ यू डोंट नो? गो एन्ड फाईंड आऊट. युसलेस फेलोज.” असे म्हणून त्यांच्यावर तो राग काढे. एकदा आमच्या सीनियर

वॉरंट ऑफिसरला त्यांनी विचारले, “बाकीचे एयरमन कुठे गेलेत? त्याने उत्तर दिले, “आय डोंट नो!” झाले.... त्याला तासत आमचे मित्र म्हणाले, “यू बारबर विदाऊट रेझर! गो एंड फाईड आऊट.”

वॉरंट ऑफिसर म्हणाला, “यस सर, ते सगळे तुम्ही विचारलेल्या प्रश्नांची उत्तरे शोधायला गेले असावेत!!”

मनस्वी पॉवेलने आमच्या झेक भेटीवर आधारित एक फिल्म काढायसाठी तयारी केली आहे. शिवाय तो त्यांच्या भाषेत त्याचे नाडीग्रंथावरील पुस्तक व माझ्या इंग्रजीतील नाडी ग्रंथावरील पुस्तकाचा अनुवाद प्रकाशित करणार असल्याचे ठरवून आहे. पाहू या काय काय होते ते.

---------------------------------------------------------------------------------

**48. सौ मृणालिनी ठकार लेख**

**49.डॉ. अविनाश परुळेकर लेख**

**50.अभिजित देसाई - लेख**

**51.संजय कुलकर्णी – लेख**

**52.शामसुंदर मुले – लेख व सत्यसत्यतेचे निकष**

**53.डॉ. अरसे कुलरत्ने व डॉ. संबंधम यांचे शोधनिबंध**

भारतातील (ओला लीफ) ताडपट्ट्यातून सांगितले जाणारे ज्येतिषकथन –

डॉ. एस एन. अरसे कुलेरत्ने (Dr. SN Arseculeratne) यांनी श्री लंकेच्या पॅराडेनिया विश्वविद्यालयातून पॅरा नॉर्मल (सामान्यापलिकडील किंवा अतीत सामान्य) विषयांवर कोलंबोतील नाडीकेंद्रातून मिळवलेल्या कथनांच्या14 केसेसवर 'भारतीय ताडपत्रातील कथन व कुंडल्यावरून कर्म व पुनर्जन्म संकल्पनेचा विचार' असे नाव देऊन शोधकार्य केले. ताडपत्रातून सांगितला जाणाऱ्या पुर्वजन्मातील हकीकतींचा सर्व केसेसचा वारंवार पडताळा घेऊन 'श्रीलंका जर्नल ऑफ ह्युमॅनिटिज' मधे 1998/99 च्या 24-25 (1-2) -231-246' पानावर तो पहिला पेपर प्रकाशित केला. त्यात श्रीलंकेत सध्या असलेल्या लोकांचे पुर्वजन्म नेपाळच्या राजघराण्यातील काही व्यक्तींचे कसे होते याचा पुरावा मिळवून ती रंजक पण अत्यंत गुंतागुंतीची माहिती सादर केली. त्यातील समारोपात ते म्हणतात, नाडीग्रंथांतील पूर्वघटनाकथन आश्चर्यकारकपणे अचुक येते व नंतरच्या काळाचे कथन कधीकधी अगदी अचुक केले जाते असे नाही. या ताडपट्यांच्या भविष्यकथनांचे शेकडो शतकांच्यापुर्वीचे ऐतिहासिकत्व व हेतू अस्पष्ट आहे. तमिलभाषिकांकडून या ताडपट्टतातील लेखनाची कसोशीने चाचणी केली जावी म्हणून व्यक्तीची माहिती विविध मार्गांनी काढून ती पट्यातून सांगितली जायची शक्यता अशा शोधकार्यात गृहीत धरूनही आम्ही अभ्यासलेल्या पट्ट्यातील कथने अशी लबाडी करून केलेली नाही याची खात्री करण्याची दक्षता आम्ही घेतली होती. शेवटी ते म्हणतात की जर ताडपट्यातील कथने अस्सल आहेत असे निष्पन्न झाले तर पुनर्जन्म व कर्मसिद्धांत हे खरे आहेत असे गांभिर्याने विचारात घ्यायला भाग पडेल.

त्यांच्या या विधानाला बळकटी येण्यासाठी त्यांनी हा पेपर पुनर्जन्म सिद्धांतावर आयुष्यभर काम करून 2500 केसेस मधून जो शास्त्रोक्त पुरावा गोळा केला की तो नाकारणे बड्याबड्या विदेशी बुद्धिप्रामाण्यवादी धेंडांना अशक्य झाले. त्या अमेरिकेतील डॉ. आयन स्टीव्हन्सना ह्या शोधकार्यावर मत व्यक्त करायला पाठवले. त्यात त्यांनी म्हटले, 'Such a demonstration would be a remarkable event. I do not doubt that it would have extraordinary reverberations in philosophy, science and religion.' असे (ताडपत्रावरील लेखनातील सत्यता

दर्शक पुराव्यांच्या प्रमाणाने) सिद्ध केले गेले तर ती अविश्वसनीय घटना असेल. अशा (पुराव्यांच्या) घटनेचे (प्रचंड बदल घडवणारे) असामान्य पडसाद तत्वज्ञान, (भौतिक)शास्त्र व धर्मशास्त्रावर पडतील यात मला शंका वाटत नाही. त्यांच्या या टिपणीवरून प्रेरणा घेऊन नाडीग्रंथांच्या सत्यतेला पडताळण्यासाठीचा दुसरा पेपर डॉ. अरसेकुलेरत्ने यांनी लंडनमधील स्थायिक डॉ. एस संबंधम याच्या समावेत 2001साली सादर केला. त्यात आधीच्या 14 व आणखी एका केसची भर घालून शोध केला गेला. त्याचे शीर्षक होते, STUDIES ON THE PARANORMAL- 2: FURTHER INVESTIGATIONS ON THE AUTHENTICITY OF THE ANCIENT INDIAN OLA (PALM) LEAF ('NADI')HOROSCOPES AND THE QUESTION OF `FREE-WILL' versus `DETERMINISM'

दुसऱ् पेपरात डॉ.एस.संबंधम यांनी चेन्नईतील एका नाडीकेंद्रात जाऊन ताडपत्रांच्या परीक्षा केल्या. शिवाय मानवी इच्छा स्वातंत्र्य व नियतीवादाचा प्रश्नही त्यांनी विचारात घेतला. नाडी वाचकाकडून लबाडीने माहिती मिळवली जाते का?, केंद्रातील अन्य लोकांच्या मदतीने ग्राहकांची माहिती त्याच्या नकळत काढली जाते का? कुंडलीच्या ग्रहमानावरून कथन केले जाते का?, काही तर्क वा अनुमाने बांधून कथन करता येते का?, यात टेलिपथी म्हणजे पराचित्त ज्ञानाचा सहभाग असतो का? आदी शक्यता नसल्याचा निर्वाळा त्यांनी दिला आहे.

नाडीग्रंथांतील कथनांमुळे मानवाचे इच्छा स्वातंत्र्याचे मानावे तर मग आधीच लिहिलेले नाडीभविष्यकथन नियतीवाद सत्य आहे असे दर्शवते त्याचे काय? असे म्हणून तो प्रश्न सोडून दिला आहे. (टीप – त्यांनी जरी तसा सोडला असला तरी ज्ञान तपस्वी प्राचार्य अद्वयानंद गळतगे यांनी आपले विचार व्यक्त करून यावर वेगळा प्रकाश टाकला आहे तो असा. “नाडीग्रंथ म्हणजे विधिलिखित असे म्हटले तर एक संभाव्य आक्षेप उद्भवतो तो असा: ‘सर्व काही ईश्वरेच्छेने घडते असे असेल तर मी काहीच करत नाही. सर्व ईश्वरच करत असेल तर माझ्याहातून किंवा जगातील कोणत्याही व्यक्तीच्या हातून – जे पाप घडते, त्याला ईश्वरच जबाबदार आहे, मी नाही असे ठरते. म्हणजे त्या पापाला ‘पाप’ करणारा जबाबदार ठरत नाही. जगात पाप व्हावे, गुन्हे व्हावेत अशीच ईश्वराची इच्छा असणार, हेच विधिलिखित होय असे ठरते.’ हा युक्तिवाद कर्मसिद्धांताच्या अज्ञानातून निर्माण झाला आहे. (विरोधात्मक) अध्यात्मिक नियमानुसार मनुष्य वाईट कर्म (पाप) करण्याला स्वतंत्र आहे पण चांगले कर्म करण्यास तो बांधला गेला आहे. हीच ईश्वराची योजना आहे. हाच कर्मसिद्धांत आहे. या कर्मसिद्धांतानुसार माणूस स्वतःची उन्नती अगर अवनती स्वतःच करून घेऊ शकतो. ईश्वर त्याला जबाबदार नाही. पाप ईश्वरावर ढकलायचे व पुण्य स्वतःकडे घ्यायचे किंवा दोन्हीबद्दल ईश्वराला जबाबदार धरायचे असे कर्मसिद्धांतात बसत नाही. “ईश्वराची योजना मानवाला मर्यादित स्वातंत्र्य देण्याची आहे. त्याला दिलेल्या मर्यादित स्वातंत्र्याचा त्याने चांगल्यारितीने उपयोग केला तर पुढील जन्मी त्याला अधिक स्वातंत्र्य मिळते. त्याचा त्याला हक्क प्राप्त होतो, आणि त्याचा त्यानी वाईटरितीने उपयोग केला तर त्याचे वाईट परिणाम (पुढील जन्मी) त्याला भोगावे लागतात. परिणामी त्याच्या स्वातंत्र्याचा संकोच होतो.” असे लेडबीटर यांचे यावर कथन आहे. संदर्भ - प्राचार्य अद्वयानंद गळतगे, यांचे विज्ञान आणि चमत्कार पान 464, 472-3)

शोधकार्य डॉ.स्टीव्हन्सना दाखवल्यावर वरील (सत्य)कथने ताडपट्टीत कूटतमिलमधे खरोखरच असतात असे तमिल भाषाशास्त्रींच्या पुराव्याने सिद्ध करायला हवे असे, त्याशिवाय सायन्स जर्नलमधे अशा प्रकारचे लेख छापायला त्यांचे संपादक व वाचक असे मानायला तयार होणार नाहीत. म्हणून आपले वरील उद्धृत मत कळवले.

पुढे सन 2009 मधे तिसरा पेपर डॉ. अरसे कुलेरत्ने विशाखापट्मनमला एका अधिवेशनासाठी आले असता एच. आर नागेंद्रांशी घडलेल्या चर्चेतून तयार झाला. यांनी क्वांटम सिद्धांताच्या आधारे नाडीग्रंथांतील व्यक्तीचे पुर्व कथन पदार्था (मॅटर) प्रमाणे ठोस किंवा निश्चित व भविष्यकालीन कथन लहरी वा वेव्ह फंक्शन प्रमाणे अनिश्चित असावे. त्यात मानवाला आपल्या इच्छेप्रमाणे बदल घडवायचे स्वातंत्र्य मिळते. असे म्हटले त्याचा पाठपुरावा डॉ.अरसेकुलेरत्नेंनी त्या पेपरात केला.

टीप – चेन्नई व पांडेचरी येथील इंडॉलॉजीवर आणि विशेषतः ताडपट्टयातील कूट तमिल लेखनावर शोधकार्य करणाऱ्या संस्थांशी संपर्क करून त्यांना नाडीपट्ट्यातील मजकुराचा स्वतंत्ररित्या शोध घ्यावा यासाठी प्रयत्न केले गेले आहेत. पण अशा संस्थांची आपली शोधकामे व अन्य विषयांकडे पहायची उदासीनता, शिवाय नाडीपट्या ज्यांच्याकडे आहेत, त्यांनी त्या अशा अभ्यासासाठी देण्याला मनमोकळा सकारात्मक प्रतिसाद यांची कमतरता भासते. अगस्त्य महर्षींनी म्हटल्याप्रमाणे या जातकाला (ओकांना) सर्व अभ्यासकार्य करायची घाई आहे, मात्र हे कार्य संथगतीनेच होणे नाडीमहर्षींना अपेक्षित आहे. असो. जसे घडेल तीच ईश्वरेच्छा! ...

---

### 54.नाडीग्रंथांवरील विदेशीलोकांची पुस्तके

**In last few years, many books mostly written for western audience, have been published on Naadi Predictions. Some of the prominent ones are by – Danish - Kim Paisol's (Naadi Palmleaf Astrology), British – Andrew and Angela Donovan's (The Hidden Oracle of India: The mystery of India's Nadi palm leaf), American - Johann Landis's (the future code- Find the mystery of your fate deciphered in palm leaf), Indian- American- Komilla Sutton's –(Naadi Granthas and Palm Leaf Astrology) German - Thomas Ritter (The Secret of Indian Palm Leaf Libraries.), Japanese – Deepak Aoyama's (The secret leaves of Agasthya), etc**

**Many websites and groups connected with Naadi Predictions are providing useful information on this predictive Method. This is possible because of the extremely astonishing results to Naadi lovers have had from all parts of the world.**

### 55.ग्रंथ परिचय – विज्ञान अणि चमत्कार




**भानामतीचे खेळ कोण करतो? मृतात्मे – भुते खरी असतात का? युएफओ उर्फ उडत्या तबकड्यांचे रहस्य काय ? शून्यातून वस्तु निर्मिती होते काय ? पुनर्जन्म मानायचा का? अतींद्रीय शक्ती असतात का? देवदूत असतात काय? गणपतीचा चमत्कार कसा होतो? श्रद्धेचे चमत्कारात काय स्थान?**

**या सर्वांवर वैज्ञानिक स्पष्टीकरण आहे काय? असेल तर त्यांचे काय मत आहे? भारतीय ब्रह्मविद्याशास्त्राचे याबाबत काय मत आहे?**

बुद्धीप्रामाण्यवाद, नियतीवाद, कर्मफल, विधिलिखित या सर्वांचा समग्र संबंध आहे काय? क्वांटम सिद्धांताने आधुनिक भौतशास्त्रीय चिकित्सेची दालने कशी उघडी केली आहेत?

विज्ञान आणि अध्यात्माचा मेळ कसा बसवावा? परामानसशास्त्राने केलेल्या संशोधनाची ओळख व महत्व काय? अशा अनेक कूट प्रश्नांच्या उत्तरांचे समग्र भांडार म्हणजे 'विज्ञान अणि चमत्कार' हा ग्रंथ आहे. प्राचार्य अद्वयानंद गळतगे यांच्या आधीच्या 'विज्ञान आणि अंधश्रद्धा निर्मूलन (आ.2) ऊर्फ अंनिसच खरा चेहरा', 'विज्ञान आणि बुद्धिवाद' या ग्रंथाच्या विश्लेषणातून निर्माण होणाऱा हा 'ग्रंथराज' आहे, असे म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही.

६६४ पानांच्या या भारी ग्रंथाच्या प्रस्तावनेत या ग्रंथाच्या उद्देशाबाबात त्यांनी म्हटले आहे की भौतिकवादी विज्ञानाच्या दृष्टीने चमत्कार असत्य (किंवा अशक्य) ठरतात... कारण ते त्या शास्त्राच्या मर्यादेत कदाचित घडत नसतील पण त्या शास्त्राच्या मर्यादेबाहेर घडतात की नाही हे त्या मर्यादेत राहून कसे कळणार? किंवा ठरवणार? त्यासाठी ती मर्यादा ओलांडून बाहेर आले पाहिजे. कारण त्या शास्त्राच्या बाहेर काम करणारी अनेक शास्त्रे आहेत. भौतिकवादी शास्त्रज्ञ भौतिकशास्त्राबाहेर जगच अस्तित्वात नाही असे म्हणू शकणार नाहीत. त्यांनी तसे म्हणणे म्हणजे एखाद्या विहिरीतील बेडकांनी विहिरीच्या बाहेर पाण्याचे जग अस्तित्वातच नाही असे म्हटल्यासारखे आहे. हा ग्रंथ वाचकांना या संकुचित दृष्टीच्या बेडकांच्या विहिरीतून बाहेर काढून विशाल अतींद्रीय सागराचे दर्शन घडवतो. ते जग वाचकांनी कुतुहल व करमणूक म्हणून नव्हे तर गंभीरपणे शास्त्रीय, अभ्यासू वृत्तीने पाहावे अनुभवावे, यातून वाचकाला नवी वैज्ञानिक दृष्टी प्राप्त झाली तर लेखकाला या ग्रंथ लेखनाचे सार्थक झाल्याचे समाधान होईल.

ग्रंथाची शुद्ध विज्ञानवादी भूमिका -

शुद्ध विज्ञानात 'दैवी शक्तीला' किंवा 'परमेश्वर' या व्यक्तीरुपी संकल्पनेला अजिबात स्थान नाही. सर्व घटना प्राकृतिक आहेत असे शुद्ध विज्ञान मानते व त्याची नैसर्गिक उपपत्ती शोधते. ते जसे अंधश्रद्धेवर प्रहार करते तसे जड़वादी तत्वज्ञानावरही प्रहार करते. असे ते दुधारी शस्त्र आहे. अतिंद्रिय घटनांनी भौत विज्ञानाचे नियम पाळलेच पाहिजेत असा दुराग्रह का धरावा? विश्वातली सर्व रहस्ये माहित नसताना जडवादी विचारवंतांनी आपली दुराग्रही मते पुन्हा तपासावीत, असा लेखकाचा उद्देश ग्रंथाचे संपूर्ण वाचन केले की लक्षात येतो.

भानामतीच्या विविध केसेसची प्रत्यक्ष भेट देऊन केलेली छाननी, घटनांची अर्थपूर्ण फोड, आक्षेप व प्रतिआक्षेप - त्यांची तर्कपुर्ण तपासणी, विरोधी विचारांच्या व्यक्तींचे तोकडेपण आदि गोष्टी ग्रंथ वाचनाच्या वेळी प्रकर्षाने जाणवातत.

अभ्यासपुर्ण ओघवती भाषा व विज्ञाननिष्ठ विवेचन त्यामुळे लेखक आपल्याशी प्रत्यक्ष बोलत आहेत असा अनुभव येतो. ३५० पेक्षा जास्त संदर्भ व टिपणे यातून प्राचार्य गळतगे यांनी पाश्चात्य संशोधकांपासून ते भारतीय ऋषिमुनी, संत-महंतांचे दाखले ग्रंथाच्या पानोपानी दिले आहेत. इंग्रजी उताऱ्यांचे त्यांनी केलेले सोपे व अचुक भाषांतर वाचून थक्क व्हायला होते.

या ग्रंथराजाची महत्त्वाची कामगिरी म्हणजे अंधश्रद्धेच्या उच्चाटनाची ढाल पुढे करून सश्रद्ध मनावर तलवार चालवून वैचारिक पंगू बनवण्याच्या नीतीची चाल या ग्रंथातून उघड केली आहे. वैज्ञानिक सिद्धांतांचा बुरखा घेऊन श्रद्धास्थानांना थोतांड म्हणवणाऱ्या स्वयंनिर्मित समाजसुधारकी संस्था व विचारकांची प्रा.गळतग्यांनी वैचारिक चिरफाडकरून त्यांचे खोटारडे व प्रसंगी विकृत रुप समाजापुढे आणले आहे. खोटे लिहायचे व बोलायचे, सरळ सरळ फसवणे शक्य नसेल तर खोटे सुचवायचे हे तंत्र या विचारकांचे महत्वाचे शस्त्र आहे. हे तंत्र फक्त मराठी भाषिकातील संस्था व व्यक्ती वापरत नाहीत तर जगभरातील सर्वच रॅशनॅलिस्ट संस्था व व्यक्ती कशा व किती टोकाच्या थराला जाऊन वापरतात याची उदाहरणे या ग्रंथात अनेकवेळा वाचायला मिळतात.

वैचारिक वाद घालताना प्रा. अद्वयानंदांचे नाव विकृतकरून लिहिणे, संतांचे चमत्कार खरे की खोटे यावर लिहिताना, रामकृष्ण परमहंसांची 'मिरगी झालेली व्यक्ती' अशी संभावना करणे, गळतग्यांची पुस्तके विकत घेणार नाही, वाचणार नाही पण त्यांनी आमची (प्रतिपक्षाची) पुस्तके विकत घेऊन वाचावीत आदि हुकूमशाही मनोवृत्तीची

लक्षणे त्यांनी दाखवून दिलेली आहेत. अशा 'विवेकवादा'विरुद्ध गळतग्यांनी सादर केलेल्या पुराव्यांना तपासण्याचे नाकारणारे नागपूरच्या डॉ.नी.र. वऱ्हाडपांड्यांना विवेकवादी समजायचे कि हटवादी?

प्राचार्य अद्वयानंद गळतगे यांच्या ग्रंथात 'नाडी ग्रंथ भविष्य' यास 'आकाश लेखनाचा निर्णायक पुरावा' असे म्हटले गेले आहे. त्यांनी स्वतः दक्षिण भारतात जाऊन प्रत्यक्ष अनुभव घेऊन नाडी ग्रंथ अदभूत चमत्कार ठरतात यात संशय नाही असे म्हटले आहे. आपल्या अपत्यांची नावे ठेवण्यास आपण स्वतंत्र आहेत असे आपण समजतो. परंतु ती नेमकी नावे नाडी ग्रंथांच्या ताडपट्ट्यात तंतोतंत येतात याचा अर्थ प्रत्येक व्यक्तीचे काय नाव असेल हे अगोदरच ठरून गेलेले आहे.असे लक्षात येते. अगस्त्य आणि अन्य नाडी ग्रंथकर्त्यां महर्षींनी ती नावे व व्यक्तीचे भविष्य 'आकाशरुपी कॅनव्हास' वर अगोदरच ठरवून लिहिलेले जीवननाट्यपट वाचून ती सांगितली. म्हणजेच अगोदर ठरवून लिहिलेल्या नाटकाच्या कथानकाचा तो एक भाग आहे असे म्हणावे लागते.

'नाडी ग्रंथ' - 'विश्व एक नाटक' असल्याचा तो सार्वजनिक पुरावा आहेत. त्यामुळे आकाश लेखनाच्या सत्यतेचा तो निर्णायक वैज्ञानिक पुरावा आहे, असे गळतगे यांचे प्रतिपादन आहे.

विश्व हे एक नाटक वा चित्रपट असेल तर मानवाच्या इच्छा स्वात्रंत्र्याचा अर्थ कसा लावायचा? आकाश लेखन हे निर्णायक सत्य असेल तर 'मानवाला इच्छा स्वातंत्र्य नाही' हे खरे नसून मानवाचे इच्छा स्वातंत्र्य हे मानवाचे नसून त्याला निर्माण करणाऱ्या ईश्वराचे -विश्व नाटककाराचे - आहे असे ठरते, असे लेखकानी ठासून म्हटले आहे. 'बंधन व स्वातंत्र्य' या किंवा 'प्रयत्नवाद व नियतीवाद' या तथाकथित समस्येचा उलगडा करताना प्रा. गळतगे म्हणतात, 'ज्या लोकांचा पुण्य कृत्य करण्याकडे ओढा आहे, ते लोक ज्याला सामान्य लोक 'बंधन' समजतात ते ईश्र्वराचे इच्छा स्वातंत्र्य सिद्ध करतात. ज्या लोकांचा पाप कृत्यांकडे ओढा आहे, ते लोग ईश्वरेच्छा स्वातंत्र्य नाकारून त्या इच्छा स्वातंत्र्याचा संकोच करतात.

म्हणजेच ज्याला सामान्य लोक 'स्वातंत्र्य' समजतात त्या ईश्वरी मायेच्या 'बंधनात' पडतात म्हणजेच आपले ईश्वरीय स्वातंत्र्य गमाऊन बसतात. अशा रीतीने पुण्य करण्याचे तथाकथित बंधन हे खरे अध्यात्मिक 'स्वातंत्र्य' आहे. पाप करण्याचे तथाकथित सैतानाचे 'स्वातंत्र्य' हे खरे मायेचे 'बंधन' आहे.

संत रामदास स्वामींचे प्रयत्नवादाचे वचन -

केल्याने होत आहे रे आधी केलेची पाहिजे ।<br>
यत्न तो देव जाणावा, अंतरी धरिता बरे।।

आणि संत तुकारामांचे नियतीवादाचे वचन

जे जे संचिती। ते न चुके कल्पांती।<br>
होणार ते ते होऊन जाय । व्यर्थ बोलोनिया काय ।।<br>
लाभ अथवा हानी । घरा येता चासोनी।<br>
तुका म्हणे स्वस्थ मन । करा विठ्ठल चिंतन।।

येथे दोन्ही संत दोन परस्पर विरोध दृष्टीकोनाचे आहेत असे वरवर दिसत असले तरी दोघांनीही त्यासाठी ईश्वराची साक्ष काढली असल्याने तो विरोध वरवरता आहे हे स्पष्ट होते. कारण ईश्वराच्या ठिकाणी सर्व विरोध मावळतो.

मागल्या जन्मी केलेल्या 'कर्माला' (प्रयत्नांना) या जन्मात 'दैव' म्हणतात म्हणून प्रयत्न केल्याशिवाय 'दैव' कधीच सिद्ध होत नाही कर्म एकच, एका बाजूने त्याला 'प्रयत्न' म्हणतात, तर दुसऱ्याबाजूने 'दैव'! हे या ग्रंथात मार्मिकपणे सांगितले आहे. पुनर्जन्मसिद्धांतामुळे प्रयत्न व दैववाद हा खोटा ठरतो.

संत ज्ञानेश्वरांच्या १२ व्या अध्यायातील ओवीचा दाखला देताना प्रा. गळतगे म्हणतात, 'जे मनाने, वाचेने, देहाने, कर्म होईल ते मी करत आहे असे मानू नकोस कारण ज्या परमेश्वराच्या सत्तेने हे विश्व चालत आहे तोच कोणती गोष्ट करणे अथवा न करणे निर्धारित करतो. या सत्याचा ब्रह्मविज्ञानामुळे उलगडा होतो.

विश्व हे गारुडाचा खेळ नसून ते खरे आहे हे समजले की 'चमत्कार' हे खरे आहेत हे कळते. (चमत्कार हे एकाच वेळी खरे व खोटे कसे? पोट मथळा पृष्ठ- ३९९) विश्व हे नाटक आहे हे कळले की मानवाला ईश्वराहून वेगळे इच्छा स्वातंत्र्य आहे हे खोटे हे कळते. विश्व हे नाट्य आहे हे ज्याला माहित नाही किंवा मान्य नाही अशा बुद्धिवादी लोकांच्या दृष्टीला स्वतःला वेगळे इच्छा स्वातंत्र्य आहे हे खरे वाटते. मग त्यांना चमत्काराच्या नियमभंगाच्या उपपत्तीची समस्या सोडवता येत नाही व त्यामुळे चमत्कार नाकारायचा म्हणजेच ते खोटे म्हणण्याचा अर्थहीन आडमुठेपणा करावा लागतो.

टोलनाक्यावर कर चुकवण्यासाठी रात्रभर अन्य मार्ग हुडकून फिरत पहाटे परत टोलनाक्यावरच येणाऱ्या गाडीवानासारखी अवस्था ब्रह्म विज्ञानाच्या कर्मसिद्धांतांची ओळख नसल्याने पाश्चात्य शास्त्रज्ञांची झाली आहे. अशा आडरानातील अंधाऱ्या रस्त्याने फिरणाऱ्या शास्त्रज्ञांचा प्रतिनिधी म्हणून लेडरमन यांचा उल्लेख करता येईल असे गळतगे प्रतिपादन करून पुढे म्हणतात, त्याच्या God Particle(1993) ग्रंथात त्यांनी अंतिम भौतिक कण हाच ईश्वर मानला जावा अशी त्यांची धारणा होते! या शिवाय जॉन पोकलिंग हॉर्न यांचे Beyond Science(1996), आर पेनरोज यांचे Emperor's New Mind(1987) ब्रायन एपलयार्ड यांचे Understanding the Present (1992) असे अनेक दाखले प्रा. गळतगे यांनी वानगी दाखल दिले आहेत.

क्वांटम सिद्धांत पाश्चात्य विज्ञानाचा रुढ दृष्टीकोन मुळातच अपुरा असल्याचे दाखवून देतो. रूढ विज्ञानातून कार्यकारण भावाची कायमची हकालपट्टी करण्याची गरज सिद्ध करतो. डेव्हीड बोहम म्हणतात, अणुचे जेंव्हा कोणीही निरीक्षण करत नाही तेंव्हा त्याला कोणतेही गुणधर्म नसतात. म्हणजेच कोणाचेतरी पहाणे, पाहणारा किंवा त्याचे मन (Consciousness) प्रत्यक्षात अणू भौतिक रुपाने अस्तित्वात आणते. तात्पर्य अणुला 'वस्तुनिष्ठ' अस्तित्व नसून 'व्यक्तीनिष्ठ' अस्त्वित्व असते.

अणु जड भौतिक नाही किंवा खरा नाही असा याचा अर्थ नसून अणूचा जडपणा (गुणधर्म )किंवा खरेपणा (अस्तित्व) हे मानवाच्या त्याला पहाण्याच्या मनामुळे प्राप्त होते असे क्वांटम सिद्धांता वरून सिद्ध होते. त्यामुळे भानामती, UFO, आदींना मानवी मनामुळे खरेपणा, अस्तित्व प्राप्त होते. ही उपपत्ती क्वांटम सिद्धांत ही उचलून धरतो.

समारोप -

जे डोळ्यांना दिसते ते दृष्य भौतिक जगच काय ते खरे असे समजून त्या जगताच्या नियमाच्या शोधालाच विज्ञान म्हणायची चूक मोठमोठे शास्त्रज्ञ करत असतात. ही त्यांची वैज्ञानिक अंधश्रद्धा आहे. ज्याप्रमाणे एखादा अंधळा आपल्याला दिसत नाही म्हणून प्रकाशच अस्तित्वात नाही असे म्हणू शकत नाही, त्याप्रमाणे अतींद्रीय दृष्टी नसलेला मनुष्य – भले तो मोठा शास्त्रज्ञ असेल – लिंगदेह, मनोदेह, बुद्धिदेह, आत्मा हे डोळ्यांना दिसत नाहीत म्हणून अस्तित्वातच नाहीत असे म्हणू शकणार नाहीत. तसे म्हणणाऱ्यांना अदृष्य पातळीवरील त्या देहाचे भौतिक जगात सुद्धा कसे दृश्य परिणाम घडून येतात, अनुभवायला मिळतात हे दाखवून देण्याचा प्रयत्न या ग्रंथात केलेला आहे. त्यामुळे त्यांचे अस्तित्व आंधळ्या भौतिकवादी शास्त्रज्ञांना सुद्धा मान्य करावे लागते.

पदार्थविज्ञान (फिजिक्स), भूत-भानामती, परामनोविज्ञान (दैवतशास्त्र), ब्लॅक – व्हाईट जादू आणि ब्रह्मविज्ञान (स्पिरिचुअल सायन्स) या तिन्हींचा वरवर पाहता परस्परांशी संबंध नाही. नव्हे ती एकमेकांना धिक्कारताना दिसतात परंतु या तीनही शास्त्रांना एकत्र आणण्याचा चमत्कार प्रस्तूत ग्रंथात विज्ञानामुळेच शक्य झाला आहे. प्राचार्य अद्वयानंद गळतगे यांनी या शास्त्राची नाळ परस्परांशी निसर्गतःच जोडली गेली आहे गेलेली आहे हे सिद्ध केले आहे.

ग्रंथपरिचय – विंग कमांडर शशिकांत ओक

लेखक – प्राचार्य अद्वयानंद गळतगे. पो. भोज. जि. बेळगाव. कर्नाटक. ५९१२६३. फोन ०८३३८-२९३३९९. मो - ०९९०२००२५८६. वेदांत विवेक प्रकाशन. पृष्ठे - ६६४. किंमत – रु.४००. (रोहिणी बुक डेपोत प्राचार्य अद्वयानंद गळतगे याचे सर्व ग्रंथ उपलब्ध.)

## नवग्रहमंदिरातील आराध्य मुर्ती



१) सुर्यनार कोईलमधील मंदिरात सुर्य भवगान उषा व छाया पत्नींसमावेत

--------------------------------------------



२) तिगंलूर मधील मंदिरात सोम उर्फ चंद्र भगवान

------------------------------------------------



**३) वैदीश्वरन कोईल मंदिरातील अंगारक वा मंगल भगवान**

---------------------------------------------



**४) तिरुवेंकाडू मंदिरातील बुध भगवान**

-----------------------------------------




५) अलंगुडीमधील मंदिरातील गुरू किंवा बृहस्पती भगवान

------------------------------------




६) कंजनूर मंदिरातील शुक्र भगवान

---------------------------------------------------------



७) तिरुनल्लारमधील मंदिरातील शनिभगवान

------------------------------------------------



८) तिरुनागेश्वरनच्या मंदिगरातील राहू भगवान नागवल्ली व नागकन्नी पत्नींसमावेत

------------------------------------------------



**९) कीळपेरुमपल्लम मंदिरातील केतु भगवान**

-------------------------------------------------------------

